दिवंगत मातोश्रींच्या
पुण्यप्रद स्मृतीस—

# प्रस्तावना

संशोधक या शब्दामध्ये एक जादू भरलेली आहे. तो शब्द ऐकल्याबरोबर आपल्या मनात आदराची भावना उत्पन्न होते, आणि जन्मभर विद्याव्यासंगात वाहून घेणाऱ्या विद्वानाचे व्यक्तिमत्व डोळ्यापुढे उभे राहाते. एम्. ए., एम्. एस्सी. सारखे उच्च शिक्षण घेणारी प्रत्येक व्यक्ती संशोधक होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगते. पुढे जीवन-कलहात पडल्यानंतर ते स्वप्न हळूहळू विसळत जाऊन त्याच्या फक्त स्मृती मनात राहतात. काही लोक थोडे अधिक चिकाटीचे असतात, ते या कामी वर्ष-सहा महिने थोडीफार हालचाल करतात आणि एकंदर या गोड स्वप्नामागील परिश्रम, चिकाटी आणि वेळ याचे स्वरूप पाहिल्यानंतर लवकरच हा नाद सोडून देतात. शंभरातला एखादाच आपल्या महत्त्वाकांक्षेला चिकटून राहातो, आणि मोठ्या परिश्रमाने पीएच्. डी. च्या तोलाचा एखादा प्रबंध पुरा करतो. यापैकी बहुतेकांचे पदवीचे हे संशोधन पहिले असते आणि तेच शेवटचे ठरते. अशा शंभरातला एखादाच जन्मभर संशोधन करीत राहतो. मग संशोधकाविषयी वाटणारा आदर अनाठायी आहे असे कसे म्हणावे?

संशोधक होण्याची इच्छा असणाऱ्या वाचकांना डॉ. संत यांचे हे मराठी पुस्तक योग्य रीतीने मार्गदर्शन करू शकेल. संशोधन करणारा तरुण आपल्या मार्गदर्शक अध्यापकाकडे गेल्यानंतर, कागद पेन्सिल हातात घेऊन, 'मी आता पुस्तके काय वाचू?" असा अगदी प्राथमिक स्वरूपाचा प्रश्न विचारतो, तसे तरी होणार नाही. या ग्रंथाच्या वाचनाने संशोधनकार्याची तात्त्विक आणि व्यावहारिक अशी दोन्ही प्रकारची माहिती त्याला मिळू शकेल. लेखकाने आपल्या या ग्रंथात स्वतःचा अनुभव, चिंतन, व्यापक वाचन आणि चर्चा-संभाषणरूपाने मिळविलेली माहिती या सर्वांचे सार आणिले आहे. संशोधनात्मक पुस्तक कसे असावे याचा हे पुस्तक आदर्शच आहे. मराठी वाङ्मय, भाषाशास्त्र, समाजशास्त्रे, तत्त्वज्ञान, धर्म इत्यादी विषयातील संशोधन करणाऱ्या तरुणांनी हे पुस्तक अवश्य वाचलेच पाहिजे असे आहे.

हा ग्रंथ एखाद्या कथा-कादंबरीसारखा भोजनोत्तर विडा चघळीत वाचनाचा नाही. त्याच्या पानापानातून माहिती आणि विचार ठासून भरलेले आहेत. अधिकाधिक माहितीचे सार कमीतकमी पानात आणण्याचा हा प्रयत्न आहे. म्हणून सावधानपूर्वक व एकाग्रतेने त्याचे वाचन करणाऱ्या वाचकाला त्याचा खूप फायदा

होईल. डॉ. संत यानी वाङ्मय आणि माया यांच्या संशोधनासंबंधी अधिक विस्तृत अशा प्रकारचा दुसरा ग्रंथ लिहावा. त्यामुळे सशोधनाच्या या उपेक्षित क्षेत्रात, अधिक तरुण आकर्षित होतील व संशोधनाचे कार्य करतील.

संशोधकाना तपशीलवार सूचना डॉ. संत यानी केलेल्या आहेतच. प्रस्तावनाकाराने भर घालावी असे फारच थोडे आहे. माझी होतकरू संशोधकाना एवढीच सूचना आहे की, संशोधन हे काम सवडीचे व आवडीचे आहे. चोवीस तास पैशांचा हव्यास धरणाराला हे जमायचे नाही. नियमितपणे आपल्या सवडीचा वेळ स्वच्छंद म्हणून केवळ याच कामाकडे देणाराला संशोधनाचे काम जमेल. त्यात प्राप्ती फारशी नाही; आनंद मात्र भरपूर आहे.

भारतात एकेकाळी चिकित्सेचे आणि संशोधनाचे युग होऊन गेले. याच काळात उपनिषदे, तत्त्वज्ञान, वैद्यकशास्त्र, ज्योतिषशास्त्र, गणितशास्त्र, वनस्पतिशास्त्र, रसायनशास्त्र इत्यादी शास्त्रे नव्याने अस्तित्वात आली. भारतीय संशोधकानी चिन्तन, निरीक्षण, चर्चा, प्रयोग, अनुभव इत्यादी मार्गांनी ही नवीन शास्त्रे व हे नवीन ज्ञान अस्तित्वात आणले. संशोधन-दृष्टी अमल्याशिवाय हे झाले नाही. पुढे पुढे चिकित्सक वृत्तीचा हा काळ मागे पडून अंधश्रद्धा आणि ग्रंथप्रामाण्य याचा काळ आला. पाश्चिमात्य देशात ज्याप्रमाणे विद्येचे 'पुनरुज्जीवन झाले तसे भारतात होण्यापूर्वीच पाश्चिमात्य राष्ट्रांशी व पाश्चिमात्य संस्कृतीशी आपला संबंध आला. परंतु त्या संस्कृतीला जन्म देणाऱ्या चिकित्सावृत्तीचा आणि प्रयोगशीलतेचा पुरेसा प्रसार आपल्या समाजात झाला नाही. त्यामुळे संशोधन-क्षेत्रात आघाडीवरील देश म्हणून स्थान मिळविण्याची बौद्धिक पात्रता असूनही आपल्याला ते अद्याप मिळालेले नाही.

ते स्थान हस्तगत करण्याचे कामी एक पाऊल म्हणून या ग्रंथाचा निश्चितपणे उपयोग होईल.

पुणे
१५ ऑगस्ट, १९६६
१९ वा स्वातंत्र्यदिन

ग. श्री. खैर

# निवेदन

संशोधनाशी संबद्ध असणाऱ्या विविध प्रश्नांचा ऊहापोह करणारे हे पुस्तक सादर करताना मला अतिशय समाधान होत आहे. मराठीत या विषयावरची पुस्तके अत्यल्प आहेत. तीही विशिष्ट (विशेषत: इतिहास) विषयातील संशोधन पुढे धरून लिहिलेली आहेत. सर्वसामान्य अभ्यासकाला उपयुक्त होईल असे, तसेच संशोधनविषयक प्रश्नांची चर्चा करणारे पुस्तक उपलब्ध नव्हतेच व त्याची जरूर आहे असे वाटल्यावरून हा उपक्रम केला आहे. त्याचे उपयुक्तत्व वा महत्त्व संबंधितांनी ठरवावयाचे आहे. असल्या पुस्तकाची गरज भासावी अशी दोन-तीन कारणे घडली.

दोन वर्षांपूर्वी शिवाजी विद्यापीठाने पीएच्. डी. पदवीसाठी मराठी विषय घेऊन प्रबंध लिहू इच्छिणारांसाठी मार्गदर्शक म्हणून मला मान्यता दिली. तेव्हापासून या विषयास चालना मिळाली. ही मान्यता मिळण्याच्या पूर्वीपासून हा विषय माझ्या डोक्यात घोळत होता. मान्यता मिळाल्यावर हा ग्रंथ प्रकाशित करावा असे मनाशी ठरविले होते. [कारण त्या सुमारास मुंबई विद्यापीठाने पहिली पीएच. डी. पदवी प्रदान केल्यास पंचवीस वर्षे होत होती.] त्याप्रमाणे प्राथमिक जुळवाजुळवही सुरू केली होती. परंतु त्याच वर्षी अगदी अचानक रीतीने मला सोलापूर सोडावे लागले. त्या वेळी आलेल्या विविध अनुभवांनी मन अतिशय विषण्ण व बधिर झाले. प्रथम नव्या गावात जाऊन स्थिरस्थावर होणे महत्त्वाचे होते. कारण जीवनाचा बसविलेला पटच कोणीतरी निष्ठुरपणे उधळून लावला होता. चित्ताला स्थिरता लाभण्यास दोन वर्षे लागली. अद्यापही कसेबसे सावरून धरीत आहे एवढेच.

पीएच्. डी. विद्यार्थ्यांशी चर्चा करताना संशोधन म्हणजे काय, शोधक विद्यार्थ्याकडून कोणत्या गोष्टी अपेक्षित आहेत, त्याने विषयाची निवड कशी करावी, कोणत्या पद्धतीचा अवलंब करावा, त्यात मौलिकता आणणे शक्य आहे काय, त्यासाठी काय करणे आवश्यक आहे, आपल्या देशातील तसेच इतर विशेषत: पाश्चात्त्य देशांतील संशोधनाची अवस्था कोणती, आपणाकडील परिस्थिती काय आहे, इत्यादी अनेक प्रश्न पुढे उभे राहिले, त्यांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रबंधात केला आहे.

लोकशाही जीवनपद्धतीच्या रक्षणासाठी, तसेच समाजवादी जीवनाच्या संवर्धनासाठी व त्यातील गरीब वर्गासाठी समानसंधीच्या एक प्रकारच्या योजनापद्धतेची गरज लागली पाहिजे. पाश्चात्य देशात जेव्हा विज्ञानाचे व विशेषतः औद्योगिक प्रगतीने युग निर्माण झाले, तेव्हा त्याला जोडूनच त्याच्याकडे ज्ञानकोशीय 'विश्वकोशा'चे युग निर्माण झाले. फ्रान्समध्ये डिडरो व त्याच्या सहकाऱ्यांनी विश्वकोश तयार केला. स्वतंत्र विचारवंत व्हॉल्टेअर हा त्या एन्सायक्लोपीडियाच्या लेखकांपैकी एक होता. फ्रेंच राज्यक्रांतीची तयारी व्हॉल्टेअर व रूसो यांच्या वृत्तपत्रीय लिखाणाने केली असे यावर म्हटले जात होते. पण ती खाती पटवून आणण्यात वृत्तपत्रांइतका विश्वकोशाचा हातभार आहे हे आज मान्य झाले आहे. आपणाकडे निरनिराळ्या लोकांनी पुढाकार घेऊन विश्वकोश तयार केले आहेत, पण त्यामागील संशोधनवृत्तीची मात्र फारशी वाढ झालेली नाही. त्यासाठी संशोधनाच्या महत्त्वाचे व स्वरूपाचे संस्कार सर्वांच्याच मनावर उमटवणे जरूर आहे. त्या दिशेने हा अल्प प्रयत्न.

ह्या प्रकारच्या ग्रंथात सामान्यतः निरनिराळ्या पद्धतींचा परामर्श घेतलेला असतो. तसेच त्यातील विवेचन विशिष्ट शास्त्राच्या (सामाजिक शास्त्रे, शिक्षण, मानसशास्त्र इ.) क्षेत्रातील संशोधनास कसे उपयुक्त होईल हे पाहिलेले असते. त्या दृष्टीने येथे संशोधनाचे कोणतेही विशिष्ट क्षेत्र पुढे ठेवलेले नाही. अर्थात वाङ्मयीन क्षेत्रातील संशोधनाचे विवेचन या ठिकाणी प्रथमच येत आहे. तेच, विचार व संशोधनक्षेत्रीय मौलिकतेबद्दल म्हणता येईल.

या विषयावर मराठीत पुस्तके नसल्याने व परकीय राज्यकर्त्यांच्या संपर्कानेच हा प्रकार आपणाकडे प्रामुख्याने आल्याने, काही मूलभूत व महत्त्वाच्या कल्पना इंग्रजीतून घ्याव्या लागल्या आहेत. या विषयाची परिभाषा आपणाकडे निर्माण झालेली नाही. त्यामुळे सामान्यतः रूढ असणारे मराठी शब्द घेऊन, इंग्रजी प्रतिशब्द कंसात देवनागरी लिपीत दिलेले आहेत. जेथे मोठी वाक्ये व उतारे द्यावे लागले ते इंग्रजी लिपीतून लिहिले आहेत. परिभाषा अद्याप बनायची असल्याने मराठी प्रतिशब्द सरसकटपणे बदललेही आहेत. पुणे विद्यापीठाने निरनिराळ्या विषयांसाठी सुमारे केलेले शब्द पाहिले, पण ते सगळे स्वीकारार्ह वाटले नाहीत. अनेक उपलब्ध शब्दांतून चांगला शब्द निर्माण व्हावा वा निवडला जावा अशी भूमिका आहे.

प्रस्तुत उपक्रम हा एक शोध-यत्नच आहे. साहाय्यभूत साधनग्रंथांची यादी शेवटी जोडली आहे. त्यांचा उपयोग विशेष झाला आहे. सर्व ग्रंथकारांचे मी कृतज्ञतापूर्वक आभार मानतो. हे ग्रंथ उपलब्ध करून देण्यात येथील विविध ग्रंथालयाच्या ग्रंथपालांचा बराच हातभार लागला आहे. कोल्हापूर येथील यामध्ये

## निवेदन

गोखले कॉलेज, राजाराम कॉलेज, कॉमर्स कॉलेज, एम् एम् टी टी कॉलेज, या सर्व कॉलेजाच्या ग्रंथपालांचे, मत्रधी प्राध्यापकाचे व प्राचार्यांचे मी आभार मानतो

प्रकाशनाची जबाबदारी घेतल्याबद्दल अ वि गृह प्रकाशनाचे गुरु. बाबासाहेब गागल, डॉ मोसे आदि सदस्य याचा, तसेच प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल गुरु डॉ अण्णासाहेब खैर याचा मी अत्यत ऋणी आहे

डॉ. मोसे यानी हस्तलिखित प्रत वाचून काही अतिशय उपयुक्त व महत्त्वाच्या सूचना केल्या, त्याचा मला फार उपयोग झाला. त्याबद्दल मी कृतज्ञ आहे गुरु अण्णाचे आभार मानावयास मजजवळ शब्दच नाहीत त्यांच्या उत्तेजनपर प्रस्तावनेने माझे अत करण भरुन आले आहे

एका अत्यत महत्त्वाच्या व दुर्लक्षित विषयावर एक वेगळ्या प्रकारचे पुस्तक सादर करताना आनद होणे साहजिक आहे अभ्यासकानी सूचना केल्यास मी त्याचा आभारी होईन, व पुढील आवृत्तीचा योग आला तर त्याचा अवश्य स्वीकार करीन. आज हे पुस्तक परिचयवजा असे झाले आहे मराठीत हा पहिलाच उपक्रम असल्याने त्याचे स्वरुप असे राहणेच आवश्यक व अपरिहार्य होते

माझ्या सहकारी प्राध्यापकानी, पीएच् डी. साठी सशोधन करणाऱ्या माझ्या विद्यार्थिमित्रानी वारवार आस्थेवाईकपणे चौकशी करुन मला कार्यान्वित केले, त्याना धन्यवाद याशिवाय आणखी एक दोघाचा उल्लेख येथे आवर्जून करावयास हवा. माझे बधू, ती दादा यानी नेहमीच्या कामाचा भार असताही पुस्तकाची मुद्रिते अतिशय बारकाईने पाहून दिली, आणि एकदर पुस्तकाबद्दल मधून मधून गौरवपर अभिप्राय देऊन व काही सूचना करुन प्रोत्साहन दिले त्याबद्दल त्याच्या, तसेच तितक्याच आपुलकीने वारंवार चौकशी, विचारपूस, चर्चा करून उत्तेजन देणारे आमच्या कॉलेजचे प्राचार्य एम्. आर देसाई या दोघाच्या ऋणामुळे मी अगदी भारावून गेलो आहे त्याचे, तसेच घरच्या लोकाचे साह्य, प्रेरणा, प्रोत्साहन, शब्दाकनाच्या पलीकडचे आहे, ते त्यानाही आवडणार नाही पुस्तकाचे मुद्रण चागले करुन दिल्याबद्दल लोकसग्रह कारखान्यातील कामगाराचे त्याचप्रमाणे व्यवस्थापक आदीचे मी आभार मानतो.

गोखले कॉलेज,
कोल्हापूर
२५।८।६६

दु. का. संत

अ नु क्र म



• • •

# शुद्धिपत्र

(प्रथम ह्या दुरुस्त्या करा आणि मग वाचा)

| पृष्ठ | ओळ | असे आहे | असे हवे |
|---|---|---|---|
| ५६ | खालून २ | *दुस न्यवळचे* | *दुसऱ्या बाजूने जव* |
| १०७ | खालून ३ | 'अभ्युपगम' | 'अभ्युपगम' |
| १०८ | ,, १ | . of error | .from erro |
| १३९ | ,, ५ | मनाचा पुढचा | (पुढचा शब्द नव |
| १५७ | वरून १५ | याचे मत आहे, | याचे मन आहे |

# १

# ऐतिहासिक पार्श्वभूमी

## विद्यापीठे व संशोधन

उच्च वा विद्यापीठीय शिक्षणाचे स्वरूप प्रामुख्याने संशोधन प्रधान असावे असे मत आज सर्वसंमत झाले आहे. निरनिराळी व बहुतेक सर्व विद्यापीठे विविध शाखांत संशोधनाचे शिक्षण देण्यासाठी सज्ज होत आहेत. त्यांच्यातर्फे निरनिराळ्या विषयांत महत्त्वाचे असे संशोधन पण होत आहे व होत राहणार आहे. काही महत्त्वाच्या विषयांचे व महत्त्वाच्या क्षेत्रातील मूलभूत संशोधन होण्यासाठी स्वतंत्र संशोधन-संस्था व विद्यापीठेही स्थापन झाली आहेत आणि यापुढेही स्थापन होतील. ब्रिटिशांनी भारत सोडला त्यावेळी या प्रचंड देशात अवघी अठरा विद्यापीठे होती. त्यातली दोन-तीन पाकिस्तानात गेली. म्हणजे उर्वरित भारताच्या वाट्याला पंधरा सोळाच आली. गेल्या अठरा एकोणीस वर्षांत विद्यापीठांची संख्या साठावर गेली आहे आणि नव्या पंचवार्षिक योजनेत आणखी काही निघणार आहेत. म्हणजेच गेल्या अठरा वर्षांत विद्यापीठांची संख्या चौपटीने झाली आहे. विशेष म्हणजे ही सारी विद्यापीठे परीक्षा घेऊन पदव्या देण्याचे कार्य जरी करीत असली, तसेच ती कॉलेजे संलग्न करून घेणारी असली तरी, जवळ जवळ प्रत्येक विद्यापीठाने महत्त्वाच्या विषयासाठी आपली स्वतंत्र खाती उघडून त्यांच्या द्वारा संशोधनाचे कार्य सुरू केले आहे, आणि विद्यापीठ-अनुदान-मंडळ हर या बाबतीत विविध प्रकारचे साहाय्य करण्यास बद्धपरिकर झालेले आहे. या विद्यापीठांशिवाय पंडित नेहरूंच्या आग्रहाने विज्ञानाच्या विविध क्षेत्रांत मूलभूत व अव्वल दर्जाचे संशोधन व्हावे म्हणून

निरनिराळ्या 'राष्ट्रीय प्रयोगशाळा' ही निर्माण झालेल्या आहेत तसेच विविध राष्ट्राच्या साहाय्याने विशिष्ट विषयास वाहिलेली अशी स्वतत्र विद्यापीठेही निर्माण होत आहेत म्हणजे एकदरीने व विस्ताराच्या दृष्टीने पाहता आपण गेल्या दीड तपात बरीच प्रगती केली आहे असे म्हणावयास हरकत नाही

सशोधनाचे क्षेत्र अशा प्रकारे बरेच विस्तृत झाले असले तरीसशोधनासबधी विशेषशी जाणीव वा सुस्पष्ट कल्पना विद्यापीठातून बाहेर पडणाऱ्या पदवीधराना, विशेषत, एम् ए, एम् एस्सी सारखी पदवी सपादन करणाऱ्या विद्यार्थ्यांनाही असते असे नाही प्रत्येक विषयाच्या व प्रत्येक क्षेत्राच्या कक्षेत येणाऱ्या सशोधनाचे स्वरूप पुष्कळसेच वेगवेगळे राहणार आहे आपल्या देशाने वा विशिष्ट प्रदेशाने त्या त्या क्षेत्रात जी प्रगती केली असेल वा त्या प्रदेशाची त्या क्षेत्राबाबत जी परपरा निर्माण झाली असेल तिची पार्श्वभूमी त्या त्या क्षेत्रातील सशोधनामागे असणार हे गृहित धरणे योग्य होईल सामाजिक शास्त्राच्या, वाङ्मयाच्या व विशेषत आधुनिक भाषाच्या बाबतीत सशोधनाचे स्वरूप कसे आहे व कसे राहणे शक्य वा आवश्यक आहे, इ विषयासबधी काही महत्त्वाच्या प्रश्नाचे विवेचन करण्याचे ठरविले आहे

## विद्यापीठाची इतर कर्तव्ये

विद्यापीठाच्या पुढे आणखी काही प्रमुख उद्दिष्टे असतात राष्ट्राला म्हणजे समाजाला सर्वच क्षेत्रात विवेकशील अशा प्रकारच नेतृत्व पुरविणे, जीवनाच्या सर्वच महत्त्वाच्या शाखाना तज्ज्ञाचा पुरवठा करणे, विद्येचा व ज्ञानाचा प्रसार करणे आणि ही परपरा कायम राखणे, तसेच त्यायोगे सास्कृतिक व वैज्ञानिक प्रगतीत एक प्रकारची जागरूकता व अद्ययावतपणा आणणे, ही विद्यापीठाची प्रमुख उद्दिष्टे असतात आपापल्या देशातील परिस्थितीप्रमाणे, कालाप्रमाणे विद्यापीठे आपापल्यापरीने ती पार पाडीत असतात ह्या सर्व उद्दिष्टाच्या मुळाशी असणारे एक उद्दिष्ट जगातील सर्वच विद्यापीठाना मान्य करावे लागले आहे व ते म्हणजे वर उल्लेखिलेले सशोधनाचे देशातील निरनिराळ्या क्षेत्रातले – म्हणजे विज्ञानाच्या, सामाजिक शास्त्राच्या, वाङ्मयाच्या, कलेच्या क्षेत्रातील – सर्व प्रकारच सशोधन विद्यापीठाच्या नेतृत्वाने चालावे अशी एक फार मोठी अपेक्षा विद्यापीठाकडून असते मूलभूत वा अन्य सशोधनाबरोबर विद्यापीठाकडून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्यांवर सशोधनाचे अशा प्रकारचे सस्कार झालेले असावेत की त्याची प्रवृत्ती सशोधननिष्ठ (रिसर्च माइडेड) असावी अशी अपेक्षा करणे चूक होणार नाही अर्थात अलीकडे विविध क्षेत्रातील सशोधनाबाबतच्या कल्पना ह्या पूर्णपणे बदललेल्या आहेत सशोधनविषयक कल्पनात

एवढा आमूलाग्र बदल घडून आलेला आहे की, त्याचे नव्याने अवलोकन करणे अपरिहार्य झालेले आहे.

## चिकित्सक वृत्तीचा उगम

संशोधनाच्या मागे जी चिकित्सक वृत्ती आहे ती आपल्याकडे तरी बरीच आधुनिक आहे. आधुनिक युगाच्या प्रमुख प्रेरणापैकी ती एक आहे. युरपमध्ये पंधराव्या व सोळाव्या शतकात तिचा उदय झाला. प्रबोधनाच्या (रेनॅसन्स) चळवळीमुळे ज्या काही प्रमुख प्रवृत्ती उदयास आल्या व ज्या पुढे वाढीला लागल्या त्यांपैकी चिकित्सक वृत्ती (स्पिरिट ऑफ इन्क्वायरी) ही होय. सतराव्या-अठराव्या शतकात ह्याच प्रवृत्तीचा विकास होऊन आधुनिक बुद्धिवादाचा उदय झाला व त्यानंतर शास्त्रीय दृष्टीचे युगमान सुरु झाले आजच्या आपल्या सामाजिक व व्यक्तिगत जीवनात ह्या शास्त्रीय दृष्टीला अतिशय महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे.

प्रबोधनाच्या चळवळीलाच विद्येच्या पुनरुज्जीवनाची चळवळ असे म्हटले जाई. विद्वान व विचारवंत लोकांचे लक्ष प्रथम जुन्या काळातील श्रेष्ठ वाङमयकृतीकडे गेले. त्यांच्या हस्तलिखित प्रती मिळविण्याचा प्रयत्न सुरु झाला. मुद्रणाने त्याला साथ दिली व जुने अभिजात ग्रंथ छापले गेले. इंग्लंडमध्ये इरॅझ्मस्, सर थॉमस मूर व जॉन कॉलेट यानी महत्त्वाचे काम केले. इरॅझ्मसने अनेक लॅटिन ग्रंथ संपादित केले. त्याने 'न्यू टेस्टॅमेंट' तयार केली. बायबलच्या मूळ ग्रीक संहितेचे लॅटिनमध्ये भाषांतर केले. मूरचा 'यूटोपिया' हा ग्रंथ तर प्रसिद्धच आहे. राजा हा धर्मप्रमुख आहे हे मत नाकारल्याबद्दल त्याला शिरच्छेदाची शिक्षा झाली आहे. ती त्याने स्वीकारली आहे. तर जॉन कॉलेट हा इंग्रज पंडित इंग्लिश प्रबोधनाच्या चळवळीचा एक पुरस्कर्ता व नेता गणला जातो. आधुनिक काळाचा प्रारंभ हा अशा प्रकारे विद्वानांच्या व विचारवंतांच्या लेखणीमधून झालेला आहे.

विद्येच्या पुनरुज्जीवनाच्या चळवळीतून निर्माण झालेल्या विद्येसंबंधीच्या प्रेमाचा वारसा असलेले ब्रिटिश व्यापारी या देशाचे राज्यकर्ते झाले. ते व्यापारी म्हणून येथे आले तरी त्यानी आपल्याबरोबर नवी विद्या आणली, तिचा अंगीकार केल्यानेच आपल्या देशातही प्रबोधन घडून आले आहे.

## *आपल्याकडे संशोधनाचा प्रारंभ*

त्यामुळे आपल्या देशात आधुनिक काळात संशोधनाची पायाभरणी ब्रिटिशानीच केलेली असावी हे क्रमप्राप्तच होते. विल्यम जोन्स यानी इ. स. १७८४ मध्ये 'एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल' ही संस्था स्थापन केली. तिचे उद्दिष्ट

" आशियाचा प्राचीन इतिहास, प्राचीन अवशेष, कला, शास्त्रे व वाङ्मय इत्यादींचा अभ्यास करणे " हे होते (Society for inquiring into the history, civil and national, the antiquities, arts, sciences and literature of Asia.)* आशियातला हा पहिलाच सशोधनविषयक उपक्रम होय, असे म्हणता येते असाच प्रकारचा उपक्रम सर जेम्स मॅकिंटॉश यानी महाराष्ट्रात केला त्यानी इ स १८०४ मध्ये ' एशियाटिक सोसायटी ऑफ् बाँबे ' ही सस्था वरील सस्थेच्या धर्तीवरच काढली व महाराष्ट्रात आधुनिक ज्ञानोपासनेची मूहूर्तमेढ रोवली ‡ म्हणजे हा उपक्रम महाराष्ट्रात इग्रजी अमल प्रस्थापित होण्यापूर्वी झाला आहे, हे लक्षात घेणे जरूर आहे एक गोष्ट ध्यानात येते की प्रबोधन-कालीन चिकित्सक वृत्तीला प्राचीन इतिहास वा सस्कृती याचे वावडे नमून वेड आहे, पराकाष्ठेचे आकर्षण आहे

स्वत च्या इतिहास-सस्कृतीमबधी औत्सुक्य ठीक आहे पण आशियाच्या इतिहास-सस्कृतीविषयी या 'व्यापाऱ्या'ना एवढे प्रेम असण्याचे कारण काय ? त्याचे उत्तर प्रबोधनाच्या चळवळीच्या दुसऱ्या वैशिष्ट्यात आहे व ते वैशिष्ट्य म्हणजे एक प्रकारचा मानवतावाद (ह्युमॅनिझम) होय ब्रिटिश व्यापारी ह्या दोन वृत्तीनी सस्कारित झालेले होते व म्हणून त्यानी प्रथम आशियाचे लोक व सस्कृती समजून घेण्याचा प्रयत्न केला गॅझेटियरचा उपक्रम या वृत्तीची साक्ष देईल

त्यामुळेच पुढे जेव्हा शिक्षणाचा प्रश्न निर्माण झाला तेव्हा एतद्देशीयास त्याच्याच भाषात व त्याच्याच सस्कृतीचे शिक्षण द्यावे असे प्रारभी ठरले होते त्याप्रमाणे प्रमुख शहरी पाठशाला व मदरसे स्थापनही झाले होते मेकॉलेच्या प्रसिद्ध खलित्यानतर सर्वच धोरण बदलले हा भाग वेगळा तो बदल घडून येण्यासही राममोहन रॉय यामारखे भारतीयही कारणीभूत झालेले आहेत हे लक्षात घेणे जरूर आहे ब्रिटिश राज्यकर्ते राजकीय वा आर्थिक दृष्टीने जरी निष्ठुर होते तरी सस्कृतीप्रेमाचा, ज्ञानसाधनेचा ओघ त्याच्या अतरगातून अखडपणे वाहात होता असे दिसून येईल स्वत च्या साम्राज्यशाही धोरणाबद्दल व करडेपणाबद्दल त्यात असलेल्या आणि

---

*या सोसायटीचा उद्देश या खडप्राय देशातील इतिहासाचा, त्यातील समाज- [illegible]

[illegible]

करून एकमकाना प्रोत्साहन द्यावे ' असा होता लवकरच या सस्थेचे उत्तम ग्रथालय तयार होऊ लागले व सशोधन प्रसिद्ध करण्याकरता सोसायटीचे एक त्रैमासिकही सुरू झाले —'महाराष्ट्र जीवन' ख २ पृ १३९

‡डॉ वाळिंबे रा श 'आधुनिक महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना'

त्यामुळेच भारतीय जनतेत अप्रिय झालेल्या लॉर्ड कर्झनने इ स १९०४ मध्ये भारतीय पुराण वस्तु-संशोधन खाते स्थापन केले प्राचीन वास्तुकलेचे त्याला विलक्षण आकर्षण होते *

## मुद्रणाचे साह्य

प्रबोधनाची सुरवात राष्ट्रीय अस्मितेच्या जाणिवेने होते जीवनविषयक दृष्टीत अपार उत्सुकता हे प्रबोधनाचे एक वैशिष्ट्य होय असे आपण पाहिले ह्या औत्सुक्य-पूर्तीसाठी देशाच्या इतिहास–संस्कृतीकडे विचारवंताचे लक्ष जाते समकालीन समस्यांच्या सोडवणुकीसाठी माणसे इतिहासाकडे वळतात आपल्याकडेही असेच झाले १८५७ मध्ये नवी विद्यापीठे स्थापन झाल्यानंतर सुशिक्षितांच्या ज्या पिढ्या पुढे येऊ लागल्या, त्यांचे लक्ष प्रामुख्याने इतिहासाकडेच वळले न्यायमूर्ती रानडयांनी प्राचीन संतांच्या कार्याचे मूल्यमापन केले व 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' हा ग्रंथ याच दृष्टीने लिहिला महाराष्ट्रात संशोधनास सुरुवात जरी श्री नी ज कीर्तने यांच्या ग्रँट डफच्या इतिहासावरील निबंधाने इ स १८६७ मध्ये झाली, तरी 'काव्येतिहास-संग्रह' ह्या इ स १८७८त निघालेल्या व अकरा वर्षे चाललेल्या मासिकाने संशोधनाचे नवेच युग महाराष्ट्रात निर्माण केले यूरपमध्ये ज्याप्रमाणे मुद्रणकला संशोधकाच्या मदतीस आली तसाच प्रकार येथेही झाला निर्णयसागर प्रेसमधून बहुमूल्य संस्कृत ग्रंथ छापून बाहेर पडले, तसेच 'काव्येतिहाससंग्रहा'मधून २२ बखरी मुद्रित झाल्या व इतर ५०१ जुनी पत्रे प्रकाशित झाली यावरून इतिहासाबद्दलचे जबरदस्त आकर्षण निर्माण झाले असावे असे स्पष्ट होते 'काव्येतिहाससंग्रह' बंद पडल्यावर 'काव्यसंग्रह' ह्या नावाने प्रकाशित होणाऱ्या मासिकातून जुनी कविता मुद्रित होत राहिली होती साने, खरे, पारसनीस व राजवाडे यांनी महाराष्ट्रात इतिहास-संशोधनाचे नवे युग निर्माण केले व म्हणूनच प्रा पोतदार त्यांना 'मुनि चतुष्टय' म्हणतात ह्यानंतर संशोधकांची एक परंपराच महाराष्ट्रात तयार झालेली दिसते व्यक्तिगत प्रयत्नाप्रमाणे 'भारत इतिहास संशोधक मंडळा'च्या स्थापनेने संस्थारूप प्रयत्नही झाले इतिहासाची साधने शोधली व जमविली जाऊ लागली, आणि या क्षेत्रात उदंड कार्य महाराष्ट्रात झाले आहे

*ताजमहाल बांधला गेला तेव्हा त्या शिल्पास साजेसा असा एक संगमरवरी दिवा त्या इमारतीसाठी तयार केला होता पुढच्या धामधुमीत तो तेथून नष्ट झाला कर्झनने मध्यपूर्वेतील देशांत कारागिरांचा शोध करावयास माणसे पाठवून त्यांच्या-कडून त्या शिल्पास साजेसा दिवा तयार करवून घेतला

अनेक ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना प्राचीन भारतीय संस्कृती व जीवन यांविषयी अपार औत्सुक्य होते

अशा प्रकारे महाराष्ट्रात सशोधनाची परपरा प्राय राष्ट्रीय अभिमानातून निर्माण झाली पहिले पहिले म्हणजे बखरीपर्यंतचे सशोधन तर केवळ राष्ट्रीय अभिमानाच्या तीव्र जाणिवेतून होत होते 'माला'कार चिपळूणकराच्या लिखाणातून मिळालेली स्फूर्ती त्याच्या मागे होती पण पुढे पुढे शास्त्रीय चिकित्साशास्त्राचे महत्त्व वाढत गेले व त्याचा इतिहास-सशोधनावर मोठा परिणाम झाला म्हणजे पत्रव्यवहारासारख्या इतर कागदपत्राचे महत्त्व ध्यानात आले इतिहास-सशोधनाचा चेहरामोहरा पूर्वकालीन पत्रव्यवहार, कागदपत्रे, उदा , कबुलायती, जाहीरनामे इ कडे वळला त्यानतर १९१५–२० च्या सुमारास भाडारकर प्राच्य-विद्या-सशोधन सस्था, पुणे, प्राज्ञ पाठशाळा, वाई इ सारख्या ह्या कार्यास वाहिलेल्या अशा सस्था निघाल्या निरनिराळ्या क्षेत्रातले लोक सशोधनाकडे आकृष्ट होऊ लागले सशोधनाची सर्वच प्रकारातील व्याप्ती वाढली व सशोधन म्हणजे इतिहास-सशोधन वा प्राच्य जीवन-सस्कृती सशोधन असा एक समज किंवा समीकरण पक्के झाले, अद्यापही कित्येकाची समजूत तशीच आहे देश पारतत्र्यात सापडल्यामुळे त्याच्या सस्कृती परपरेची परकीय राज्यकर्त्याकडून उपेक्षा होण्याची शक्यता असल्याने, आपल्या सस्कृती-परपरेचा अभिमान आपण जागरूकतेने टिकवावयास हवा ही जाणीव राष्ट्राभिमानी विचारवत कार्यकर्ते याच्या ठिकाणी प्रबल होती तिचा एक परिणाम ही समजूत दृढ होण्यात झालेला असावा

### *संशोधनाचे सर्वगामित्व*

यूरपमध्ये प्रबोधनाच्या चळवळीतून चिकित्सावृत्तीचा उदय झाला, तरी प्रबोधनानतर झालेल्या धर्मसुधारणेच्या चळवळीने ह्या चिकित्सकवृत्तीचे आधुनिक बुद्धिवादात रूपातर झाले त्यातून आजपर्यंतची अखड सामाजिक व शास्त्रीय प्रगती सभवलेली आहे गेली चार पाच शतके यूरपची प्रगती ही अखडपणे चालू असल्याने सशोधनवृत्तीस निरनिराळी क्षेत्रे तिकडे उपलब्ध झालेली आहेत त्यामुळे सशोधनाबाबतची आधुनिक म्हणजेच पाश्चात्य कल्पना बरीच व्यापक आहे सशोधन ही एक प्रवृत्ती असून ती कोणत्याही एका क्षेत्रापुरती मर्यादित आहे असे नव्हे तिने जीवनाची सर्वच क्षेत्रे व्यापलेली आहेत इतकेच नव्हे तर सशोधन हे जीवनाच्या सर्व क्षेत्राचा कणा झालेले आहे आज जीवनाचे असे एकही क्षेत्र नाही की ज्यात सशोधनाचा उपयोग केला जात नाही म्हणूनच विद्यापीठातून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्याच्या ठिकाणी एक प्रकारची सशोधन-मनस्कता (रीसर्च-माइडेडनेस) असावयास हवी अशी आवश्यकता आज निर्माण झालेली आहे

पाश्चात्य देशात अशी अगदी उलट परिस्थिती आहे आपल्याकडे संशोधन म्हणजे ऐतिहासिक वा पुराणवस्तु संशोधन असा संकेत रूढ झाला आहे, त्याप्रमाणे त्याच्याकडे संशोधन म्हणजे औद्योगिक वा यांत्रिक (इंडस्ट्रिअल रीसर्च) संशोधन असाच संकेत प्रामुख्याने रूढ झाला आहे अर्थात वैज्ञानिक व प्रायोगिक संशोधनाची पार्श्वभूमी त्याला आहे हे खरे आहे याचे एक गमक म्हणजे 'ब्रिटानिका' या व इतर विश्वकोशात संशोधन (रीसर्च) या सदराखाली एकदम औद्योगिक संशोधना-संबंधीचीच माहिती दिली आहे आपण ज्याला ऐतिहासिक संशोधन म्हणतो त्याचे स्थानी 'हिस्टॉरिऑग्रॅफी' असे एक स्वतंत्र शास्त्रच मानले आहे संशोधनासंबंधीच्या कल्पनामध्ये मूलभूत किती स्वरूपाचा बदल घडून आलेला आहे ह्याची यावरून कल्पना येऊ शकेल

## संशोधन पाश्चात्य जीवनाशी एकरूप आहे

औद्योगिक व यांत्रिक क्षेत्रातील संशोधनामुळे संशोधन हे पाश्चात्य जीवनाशी अगदी एकजीव झालेले आहे निरनिराळ्या वस्तूंचे उत्पादक, कारखानदार, इत्यादी आपल्या मालाचा दर्जा व खप नुसता तोच न राहता एकसारखा वाढत राहावा म्हणून त्या संशोधनास वाहिलेल्या प्रयोगशाळा चालवितात त्याच्याद्वारे तत्क्षेत्रीय लहानमोठ्या अडचणींचा परिहार केला जातो एखादी अडचण जर मूलभूत स्वरूपाची असेल तर एखाद्या विद्यापीठाच्या संशोधनविभागाची मदत मागविली जाते व विद्यापीठही ती मोठ्या आनंदाने देते निरनिराळ्या शिक्षणसंस्था, नगर-पालिकासारख्या तसेच व्यापार व अर्थक्षेत्रीय संस्था, सहकारी संस्था, बँका इ सर्वांना आपल्या अडचणींचा परिहार करून घेण्यासाठी संशोधनाची मदत घ्यावीशी वाटते ह्या वस्तुस्थितीमुळे तिकडील संशोधन त्यांच्या जीवनात पूर्णपणे मिसळून गेले आहे संशोधनावर होणारा खर्च हा वाया जाणारा खर्च नाही, तो एक भांडवली स्वरूपाचा खर्च (इन्व्हेस्टमेंट) आहे असे त्यांना अनुभवामुळे पटलेले आहे सर्व समाजाच्या सर्व क्षेत्रांची गती अविरत राहाण्याचे मुख्य साधन म्हणजे संशोधन होय, हे तिकडे सर्वांना मान्य झालेले आहे

आमच्याकडील ह्या बाबतीतली परिस्थिती केवळ अनुकंपनीय आहे औद्योगिक, यांत्रिक क्षेत्रात तरी आम्ही अद्याप पावेतो पाश्चात्यांनी केलेल्या प्रगतीची उसनवारी करून आमची गुजराण भागवून घेत आहोत सर्वसामान्य ग्राहक व कारखानदार वा उत्पादक या बाबतीत अद्याप तेवढा जागरूक झालेला नाही तथापि ही स्थिती फार काल टिकेल वा टिकावी असे नव्हे अर्थात् ह्या प्रबंधामधील भूमिकेच्या दृष्टीने औद्योगिक वा यांत्रिक क्षेत्रातील संशोधन हा या बाबतीत संबंधी विषय नव्हे पण

संशोधन म्हटल्यावर ज्या अनेक विषयांची नावे पुढे येतात त्यापैकी हा एक विषय असल्याने त्याच्याकडे एवढा अंगुलिनिर्देश केला. उच्च संशोधनाशी वा स्थिर स्वरूपाच्या संशोधनाशी त्याचा संबंध थोडा दूरत्वानेच आहे, हे लक्षात धरणे आवश्यक आहे.

### *संशोधन व विविध शास्त्रे*

ज्ञानाच्या मार्गेतील बदलाबरोबर संशोधनाचे स्वरूपही बदलते. आजच्या ज्ञानशाखांचे विभक्तीकरण सामान्यत: पुढील प्रमाणे केले जाते. (१) विज्ञानशास्त्रे. यात पदार्थविज्ञान, रसायन (फिजिक्स, केमिस्ट्री) यांसारखी शुद्ध (प्युअर) शास्त्रे येतात; त्याचप्रमाणे वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र वगैरे (बॉटनी, झुलॉजी) यांसारखी जीवशास्त्रेही येतात ही ज्ञानाची पहिली महत्त्वाची शाखा दुसरा मोठा विभाग म्हणजे सामाजिक शास्त्रांचा त्यात इतिहास, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र इत्यादींसारखी सामाजिक शास्त्रे पडतात. त्याशिवाय व्यक्तिगत भावना, विचार, तत्त्वज्ञान, आविष्कार इत्यादींना प्राधान्य असणाऱ्या शास्त्रांचा एक तिसरा गट मानला जातो. त्यात प्राय साहित्य, कला, तत्त्वज्ञान, मानसशास्त्र इ. चा समावेश होतो. ही सारी शास्त्रे आजकाल बरीच विकसित झालेली आहेत व प्रत्येकात नव्या नव्या संशोधनाची भर पडत आहे किंबहुना नव्या संशोधनाच्या जोरावरच ही शास्त्रे अद्ययावत ठेविली जातात ह्या शिवाय वर उल्लेखिलेला औद्योगिक संशोधनाचा विकास एवढ्या प्रचंड प्रमाणावर झालेला आहे की, तसल्या प्रकारचे संशोधन हाच एक व्यवसाय सुधारलेल्या राष्ट्रात निर्माण झालेला आहे. अलीकडे ह्या निरनिराळ्या वैज्ञानिक शास्त्रामधील सीमारेषा पुसट होऊन सर्वसमावेशक असा प्रकारचा तंत्रविद्या (टेक्नॉलॉजी) हा एक नवाच शब्दप्रयोग व नवेच क्षेत्र अस्तित्वात आलेले आहे संशोधनाचे क्षेत्र आजकाल किती व्यापक झाले आहे व संशोधन म्हटल्यानंतर निरनिराळ्या क्षेत्रात त्याचा किती विविध प्रकारचा अर्थ होतो याची कल्पना ह्यावरून येऊ शकेल.

### *थोडेसे तात्त्विक*

एवढे मात्र खरे की, प्रत्येक क्षेत्रातील संशोधनाचे स्वरूप जरी भिन्न असले तरी त्या मागील वृत्ती वा भूमिका ही समान आहे वेब्स्टरच्या कोशात संशोधन (रीसर्च)ची व्याख्या अशी आहे : "Research is a careful or critical inquiry or examination in seeking facts or principles; deligent investigation in order to ascertaining something " ही त्यातल्या त्यात

सर्वसंग्राहक व्याख्या आहे एका बाजूने भौतिक शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञानी तर दुसऱ्या बाजूने शरीरशास्त्रज्ञ (फिजिशियन) व यंत्रज्ञ (मेकॅनिक) या दोघांनाही ती उपयुक्त व स्वीकार्य अशी आहे थोडीशी व्याप्ती कमी करून संशोधनाची व्याख्या अशी करता येईल Research is the manipulation of things, concepts or symbols for the purpose of generalizing to extend correct or verify knowledge whether that knowledge aids in construction of a theory or in practice of an art. The mechanic or physician is a research worker only when he attempts to generalize about all automobiles or all patients of a given class" [Encyclopaedia of Social Sciences Vol III]

ही व्याख्या अधिक प्रमाणभूत मानावी लागेल ऑक्सफर्ड कोशात 'रीसर्च'ची व्याख्या अशी आहे 'Studious inquiry, usually critical and exhaustive investigation of or experimentation having for its aim the revision of accepted conclusions in the light of newly discovered facts.' याचाच अर्थ संशोधनाची व्याख्या कोणत्यातरी संदर्भात करण्याचा निरनिराळ्या कोशांचा प्रयत्न आहे य रा दाते संपादित शब्दकोशात 'नवीन शोध लावण्याची क्रिया, तपासणी, चौकशी' असे अर्थ दिले आहेत आपल्याकडे हा शब्द कसा आला हे अ का प्रियोळकरांनी आपल्या एका लेखात स्पष्ट केले आहे तो लेख 'प्रिय आणि अप्रिय' या त्यांच्या अलीकडच्या ग्रंथात आला आहे

संशोधनाबाबतच्या आणखीही काही व्याख्या विचारात घेण्यासारख्या आहेत प्रमुख शब्दकोशामधील या व्याख्यांची पाहणी करता अखेर असे दिसते की, शास्त्रीय वा वैज्ञानिक पद्धती व संशोधन ह्या कल्पना परस्पराशी अत्यंत घनिष्टपणे निगडित झालेल्या आहेत वित्येकांच्या मते त्या समानार्थी (सिनॉनिम्स) आहेत

Research ivolves more systematic structure of investigation, usually resulting from some sort of and record of procedures, and report of results or conclusions

कोणताही विषय असला तरी सामान्यत संशोधनासंबंधीची ही कल्पना सर्वसामान्यत गृहीत धरावयास हरकत नाही संशोधनाची सर्वसामान्य वैशिष्ट्ये —

(१) संशोधन म्हणजे नवीन ज्ञान किंवा माहिती (फॅक्टस) मिळविणे तिचा प्रामुख्याने पायाभूत माहिती (डेटा) म्हणून उपयोग करणे व ही माहिती किंवा हे ज्ञान अत्यंत विश्वसनीय अशा साधनांपासून (फर्स्ट हॅंड सोर्सेस) मिळविलेली असते

कित्येक वेळा एखादे तत्त्व पण विवरणासाठी शोधून काढून ते आधाराला घेतलेले असते

(२) संशोधनात अतिशय पद्धतशीर, बिनचूक व तज्ज्ञतेवर आधारलेली सूक्ष्म पाहणी अपेक्षित असते हाती घेतलेल्या प्रश्नाविषयी किंवा विषयाविषयी अगोदर किती काम झालेले आहे याची संशोधकाला योग्य जाणीव असावी लागते

(३) संशोधनात तर्कशुद्धता, वस्तुनिष्ठता ह्या गोष्टी अंतिम महत्त्वाच्या आहेत मिळविलेली पायाभूत माहिती शक्य तेवढ्या कसोट्या लावून पारखून घेतलेली असते तीच गोष्ट अवलंबिल्या जाणाऱ्या पद्धती (प्रोसीजर)विषयी.

(४) संशोधनात गुणाचा विचार करून मिळविलेल्या माहितीची किंवा ज्ञानाची पुनर्मांडणी केलेली असते ते काम अतिशय दक्षतेने व सावधपणे व्हावे लागते त्यावर संशोधनाचे बरेच मौलिकत्व अवलंबून असते

## *अवलंबन संशोधन*

हे सगळे तात्त्विक किंवा बुद्धिप्रधान क्षेत्रातील संशोधनासंबंधी म्हणता येईल पण पाश्चात्य देशात संशोधन हा शब्द व ही कल्पना प्रामुख्याने यांत्रिक क्षेत्राशी निगडित झालेली आहे ते संशोधन विशिष्ट प्रात्यक्षिक उपयोगाच्या दृष्टीने चालते विक्रीच्या मालाच्या प्रती, यंत्रे, विविधवस्तू इ सर्व अद्ययावत संशोधनाने अधिकाधिक आकर्षक, उपयुक्त, टिकाऊ, स्वस्त इ गुणांनी युक्त अशा बनविल्या जातात पाश्चात्य राष्ट्रात संशोधन या गोष्टीशी संबद्ध आहे आजच्या आपल्या जीवनातील रोजच्या व्यवहारातील शेकडा ९० पेक्षाही अधिक वस्तू या प्रकारच्या संशोधनाने सिद्ध झालेल्या आहेत, अगर सम्कारित झालेल्या आहेत या साऱ्या संशोधनास अवलंबन संशोधन ऊर्फ 'अप्लाईड रीसर्च' अशी संज्ञा प्राप्त झालेली आहे असल्या प्रकारचे संशोधन भारतातही सुरू झालेले आहे ते सध्या निरनिराळ्या २९ राष्ट्रीय प्रयोगशाळातून चालविले जाते आजच्या जगात संशोधन म्हटले की हा सारा पसारा डोळ्यापुढे उभा राहतो हा किती विविध स्वरूपाचा आहे हे लक्षात येण्यासाठी खालील उल्लेख समर्पक वाटेल

कोलीअरच्या विश्वकोशात 'संशोधन' (रीसर्च) या सदराखाली संशोधनाच्या इतक्या विविध क्षेत्राचा उल्लेख आलेला आहे

| | |
|---|---|
| Advertizing प्रसिद्धी | Agricultural कृषिविषयक |
| Anthropological मानववंशशास्त्रीय | Archeological उत्खननसंबद्ध |
| Atomic आण्विक | Biological जीवशास्त्रीय |

| | |
|---|---|
| Chemical रासायनिक | Geneological अनुवंशशास्त्रीय |
| Historical ऐतिहासिक | Industrial औद्योगिक |
| Linguistic भाषिक | Medical औषधी |
| Mathematical गणिती | Physical भौतिकी |
| Public Opinion लोकमत | Social सामाजिक |
| Market बाजार | Library ग्रंथालयविषयक |

[ यात वाङमयाला स्थान नाही हे लक्षणीय आहे ]

## आजकालच्या संशोधनाचे स्वरूप

आजकालचे संशोधन हे विविध घटकाकडून वा संस्थाकडून विविध प्रकारानी पार पाडले जाते अगदी पायऱ्यामी औद्योगिक वा यांत्रिक संशोधनासारखा मोठा व सर्वसमावेशक विभाग आहे त्यात चालू असलेले संशोधन विशिष्ट उपयुक्ततावादी उद्देशाने चाललेले असते विशिष्ट क्षेत्रात आलेल्या विविध अडचणींचा परिहार करण्यासाठी ते केले जाते हे प्राय खाजगी वा सरकारी उत्पादक संस्थाकडून होते हे संशोधन रोजच्या जीवनाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे असले तरी त्याला तात्त्विक वा सार्वकालिक अधिष्ठान वा महत्त्व फारसे नसते (पण त्यामुळे याचे महत्त्व कमी होते असे नव्हे )

मानतरचा अगदी दुसऱ्या टोकाचा विभाग म्हणजे तात्त्विक व मौलिक संशोधनाचा ते उच्च संशोधन-संस्था व प्रयोगशाळा यांच्याकडून होते या ठिकाणी अतिशय मूलभूत स्वरूपाचे व तात्त्विक (फंडामेंटल) संशोधन केले जाते त्या संशोधनाचा रोजच्या जीवनाशी संबंध दूरचा असतो, तथापि त्या त्या क्षेत्राची प्रगती होण्यासाठी हे संशोधन अत्यवश्य असते मूलभूत स्वरूपाचे मोठमोठे शोध ह्या ठिकाणी लागतात पंडित नेहरूनी मोठ्या आग्रहाने अशा प्रकारच्या संशोधन करणाऱ्या 'राष्ट्रीय प्रयोगशाळा'ची जी उभारणी केली ती ह्या दृष्टीने महत्त्वाची आहे देशाला संशोधनाच्या आघाडीवर राहण्यास हेच संशोधन कारणीभूत होते तरुण पिढीची बौद्धिक भूक भागविण्यासाठी व संशोधनानुकुल अशी तिची मनोवृत्ती तयार करण्यासाठी हे संशोधन अत्यवश्य असते

ह्या शिवाय लष्करी (मिलिटरी), यांत्रिकी (इंजिनिअरिंग), शेतकी, आरोग्य इत्यादी क्षेत्रात सरकारी प्रेरणेने व पुढाकाराने पुष्कळसे संशोधन चालू असते हे राष्ट्रीय सरक्षण, संवर्धन इत्यादी दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे असते हे वर उल्लेखिलेल्या कार्यकारी (अ‍ॅप्लाईड) संशोधनाचाच एक भाग म्हणता येईल

सामाजिक शास्त्रे ही वैज्ञानिक शास्त्राच्या मानाने तशी अलीकडची आहेत ती अद्याप 'शास्त्र' या दृष्टीने विकास पावत आहेत त्याच्या विकासातही सशोधनाला फार महत्त्वाचे स्थान आहे ही जाणीव आज सर्वत्र निर्माण झाली आहे वैज्ञानिक सशोधनात ज्याप्रमाणे औद्योगिक वा तात्रिक सशोधनास विशेष स्थान आहे, त्या सशोधनामुळेच जीवनाच्या दररोजच्या प्रगतीस सशोधनाचा हातभार लागत आहे, त्याप्रमाणे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधनास अद्याप तशा प्रकारचे महत्त्व प्राप्त झाले नाही तथापि शैक्षणिक व मानसशास्त्रीय क्षेत्रात सुधारलेल्या देशात बरेच सशोधन झाले आहे, होत आहे, की ज्यायोगे सशोधन हे याही क्षेत्रात जीवनाशी अधिकाधिक सबद्ध होत आहे, म्हणजे विज्ञानक्षेत्रीय सशोधनात, तत्र-विषयक व औद्योगिक सशोधनास जे स्थान आहे तेच सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधनात शिक्षण व मानसशास्त्रीय सशोधनास आहे या सशोधनास प्रात्यक्षिक सशोधन (ॲक्टिव्ह रिसर्च) अशी सज्ञा प्राप्त झाली आहे म्हणजे हे सशोधन प्राय कोणती तरी उपयुक्तता पुढे धरून चालू असते विज्ञानक्षेत्रात ज्याप्रमाणे उच्चतर वा मूलभूत प्रकारचे सशोधन चालू आहे त्याप्रमाणे ह्याही क्षेत्रात तसल्या प्रकारचे सशोधन त्या त्या विषयाला वाहिलेल्या उच्च सशोधकाकडून होते

### *वैज्ञानिक व सामाजिक शास्त्रे : साम्य व भेद*

विज्ञानशास्त्रीय व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधनातील महत्त्वाचा फरक असा की, विज्ञानक्षेत्रीय सशोधनाच्या पद्धती, दृष्टिकोण हे निश्चित झालेले आहेत सामाजिक शास्त्राच्या बाबतीत तशा पद्धतीची निश्चित अशी निर्मिती अद्याप झालेली नाही तथापि अलिकडे वैज्ञानिक क्षेत्राप्रमाणे ह्याही क्षेत्रातील सशोधनात पुष्कळच शिस्त निर्माण झालेली असून तिची व्याप्ती व महत्त्व दिवसे-दिवस वाढत आहे या क्षेत्रातील सशोधनाचे स्वरूप अधिक विस्ताराने पुढे एका प्रकरणात पाहावयाचे आहेच

वैज्ञानिक शास्त्राचे वैशिष्ट्य असे की त्याच्या सीमारेषा बऱ्याच निश्चित झालेल्या आहेत अर्थात तेथेही काही विषय असे आहेत की त्याच्या सीमारेषा अनेक शास्त्राना भेदून जातात उदाहरणार्थ, आण्विक सशोधन हे पदार्थविज्ञान (फिजिक्स), रसायन (केमिस्ट्री) व धातुशास्त्र (मेटॅलर्जी) या तीन स्वयपूर्ण शास्त्राच्या सहकार्याने चालू असते सामाजिक शास्त्राच्या बाबतीत तर या सीमारेषा फारच पुसट होतात आर्थिक वा राजकीय क्षेत्रीय इतिहास हा अर्थशास्त्र व राज्यशास्त्र ह्या दोन्ही शास्त्राच्या कक्षेत पडू शकतो सीमारेषाच्या अनिश्चिततेमुळे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधन हे बरेच लवचिक झाले आहे मानवी जीवन हे सतत

बदलत असल्याने संशोधनपद्धतिबाबतची लवचीकता सदैव तशीच राहाणार आहे असे दिसते तथापि अलीकडे निरनिराळ्या पद्धतीच्या व मार्गांच्या अवलंबनाने सामाजिक क्षेत्रातील संशोधनही बरेच वस्तुनिष्ठ होत चालले आहे

ह्या वस्तुस्थितीमुळेच संशोधनाच्या या क्षेत्रात विद्यापीठाचे महत्त्व सदैव अपरंपार राहणार आहे पुष्कळसे मूलभूत संशोधन, तसेच व्यवहारोपयोगी संशोधन विद्यापीठे व तत्सम संस्था ह्यानाच करावे लागणार आहे व्यापक दृष्टी व शास्त्रीय पद्धती याचा प्रसार हा अधिकाधिक सापेक्षाने सर्वच क्षेत्रात होत आहे विद्यापीठेच ह्या विशिष्ट वृत्तींचे बीजारोपण व संवर्धन यशस्वी रीतीने करू शकतात व त्यांच्याच नेतृत्वाने हे संशोधन चालणे आवश्यक आहे कारण वैशिष्ट्यीकरणाचा (स्पेशलायझेशन) एक तोटा असा की, संशोधक आपली अस्मिता स्वत च्या शास्त्राशी एकरूप करतो, त्यामुळे फार मोठा मानसशास्त्रीय अडथळा निर्माण होतो व पुढची प्रगती दुस्तर होते अर्थशास्त्रज्ञ म्हणून माल्थस सांगणार की दारिद्र्य, महायुद्धे, उपासमार, रोगराई, साथी, इ सर्व अर्थव्यवहारासाठी आवश्यक आहेत समाजशास्त्रज्ञ म्हणून मनु सांगणार की, उच्चनीचतेवर आधारलेली चातुर्वर्ण्यव्यवस्था इ समाजधारणेसाठी अत्यावश्यक आहे अशा आग्रहीमुळे प्रगती खुंटते विद्यापीठीय शिक्षणात जो एक प्रकारचा व्यापकपणा असतो त्याचा निश्चित असा सुपरिणाम होऊन संशोधनातील तसेच विचारातील एककल्लीपणा जाऊन संशोधन अधिक निर्मळ व निर्लेप होऊ लागेल

## साहित्य कलांचे क्षेत्र व संशोधन

संशोधनाचे तिसरे क्षेत्र म्हणजे कलांचे व वाङ्मयाचे मानवी जीवनात वाङ्मयाचे व कलेचे स्थान अतिशय वैशिष्ट्यपूर्ण आहे मानवी मनाचा, विचाराचा, भावनांचा, आत्म्याचा आविष्कार म्हणून वाङ्मय व कला निर्माण झालेल्या आहेत मानवी मनाची धारणा, विचाराचे स्वरूप, भावनांची उमारणी व मानवी आत्म्याला लागलेल्या कळा ह्या जितक्या सामाजिक आहेत तितक्याच त्या व्यक्तिगतही आहेत त्यांच्यातील व्यक्तिगतता, सामाजिकता व सार्वत्रिकता हा सर्वकाळ चिंतनाचा चर्चेचा, विवेचनाचा विषय राहणार आहे ह्या क्षेत्रातील गूढता व अगम्यता निर्माण होण्यास व वाढण्यास आणखी एक कारण झालेले आहे ह्या क्षेत्राचा एका अतिशय प्रबळ अशा मानवी प्रवृत्तीशी विशेष जवळचा संबंध आहे किंबहुना त्या प्रवृत्तीच्या आविष्कारातूनच साहित्य व कला सजवलेल्या आहेत ती प्रवृत्ती म्हणजे सृजनशीलता, ह्या सृजनशीलतेच्या जोरावर मानवी प्रज्ञेने प्रतिभा साकार केली आणि तिच्या साह्याने साहित्याचे व कलांचे विलोभनीय विश्व माणसाने निर्माण केले

संस्कृतीच्या प्रारंभापासून हे काम तो करीत आलेला आहे व पुढेही ते अखंड चालू राहणार आहे. वैज्ञानिक शास्त्रे ही धारणेने वस्तुनिष्ठ आहेत. सामाजिक शास्त्रे त्याच्या नावाप्रमाणे समाजाधिष्ठित आहेत तर कला व वाङ्मय ही यापेक्षा अगदी वेगळी, मनोनिष्ठ, प्रतिभानिष्ठ व सृजनप्रधान आहेत. साहजिकच ह्या क्षेत्रात संशोधनाबाबत कोणती भूमिका धारण करणे अवश्य आहे ? कोणत्या पद्धतीचा अवलंब करणे अवश्य वा शक्य आहे ? आजपर्यंतचे संशोधन कोणत्या पद्धतीने वा भूमिकेतून झाले ? त्यात काही बदल करण्याची आवश्यकता आहे काय ? वैज्ञानिक व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील वस्तुनिष्ठता येथे येणे शक्य आहे काय ? तिला काही मर्यादा मानाव्या लागतील काय ? सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील व विज्ञानक्षेत्रीय संशोधनाप्रमाणे ह्या क्षेत्रातील संशोधन जीवनाभिमुख करता येईल काय ? असल्यास कोणत्या मर्यादेपर्यंत ? संशोधनाने ज्या ज्या क्षेत्राची वाढ झाली त्यांना एक प्रकारची प्रगल्भता आली, तसे होणे या क्षेत्राच्या बाबतीत शक्य आहे काय ? वैज्ञानिक व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात संशोधनाची व्याप्ती दिवसेंदिवस अखंडपणे वाढत आहे, तशा प्रकारची अखंडता या क्षेत्रातील संशोधनात राहता येणे शक्य आहे काय ? असल्यास त्यासाठी काय करावयास हवे ? प्रगत व प्रगल्भ राष्ट्रात ह्या क्षेत्रातील संशोधनाचे स्वरूप कसे आहे ? इ. प्रश्नांची उत्तरे मिळविण्याच्या दृष्टीने चिकित्सक पाहणी करून आपल्याकडील ह्या क्षेत्रातील संशोधनाचे स्वरूप निश्चित करणे अवश्य आहे. वाङ्मयाच्या व कलेच्या क्षेत्रातला हा पहिलावहिलाच उपक्रम आहे.

## काही अडचणी

ह्या क्षेत्रातील संशोधनाची अपरिहार्यता व त्याचबरोबर त्या अपरिहार्यतेमुळेच काही अडचणीही निर्माण होण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण आहे व ते म्हणजे ह्या कलाची व वाङ्मयाची प्राचीनता.

प्राचीनतेच्या दृष्टीने कला व वाङ्मय ह्यांची तुलना विज्ञानशास्त्राशी होऊ शकेल. एका परीने विज्ञानशास्त्रापेक्षाही प्राचीन अशा ह्या कला व वाङ्मय आहे. त्यामुळे एक प्रकारच्या संशोधनाची अपरिहार्यता निर्माण होते. पण त्याचबरोबर, निर्माण झालेल्या कलेला व वाङ्मयाला कोणतेही समाजशास्त्राचे व विज्ञानशास्त्राचे निकष व संकेत लागू पडत नसल्याने आणि तिचे सृजनशील स्वरूप असेड बदलते असल्याने वस्तुनिष्ठ भूमिकेवरून संशोधन करणेही अशक्य झाले आहे. विशिष्ट काळापुरते, व्यक्तीपुरते, वा कलाकृतीपुरते नियम निर्माण करावेत तरी त्यांचे अवलंबन अपवादभूत व मर्यादित स्वरूपाचेच राहणार. म्हणजे त्यात शास्त्रीय दृष्टीला

अपेक्षित असणारी सर्वव्यापकता राहणार नाही. असा मोठा बिनतोड पेच आहे तथापि मानवी प्रज्ञेने ह्याही अडचणीतून मार्ग काढला आहे मोठमोठे समीक्षक आजपर्यंत होऊन गेलेले आहेत त्यानी ह्या क्षेत्रातील विवरणाचा, चर्चेचा पायडा पाडलेला आहे त्याची मते अपुरी वा चुकीची वाटली तरी तो दोष त्याचा नसून ह्या क्षेत्राच्या वैशिष्ट्यामुळेच ह्या अडचणी निर्माण झालेल्या आहेत हे सारे लक्षात घेऊन साहित्यक्षेत्रीय सशोधनाचे स्वरूप ठरविणे अवश्य झाले आहे

ह्याही क्षेत्रात विद्यापीठाना महत्त्वाची कामगिरी बजावावी लागणार आहे. भाषिक व साहित्यिक सशोधन हा प्रामुख्याने विद्यापीठाच्याच कक्षेतला विषय राहणार आहे निरनिराळ्या सशोधन सस्था महत्त्वाचा हातभार लावू शकल्या तरी एक प्रकारचे समन्वयत्व (को-ऑर्डिनेशन) विद्यापीठाना करावे लागेल असे वाटते त्यासाठी विद्यापीठानी निश्चित कार्यक्रम घेऊन कामास लागले तर ,अधिक चागले होईल ह्या दृष्टीनेच ह्या विषयाचे विवेचन ह्या प्रबधात करावयाचे ठरविले आहे

## विद्यापीठेच का ?

आपल्याकडील सशोधनाचा विचार करताना विद्यापीठाच्या कार्याचा मधून मधून उल्लेख आलेला आहे यूरप-अमेरिकादी पाश्चात्य राष्ट्रात इतिहासाच्या वा जीवन-विकासाच्या ओघावरोवर सशोधन हे उत्क्रात झालेले आहे. लोकाच्या गरजेतून व घडपडीने ते साकार झालेले आहे आणि ते जसजसे विकसित होत गेले तसतशा नव्या सस्था, सघटना, कल्पना अस्तित्वात आल्या आपणाकडील परिस्थिती ही भिन्न आहे म्हणजे येथे सशोधनाविषयीचे औत्सुक्य, त्यासाठी आवश्यक त्या सधि-निर्मितीचे काम व सशोधनाचे परिवर्धन या साऱ्या गोष्टी शासनाला पुढाकार घेऊनच कराव्या लागणार आहेत आणि त्यासाठी विद्यापीठासारख्या स्वायत्त सस्थाना अधिक अवसर देणे अवश्य झाले आहे तर्कशास्त्रीय परिभाषा वापरावयाची तर असे म्हणता येईल की, त्याच्याकडचे सशोधन हे सारे प्राय विगामी (इडक्टिव्ह) प्रकारचे आहे तर आपणाकडील सशोधनाचे स्वरूप हे प्राय निगमनाच्या (डिड-क्टिव्ह) स्वरूपाचेच राहणार आहे आतापर्यंत जे मोठे मोठे विचारवत होऊन गेलेले आहेत त्याना ही जाणीव आहे भारतीय सस्कृतीचा जाज्वल्य अभिमान असूनही पाश्चात्याच्या या क्षेत्रातील वर्चस्वाची जाणीव आपणाकडील श्रेष्ठ विचार-वतानी धरली आहे निदान ह्या क्षेत्रात तरी आपण नवखे आहोत हे त्यानाही मान्य करावे लागले आहे 'भारतातील आर्यसस्कृतीची अवस्थातर' ह्या आपल्या विख्यात ग्रथात म मो कुटे यानी एक ध्येयवचन उद्धृत केले आहे, ते म्हणजे—

'भारतातील आर्यांचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे. आतापर्यंत गेली अनेक शतके गुप्त व जडवत होऊन पडलेल्या भारतीयांच्या जीवनात पाश्चात्य आर्यांनी जोपासिलेल्या उन्नत व उन्नतिकारक अशा बहुरंगी संस्कृतीच्या प्रत्यक्ष संपर्काने नवीन प्राण संचरेल".* तसेच प्रिन्सिपल आगरकर आपल्या एका निबंधात 'आपल्या समाजाची धारणा पाश्चात्य धर्तीवर जाणे हे अपरिहार्य आहे' असा निष्कर्ष काढतात. तर प्रो. पोतदार आपल्या 'अर्वाचीन मराठी साहित्या'तील लेखात म्हणतात—"इतिहासाला पाचवा वेद मानण्याची प्रथा फार जुनी आहे. तथापि काळाच्या कोष्टकात सर्व प्रतिते (फॅक्ट्स) पक्की बसवून मानवसमाजाच्या वर्तुळाचे मंदिर यथार्थरीत्या पाहणे हे जे इतिहासाचे मुख्य कार्य ते कालक्रमाचे अनुसंधान सुटले तर, साधू शकत नाही. पाश्चात्य राष्ट्रात प्रत्येक हजार वर्षांपासून आमच्यापेक्षा अधिक सत्यतेने व निश्चितीने हे मानवदर्शन तिकडील विद्वान घेत आलेले आहेत......आमचे इकडील विद्वान व्यर्थ चाचपडत राहून भलतीकडेच वाहवले आहेत."(पृ. ३२०).

### घरचे वारेच बदलले पाहिजे

अल्प विकसित किंवा अविकसित अशा सर्व देशात सर्वच प्रकारच्या संशोधनाबद्दल एक प्रकारची उत्सुकता निर्माण झालेली असते. त्यासाठी मोठमोठया योजना आखल्या जात आहेत जगातले आजचे वातावरण हे चढाओढीवर आधारलेले असले तरी कोणतेही राष्ट्र मागासलेले असता कामा नये यावद्दल सर्व राष्ट्रांचे एकमत झालेले आहे. पुढारलेल्या राष्ट्रांच्या बरोबर यावे अशी अविकसित राष्ट्रात जबरदस्त मनीषा निर्माण झाली आहे. तिच्या परिपूर्तीसाठी प्रत्येक देशास संशोधनाची व्यापक आवश्यकता भासू लागली आहे. तेहतीस वर्षांपूर्वी प्रा. माटे यानी आपल्या 'विज्ञानबोधा'च्या प्रस्तावनेत 'घरचे वारेच बदलले पाहिजे' अशी अपेक्षा व्यक्त केली होती. त्यानी ती आशा प्रामुख्याने विज्ञानाला केंद्रस्थानी कल्पून केली होती, पण आज जगाच्या प्रगतीची गुरुकिल्ली 'संशोधना'त आहे, ज्ञानात आहे, ज्ञानसाधनेत आहे हे लक्षात घेऊन त्या वृत्तीला उजळा देणे अवश्य आहे. तसेच आजच्या आपल्या राष्ट्रीय नेत्यानी जो कृषि-औद्योगिक-समाज निर्माण करण्याचा संकल्प सोडलेला आहे त्याचा पाया व्यापक अर्थाने संशोधन'-हाच राहणार आहे. त्या दृष्टीने "घरचे सारे वारेच बदलले पाहिजे" ह्या शब्दमहतीला आज नवाच अर्थ प्राप्त झालेला आहे.

[* महाराष्ट्र जीवन : खंड २]

२

# वैज्ञानिक व सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रांतील संशोधन

## ‘ज्ञाना’बाबतची बदलती कल्पना

मागील प्रकरणात विज्ञानशास्त्रे, सामाजिक शास्त्रे, तसेच मानवाच्या अंतरंगाचे दर्शन घडविणारी मानवशास्त्रे ( ह्यूमॅनिटीज ) व कला ह्यांच्या कक्षातील वेगवेगळेपणा पाहिला. प्रत्यही नव्या नव्या संशोधनाने ही शास्त्रे व कला ही अधिकाधिक समृद्ध होत आहेत हेही लक्षात घेतले आहे.

ज्ञानक्षेत्रात एकावेळी आपणाकडे अध्यात्मविद्येला अतिशय महत्त्वाचे स्थान असे. ‘अध्यात्मविद्या विद्यानाम् ॥’ ह्या सुभाषितावरून तेच स्पष्ट होते. आधुनिक युगास सुरवात झाल्यानंतरही हे महत्त्व तत्त्वज्ञानास दिले जाऊ लागले. तत्त्वज्ञान हे शास्त्राचे शास्त्र गणले गेले.

गेली चारपाच शतके विज्ञानशास्त्राची दौड सुरू आहे. त्याचा परिणाम माणसाच्या ज्ञानग्रहणाच्या पद्धतीवर फार झालेला आहे. आज ज्ञान म्हणजे बौद्धिक ज्ञान असे आपण मानतो. पूर्वी ज्ञान म्हणजे प्रामुख्याने अध्यात्मज्ञान असे मानीत. त्या ज्ञानाचे माध्यम मन (आत्मा) असे. ज्ञानग्रहणाच्या क्रियेत बुद्धीला त्यामानानं दुय्यम स्थान होते. ज्ञान म्हणजे अध्यात्मज्ञान हे समीकरण अगदी पक्के झाल्याने [illegible]पणेच ‘गुरु’ या संस्थेलाच नव्हे तर व्यक्तीला अपरंपार महत्त्व येणे स्वाभाविक होते. भौतिक ज्ञानाच्या म्हणजेच जगाच्या ज्ञानाच्या फार मोठ्या [illegible] जात असत ते खरे ज्ञान नव्हेच; उलट ते ‘अज्ञान’ [illegible] आहे असे कित्येक जण धरताना दिसतात. ह्या वस्तुस्थितीमुळे आमच्याकडे [illegible]

वाढच होऊ शकली नाही  जीवनोपयोगी म्हणून निरनिराळ्या गोष्टीचे जे ज्ञान होते त्याचे भिन्न व्यवसायात रूपातर झाले  उदा , कृषी, वैद्यक, व्यापार, घरे बाधणे, गाडी इत्यादी करणे, कपडे विणणे, मडकी घडणे इ  इ  त्यात अनेक उपयुक्त कलाही आल्या  या क्षेत्रातील प्राविण्य त्या त्या व्यवसायाच्या अनुषगाने विशिष्ट जमातीच्या पुरतेच मर्यादित ठेवण्यात आले  वडिलोपार्जित वारशाने हे ज्ञान पुढच्या पिढीप्रत येई  म्हणजे बुद्धिनिष्ठ ज्ञानविकासास ते क्षेत्र बद झाले  तीच गोष्ट कलाच्या क्षेत्रातली  सामाजिक जीवनाच्या निरनिराळ्या अगाबाबतही तेच  सामाजिक जीवनात व्रत वैकल्ये उपास  पूजा अर्चा   इ ना महत्त्व आले  त्यासाठी जोडीला पुराणातल्या 'ज्ञानाची' जोड असे म्हणजे बौद्धिक ज्ञानवृद्धीला हेही क्षेत्र बद  उरलेले क्षेत्र अध्यात्माचे  तेथे गुरूच्या अनुग्रहाला महत्त्व म्हणजे बौद्धिक प्रगतीला अवसर नाहीच  आपल्या इतिहासाची गेली हजार वर्षे (काही अपवाद सोडता) अशा प्रकारे केवळ अध पतना (डिकॅडन्स)ची आहेत

याउलट मागील प्रकरणात पहिल्याप्रमाणे यूरोपीय लोकाचे जीवन प्राय भौतिक ज्ञानाधिष्ठित  विज्ञानाधिष्ठित आहे  त्याच्याकडे ही परपरा ग्रीकापासून चालत आलेली आहे  गेल्या चार-पाच शतकात त्यातून वैज्ञानिक वृत्ती निर्माण झाली आहे  ह्या वैज्ञानिक दृष्टीच्या जोरावर त्यानी आधुनिक विज्ञानशास्त्रे सिद्ध केलेली आहेत  मागील प्रकरणात आलेला चौकसपणा उर्फ 'स्पिरिट ऑफ् एनक्वायरी' हा तिचा गाभा  वास्तविक जग काय आहे हे समजून घेण्याची माणसाची मनीषा बरीच प्राचीन आहे  पधराव्या शतकाच्या पुढे लागलेले जे वैज्ञानिक शोध क्रातिकारक ठरले व ज्यानी आजच्या विज्ञानयुगाची पाऊलवाट तयार केली ते किंवा त्यापूर्वीसारखे बरेचसे शोध हे युगमान  सुरू  होण्यापूर्वीही लागले होते  उदा ,

'इ स पूर्वी तिसऱ्या शतकात ॲलेक्झड्रियन लोकापैकी एकाने  वाफेची नौका तयार केली होती  लोकानी ती पाहिली व त्याचे (नुसते) कौतुक केले ग्रीकाच्या मागून  सतराशे वर्षानी कॅप्टन डी गॅरे या नावाच्या एका स्पॅनिश गृहस्थाने वार्सलोना बदरात एक वाफेची नाव तयार केली व तेथल्या तेथे सर्व लोकाना दाखविली

याने काही खेळणे तयार केले आहे असे ते म्हणाले   पृथ्वी गोल आहे व ती फिरत आहे, तसेच ग्रहणे छायमुळे लागतात ह्या गोष्टी काही नवीन नव्हत्या  इ स पूर्वी कित्येक शतके हिंदुस्थानात व ग्रीस देशात त्या माहीत होत्या "

—(विज्ञानबोधाची प्रस्तावना पृ  १७६,७७)

## शास्त्रीयवृत्ती ही हळके हळके बनली

या शोधानी त्यावेळी नवे युग निर्माण केले नाही व पधराव्या शतकानतर मात्र नवे विज्ञान युग निर्माण झाले याचे कारण आधुनिक कालातल्या शोधामागे एक-प्रकारची शास्त्रीय प्रवृत्ती (सायटिफिक ॲटिट्यूड) होती आणि तिचा विकास पद्धत-शीरपणे झाला आहे, होत आहे हे होय विज्ञानाच्या प्रगतीचे मूळ ह्या प्रवृत्तीत आहे. ह्या शास्त्रीय वृत्तीतून आज सर्वप्रसिद्ध असणारी शास्त्रीय पद्धती ( सायटिफिक मेथड ) निर्माण आलेली आहे वैज्ञानिक शोध ते पूर्वीचे काय किंवा आताचे काय, बरेचसे चुकत–माकतच लागले आहेत पण ह्या शास्त्रीय पद्धतीच्या योगाने आजच्या वैज्ञानिक शोधाची एक प्रकारची परपरा त्यामागील कारणमीमासेसह स्पष्टपणे दाखविता येते शास्त्रीय पद्धतीच्यामागे जी तार्किक सुसगती आहे ती सुद्धा टप्प्या टप्प्यानेच विकसित झालेली आहे म्हणजे तर्काच्या साह्याने एका विशिष्ट मर्यादेपर्यंत जाता आले व पुढे जाता आले नाही तर माणसे एखाद्या उपमेचा, दृष्टान्ताचा वा श्रद्धेचा आधार घेऊन समाधान मानीत विज्ञानशास्त्रात असे चालत होते, तर मानवप्रधान शास्त्राची गोष्टच सोडा ग्रह किंवा ग्रहाच्या कक्षा ह्या पूर्ण गोलाकृतीच असल्या पाहिजेत याचे कारण सागताना टॉलेमी या प्रख्यात शास्त्रज्ञाने युक्तिवाद केला की, गोलाकृती ही पूर्णाकृती आहे व परिपूर्ण असा जो परमेश्वर तो कमी परिपूर्ण आकृती वापरील कशाला ? आणि नतर येणाऱ्या अनेक शतकातील शास्त्रज्ञ हे मत खरे मानीत आले आहेत

प्रसिद्ध शास्त्रज्ञ स्टॉल याने ज्वलनक्रियेचा विचार करताना फ्लॉजिस्टनचा शोध लावला त्याचे म्हणणे फ्लॉजिस्टन म्हणजे जळत असलेल्या (पदार्थातून) बाहेर पडत असणारे ज्वालाग्राही तत्त्व होय अधिक ज्वालाग्राही वस्तूत हे तत्त्व अधिक असते असे त्याचे मत 'ज्वाला किंवा ज्योत म्हणजे मुक्त झालेले ज्वलन तत्त्वच' असा त्याचा सिद्धान्त होता व तो बराच क्रातिकारक मानला गेला पण पुढे प्रयोगात असे आढळून आले की एखादी धातू जाळली तर उरलेल्या राखेचे वजन मूळ धातूच्या वजनापेक्षा अधिक भरते म्हणजे ज्वलनक्रिया होताना त्यातला काही अश बाहेर जात असेल, कमी होत असेल तर त्या राखेचे वजन का वाढावे असा प्रश्न पडला त्याचे उत्तर स्टॉलच्या पुरस्कर्त्यांना देता येईना त्यानी उत्तर दिले ते मोठे गमतीचे आहे ते म्हणतात "एखाद्या वस्तूत फ्लॉजिस्टन् अतर्भूत असते तेव्हा त्या वस्तूचे वजन कमी करते पोहणारा मनुष्य कितीही जड असला तरी भोपळा बाधल्यावर त्याचे वजन कमी होते तसेच फ्लॉजिस्टन असते की वजन कमी असणारच ते तुम्ही काढून घेतले म्हणजे भोपळा सोडून घेतलेल्या

माणसाप्रमाणे ती वस्तू जड होते !" अनेक वर्षे ही मीमासा मान्य केली जाई पुढे लवासियेने ज्वलनतत्त्वाचा शोध लावला व हे मत मागे पडले, हा भाग वेगळा 'आपणच निर्माण केलेल्या काल्पनिक कोलदाड्यातून बाहेर पडण्याला माणसाना कित्येक शतके लागली,' असे प्रा माटे म्हणतात ते खरे आहे

## ड्युईप्रणित शास्त्रीय पद्धतीच्या पाच पायऱ्या

तेव्हा शास्त्रीय किंवा वैज्ञानिक पद्धती ही आधुनिक विज्ञानाबरोबर निर्माण झालेली व हलके हलके उत्क्रांत झालेली एक विचारसरणी आहे आणि तिने जीवनाची सर्व अंगागे आज व्यापून टाकलेली दिसतात ह्या शास्त्रीय पद्धतीचे स्वरूप स्पष्ट करण्याऐवजी तिचे विशिष्ट स्वरूप गृहित धरुन शास्त्रीय पद्धतीच्या निरनिराळ्या टप्प्याचे विवेचन सामान्यपणे केले जाते शास्त्रीय पद्धतीच्या पाच टप्प्याचे वर्णन जॉन ड्युई माणसाची विचारक्रिया (अॅक्ट ऑफ् थॉट) स्पष्ट करताना केले ते असे—

(१) कोणतीतरी भासमान झालेली अडचण ( A felt difficulty ),

(२) तिचे स्वरूप व व्याख्या ( Its location and definition ),

(३) शक्य अशा सोडवणुकीची कल्पना ( Suggestion of possible solution ),

(४) त्या कल्पनेवर आधारलेली तार्किक कारणमाला ( Development by reasoning of the bearings of the suggestion ),

(५) पुढील अवलोकन व प्रयाग —व त्याच्या आधाराने सोडवणुकीच्या मार्गाचे स्वीकृतीकरण किंवा अस्वीकृतीकरण ( Further observation and experiment, leading to its acceptance or rejection )

ह्या टप्प्यावरून शास्त्रीय पद्धतीची स्थूलमानाने कल्पना आली तरी शास्त्रीय पद्धतीची सर्वसामान्य अशी व्याख्या अगर प्रक्रिया अशी कोणीच निश्चित करू शकत नाही, हे खरे असले तरी शास्त्रीय पद्धतीमागील भूमिका मात्र एवढी सर्वमान्य आहे, की प्रत्येक क्षेत्राने स्वत करिता वेगळी व स्वत ची अशी शास्त्रीय पद्धती तयार केलेली आहे ड्यूईचे वरील स्पष्टीकरण विज्ञानशास्त्राना पुढे ठेवून झालेले आहे सामाजिक शास्त्राच्या सशोधनात तिचे वेगळेच स्वरूप आधारास घ्यावे लागेल

### शास्त्रीय पद्धतींची विविधता

साराशरूपाने शास्त्रीयपद्धतीसबधी असे म्हणता येईल की, शास्त्रीय पद्धतीने विचार करणाराने पूर्वग्रह टाकले पाहिजेत त्याचप्रमाणे त्याने पूर्वीच्या गृहीत गोष्टीही जशाच्या तशा स्वीकार्य मानणे योग्य नाही तसेच सत्याकडे पाहण्याची त्याला सवय झाली पाहिजे शभर टक्के सूक्ष्म निरीक्षण व प्रयोग यावरच विश्वास ठेवणे ह्या त्याच्या सशोधनाच्या मूलभूत धारणा असावयास हव्यात ज्या ज्या ठिकाणी या पद्धतीचा ऊहापोह केलेला असतो त्या ठिकाणी सत्य सशोधनासाठी म्हणून काही पायऱ्या दिलेल्या असतात डयुईने दिलेल्या पायऱ्याचा उल्लेख वर आलेलाच आहे त्याचेच म्हणणे दुसऱ्या सदर्भात असे माडता येईल—जे घडत आहे त्याचे काळजीपूर्वक अवलोकन करून शास्त्राभ्यासक सत्य घटना जमा करतात, त्याचे गट करतात, नतर पूर्वीच माहीत असलेल्या ज्ञानाच्या साहाय्याने घटनेचा नवीन अर्थ लावण्याचा प्रयत्न करतात त्यानतर नव्याने शोधलेल्या सत्याचे स्पष्टीकरण होईल असा सिद्धान्त किंवा चिन माडतात पूर्वी जे सशोधन झाले असेल त्याच्याशी आपल्या तत्वाची ते तुलना करून पाहतात जर त्याचा सिद्धान्त वस्तुस्थितीशी जुळना नसेल तर त्यात त्यानी बदल किंवा सुधारणा केल्या पाहिजेत, व सतत अधिकाधिक पुरावा मिळवून आपला सिद्धान्त खरा की खोटा ते तपासले पाहिजे

प्रत्येक शास्त्राला साजेसे असे शास्त्रीय पद्धतीचे स्वरूप व तिला अभिप्रेत असलेल्या अवस्था तयार करून घ्याव्या लागतात.

एका प्राणिशास्त्र सशोधकाने अधिक प्रौढ पद्धतीने एका ठिकाणी व्यक्त केलेले मत —शास्त्रीय पद्धतीच्या पायऱ्या विशद करताना तो म्हणतो—'एखादी अनिश्चित स्वरूपाची घटना आहे की काय हे नीट ओळखा ही घटना विरोधात्मक किंवा अप्रसिद्ध असल्याने तिची चिकित्सक चौकशी कितपत आवश्यक आहे ते पाहा नतर आपले प्रमेय नीट माडणे ही पुढची पायरी त्यानतर चाऊचलाऊ कल्पितपक्ष (हायपॉथेसिस) बाधणे ही तिसरी पायरी निरीक्षण करून सशोधनाची नियमबद्ध पद्धत ठरविणे अत्यावश्यक आहे किंवा दोन्ही पद्धतीचा प्रत्यक्ष अवलब करून पाहणे ही चौथी पायरी अपूर्ण पुरावे नोंदणे किंवा जमा करणे ही पाचवी पायरी होय या अपूर्ण पुराव्यापासून अर्थपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण विधान तयार करणे ही सहावी पायरी म्हणता येईल ज्याचा पुरावा अवश्य आहे असे मत निर्धाराने माडा जर हे खरे असेल तर त्यातून पुढचे अदाज बाधावयास हरकत नाही अगोदरच सिद्ध झालेले सत्य व तुमचे मत याची सागड घाला अशा अनुक्रम सात आठ पायऱ्या होत '

विज्ञानशास्त्रे ही एक प्रकारची नाहीत पदार्थविज्ञान, रसायन ह्या सारख्याचा एक गट, तर वनस्पती व प्राणिशास्त्र हा दुसरा गट प्रत्येक शास्त्राच्या प्रकृतीला साजेसे रूप देऊन शास्त्रीय पद्धती वापरली जाते तीत बाह्यागी विविधपणा दृग्गोचर होत असला तरी तिची काही ठराविक सूत्रे समान आहेत याची कल्पना ह्या विवेचनावरून येईल विज्ञानशास्त्रासाठी शास्त्रीय पद्धतीचा जो स्वीकार केला जातो त्यात वरील गोष्टींशिवाय आणखी पुढील बाबींचे महत्त्व मान्य केलेले असते (१) अवलोकन व मापन या दोन्हींत विशिष्ट प्रकारची दक्षता घेतलेली असते (२) प्रयोग शास्त्राच्या संशोधनाचा गाभा हा प्रयोग हा आहे शास्त्रात प्रयोगाना असाधारण स्थान आहे हे प्रयोग विशेष दक्षतेने केले जातात प्रत्येक अवस्थेत ते बारकाईने पारखले जातात व त्याच्या फलितांत (वन्क्ल्यूजन) एक प्रकारचा निश्चितपणा व नेमकेपणा असतो शास्त्रीय सत्य हे प्रयोगसिद्ध असते म्हणून ते विश्वमान्य (युनिव्हर्सल) व निरपवाद असते (३) शास्त्रात गृहीत धरलेल्या कल्पना (कन्सेप्ट्स) ह्याचा आशय विशिष्ट संदर्भात स्पष्ट केलेला (इन्टरप्रिटेड) असतो (४) विषयाचे पृथक्करण करणे व त्यातून सिद्ध झालेल्या विविध घटकाच्या संबंधाची पाहणी करणे तिच्यावरून निगमनात्मक (इंडक्टिव्ह) स्वरूपाचे काही निष्कर्ष काढणे (५) काही विशिष्ट गृहीतपक्ष मानणे व त्याचा उपयोग करणे (६) ह्या गृहीत कृत्याची विश्वसनीयता व अविश्वसनीयता ठरविणे (७) मिळविलेल्या माहितीचे पुनर्संघटन करणे व तिच्या आधारे काही तत्त्वाचा शोध लावण्याचा प्रयत्न करणे या सगळ्या गोष्टी प्रत्येक संशोधन उपक्रमात असतील असे नव्हे, पण थोडेसे कमी जास्त करून विज्ञानसंशोधनात त्याचा वापर करावाच लागतो

### *शास्त्रीय संशोधनाचे वैशिष्ट्य*

विज्ञानाच्या संशोधनात सर्वच अवस्थात निरनिराळ्या प्रकारच्या उपकरणाची आवश्यकता असते कित्येकदा ही उपकरणे अतिशय गुंतागुंतीची असतात व ती वापरण्यासाठीही विशेष प्रकारचे शिक्षण घ्यावे लागते अवलोकन मापन हे अतिशय सूक्ष्म असले तरी ते बिनचूक असावे असा विज्ञानाचा कटाक्ष आहे तथापि प्रयोग कितीही काटेकोरपणे व बिनचूक केलेला असला तरी त्यातून निघालेल्या फलिताचा विचार करता मानवी अपूर्णता लक्षात घेऊन काही अल्प प्रमाणात चूक झालेली असणे शक्य आहे हे गृहीत धरलेले असते अशा प्रकारे मानवी अपूर्णतेने होणाऱ्या चुकांची प्रमाणनिश्चिती हे विज्ञानाचे एक वैशिष्ट्य

शास्त्रीय संशोधन हे कोणत्यातरी विशिष्ट अशा प्रश्नाच्या (प्रॉब्लेम) जाणिवेने सुरू होते प्रयोग व पाहणी करताना त्या प्रश्नाला प्राधान्य मिळेल अशा रीतीने तो प्रश्न वेगळा केला जातो प्रयोगशाळेच्या आधाराने विशिष्ट अशी नियमित (कंट्रोल्ड) परिस्थिती निर्माण करता येते वैज्ञानिक संशोधनाचे ते अनन्य साधारण वैशिष्ट्य आहे शास्त्राच्या प्रकृतीप्रमाणे प्रयोगपद्धतीतही थोडा बदल करावा लागतो उदा., जीवशास्त्र अगर खगोलशास्त्र इ. च्या क्षेत्रातील प्रयोग करताना तारतम्याने खूप बदल करून घ्यावा लागतो पण विज्ञानपद्धतीचा अवलंब—कटाक्षाने केला जाईल असे पाहिले जाते

विज्ञानशास्त्रात प्रयोगाच्या बरोबरीने गणिताचे महत्त्व आहे अनेक वैज्ञानिक शास्त्रे गणिताधिष्ठित आहेत पदार्थविज्ञान तसेच खगोलशास्त्र यात तर गणिताचे स्थान फारच महत्त्वाचे आहे या अर्थानेच गणिताला विज्ञानशास्त्राची सम्राज्ञी (क्वीन ऑफ सायन्सेस) असे म्हटले जाते

प्रयोग प्राधान्यामुळे तसेच गणिताधिष्ठिततेमुळे विज्ञानाचे संशोधन अतिशय गुंतागुंतीचे व त्याचबरोबर कमालीचे महाग व तज्ज्ञावलंबी झालेले आहे यातूनच आधुनिक काळातील तंत्रविद्ये (टेक्नॉलॉजी) चा उगम झाला त्या बरोबरच ते कमालीचे खर्ची म्हणजे वेसरवडी आलेले आहे ते वेळ खाणारे पण झाले आहे असे असले तरी विज्ञानातील यशाने साऱ्या कष्टाची, खर्चाची भरपाई पुढे मागे होते, असा अनुभव सर्वत्र आलेला असल्याने सर्वच राष्ट्रात विज्ञानाचे संशोधन अतिशय आस्थेवाईकपणे, प्रसंगी पोटाला चिमटे घेऊनही चालू आहे जगाच्या कोलाहलात व कलहात टिकून राहण्याचा तो एकमेव मार्ग आहे हे साऱ्या राष्ट्रांना पटलेले आहे; त्यामुळे त्या बाबतीत कोणीही मागे राहावयास तयार नाही

## सामाजिक शास्त्रे उत्क्रांत अशी झाली

शास्त्रीय पद्धतीचा अवलंब निरनिराळ्या शास्त्राकडून—विशेषत सामाजिक शास्त्राकडून भिन्न भिन्न प्रकाराने कसा होतो ते पाहण्यापूर्वी सामाजिक शास्त्रे उत्क्रांत कशी झाली व त्यांना शास्त्रीयत्व कसे प्राप्त झाले ते पाहणे आवश्यक आहे जवळजवळ सगळीच सामाजिक शास्त्रे ही तुलनेने अलिकडची आहेत म्हणजे त्यांना 'शास्त्र' ही संज्ञा अलिकडेच प्राप्त झालेली आहे, व ते स्थान प्राप्त होण्यासाठी बरेच झगडावे लागले आहे सामाजिक शास्त्रात सर्वांत जुने म्हणजे राज्यशास्त्र (पॉलिटिक्स) होय 'राजा' ही संस्था जुनी असली व 'राजाच्या कक्षेतला जो प्रदेश ते राज्य,' असा राज्य या शब्दाचा अर्थ असला तरी राज्य-शास्त्र ही कल्पना अलिकडची व विशेषत लोकशाहीच्या विचारानंतरची आहे

त्यानंतरचे सामाजिक शास्त्र म्हणजे अर्थशास्त्र होय. याचाही जन्म सतराव्या शतकात यूरपमध्ये झाला. अ‍ॅडम स्मिथचा 'वेल्थ ऑफ् नेशन्स' ह्या स. १७७६ च्या ग्रंथापासून इंग्लंडात त्याचा उद्‌भव झाला व नंतर मिल्, रेकार्डो इ. विद्वानानी त्यात विचारांची भर घालून त्याला शास्त्र पदवी प्राप्त होण्याची पूर्वतयारी केली. त्यानंतरचे शास्त्र म्हणजे इतिहास होय. ग्रीकामध्ये हेरॉडॉटस सारखे काही ग्रथकार होऊन गेले तरी, इतिहासाला 'शास्त्र' ही प्रतिष्ठा अठराव्या शतकात प्राप्त झाली व ती प्राप्त होण्यास रँक व त्याचा प्रतिस्पर्धी गिबन ह्यांचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत. इतिहासानतर विधिशास्त्राचा (ज्युरिसप्रूडन्स) क्रम लागतो. ही त्यातल्या त्यात जुनी सामाजिक शास्त्रे होत त्यानतर मानवशास्त्र, (अँथ्रॉपॉलॉजी), समाजशास्त्र (सोशियॉलॉजी) ही नव्याने साकारलेली शास्त्रे होत.

समाजशास्त्र हे सर्व सामाजिक शास्त्रात अतिशय समिश्र व गुतागुतीचे आहे. शास्त्र या दृष्टीने त्याचे वय अवघे पाऊण शतक भरते. पण आजच्या जगात त्याचे महत्त्व अपार मानले जाते. बहुतेक सर्व सामाजिक शास्त्रांचे समावेशक असे ते शास्त्र आहे.

या सामाजिक शास्त्रात नीतिशास्त्र तसेच शिक्षण ही अर्धसामाजिक (सेमी सोशल्स) शास्त्रे गणली जात. आज त्याची गणना समाजशास्त्रात केली जाते. या सर्व शास्त्रात तत्त्वज्ञानाचे स्थान फार वेगळे आहे अगदी प्राचीन काळापासून त्याचे स्वतत्रपण मान्य करण्यात आले होते इतिहासाचा असा फार मोठा कालखड आहे की, त्यात तत्त्वज्ञान ह्या शास्त्राची अधिसत्ता ज्ञानक्षेत्रात सर्वत्र मानली जात असे. आपल्याकडे तत्त्वज्ञानाच्या जवळचे म्हणजे अध्यात्मशास्त्र होय व त्याचे महत्त्व किती होते हे ह्या प्रकरणात प्रारभी आलेच आहे मध्ययुगात पदार्थविज्ञान-शास्त्रज्ञ व रसायन-शास्त्रज्ञ हे 'तत्त्वज्ञ' (नॅचरल फिलॉसॉफर) म्हणून गणले जात असत. त्याच्याहून आजच्या अर्थाने गणले जाणारे तत्त्वज्ञानी वेगळे म्हणून त्याना 'नीति-तत्त्ववेत्ते' (मॉरल फिलॉसॉफर) सबोधिले जात असे. न्यूटनने आपल्या सिद्धान्ताचे विवेचन करताना मी विज्ञानाचे तत्त्वज्ञान सागतो असे वारवार म्हटले आहे [विद्या-पीठाच्या कोणत्याही क्षेत्रातील श्रेष्ठतम पदवीला आजही डॉक्टर ऑफ फिलॉसॉफी म्हटले जाते, हे आजही आपण पाहतो ] पण आज लवक अशा दुसऱ्या टोकाला गेला आहे की, तत्त्वज्ञानाचे महत्त्व व प्रतिष्ठा 'शास्त्रा'ला प्राप्त झालेली आहे. आजचा तत्त्वज्ञ आपल्या ग्रथाचे वर्णन करताना त्यातील विवेचन 'शास्त्रीय' (सायटिफिक) आहे असे अभिमानाने आवर्जून सागेल व सगळ्याच गोष्टींची तत्त्वज्ञाने न होता 'शास्त्रे' झालेली आहेत सगळ्याच बौद्धिक व्यवहारात 'शास्त्रीय'तेला अपरपार महत्त्व प्राप्त झालेले आहे.

## वैज्ञानिक व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील

गेल्या चार पाच शतकातली विज्ञान-शास्त्राची प्रगती अतिशय आहे जीवनाच्या सर्वच क्षेत्रात त्याचा प्रभाव हा वाढलेला आहे शास्त्र असणाऱ्या पद्धतीला 'शास्त्रीय पद्धती' असे अभिधान प्राप्त झाले आहे या पद्धतीचा सर्व क्षेत्राप्रमाणे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रावर सुद्धा परिणाम झाल्याविना राहिलेला नाही आजकाल 'शास्त्र' हा एक परवलीचा शब्द झालेला आहे त्यामुळेच सर्वत्र सामाजिक संबंधाची चर्चा करणाऱ्या शास्त्राना 'सामाजिकशास्त्रे' अशी संज्ञा रूढ झालेली आहे

### सामाजिक शास्त्राच्या 'शास्त्रत्वा' ची पाहणी

सामाजिक शास्त्राची कल्पना आताच पाहिल्याप्रमाणे व इतर अनेक कल्पनाप्रमाणे तत्त्वज्ञानातून उदरात झाली असली तरी प्रथम वन्य जीवनाच्या विरोधी असणाऱ्या अशा नागर समाजजीवनाची कल्पना आली असावी ह्या कल्पनेबरोबर माणसाच्या राजकीय वर्तृत्वाची जाणीव झाल्याने 'मनुष्य हा राजकीय प्राणी आहे' (Man is a political animal) अशा प्रकारचा विचार उदयास आला पुढे काही कालानंतर मनुष्याच्या व्यापक अशा सामाजिक जीवनाची जाणीव होऊन मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे ही कल्पना सर्वत्र रूढ झाली आणि ह्या कल्पनेतूनच पुढे ह्या शतकाच्या प्रारंभी सामाजिक शास्त्राच्या कल्पनेने मूळ धरले [आजची 'समाज' कल्पना ही 'व्यक्ती' विरुद्ध असणारी संस्था अशी आहे] आज सामाजिक शास्त्राची मान्यता विवाद्य राहिलेली नाही सर्व देशात ही शब्दसंहती थोड्याफार फरकाने रूढ आहे*

वैज्ञानिक शास्त्राना चार पाच शतकाची परंपरा आधुनिक कालात लाभलेली आहे सामाजिक शास्त्राचे आयुष्य ह्या दृष्टीने जेमतेम एक शतकाचे आहे हे आपण पाहिले पूर्वी अध्यात्म विचार प्रधान शास्त्राना नेहमी श्रेष्ठ मानले जाई पण गेल्या शतकाच्या पहिल्या अर्धात ऑगस्ट कॉम्टे ह्या फ्रेंच तत्त्वज्ञाने इतिहास समाजशास्त्रादी शास्त्राना प्रात्यक्षिक शास्त्रे (पॉझिटिव्ह सायन्सेस) अशी संज्ञा देऊन त्याना अध्यात्मशास्त्राच्या वरचे स्थान दिले त्याच्या अभ्यासाच्या विशिष्ट पद्धतीचाही त्याने पुरस्कार केला, तथापि त्याना

*[उदा, अमेरिकेत 'सोशल स्टडीज' अशी संज्ञा वापरली जाते इंग्लंडमध्ये सोशल स्टडीज या शब्दाबरोबर 'सोशियालॉजी' हा शब्द रूढ आहे आपल्याकडे 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल स्टडीज' संस्थेच्या नावाच्या निमित्ताने हा शब्द आला आहे अलीकडे तेथेही सोशल स्टडीज ऐवजी सोशल सायन्सेस हा शब्द योजला आहे असे दिसते ]

'शास्त्र' ही पदवी जर कुणी प्राप्त करून दिलेली असेल तर ती कार्ल मार्क्सने होय. त्यायोगेच मार्क्स हा सामाजिक शास्त्राचा 'जॉन द बॅप्टिस्ट' आहे, असे प्रा. ज्यूलियन हक्स्ले म्हणतात. मार्क्सने इतिहासादी समाजशास्त्राच्या अभ्यासाला 'शास्त्रे' म्हणून वेगळीच प्रतिष्ठा प्राप्त करून दिली आहे. प्रो. हक्स्ले म्हणतात, "The true characteristics of a science,-curiosity for its own sake, interest in industrial techniques and practical control, freedom of enquiry, experiment verification in place of authority, and full publication about discussion — were unfolding themselves in social studies, although some of them are still in a rudimentary stage." ("Man in Modern World" p. 119.)

अशा रीतीने सामाजिक शास्त्रांना 'शास्त्र' ही पदवी आणि प्रतिष्ठा केवळ गेल्या शतकात प्राप्त झालेली आहे. ही प्रतिष्ठा केवळ तात्त्विक दृष्ट्याच लाभलेली आहे. कारण विकासाच्या दृष्टीने पाहता ती शास्त्रे अद्याप बरीच अप्रगत आहेत याच कारणांमुळे कित्येकांच्या मते त्यांना 'शास्त्र' (सायन्स) ही पदवी लावणेही योग्य होणार नाही. The test of science is not easy to apply... [S. W. F. Ogburn : Social Sciences and their Inter-relations : In 'Social Sciences' Research and Libraries, Ed. Ranganathan.]

## काही मर्यादा

अर्थात 'शास्त्र' या दृष्टीने सामाजिक शास्त्रांच्या काही मर्यादा मान्यच करावयास हव्यात. सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रातील शोधविषयक निष्कर्ष हे विज्ञान-शास्त्रातील निष्कर्षांप्रमाणे सर्वगामी (युनिव्हर्सल) व निरपवाद नसतात त्यांच्यात मतभेदाला भरपूर वाव असतो. तसेच समाजशास्त्रांनी आपल्या संशोधनाचे स्वविशिष्ट व सर्वमान्य असे तंत्र निर्माण केलेले नाही. जे काही उत्कर्ष झालेले आहे ते प्राथमिक स्वरूपाच्या प्रयत्नाचे फळ आहे. त्यांनी सामाजिक शास्त्रे अद्याप बाल्यावस्थेत आहेत हेच सिद्ध होते.

सामाजिक जीवनाशी संबंध असल्यामुळे आणि त्या जीवनाच्या अंगगत वैगुण्यामुळे नियंत्रित प्रयोगांना फार मोठ्या मर्यादा पडतात वैज्ञानिक शास्त्रांच्या क्षेत्रात प्रयोग करताना प्रयोग पद्धतीप्रमाणे प्रयोगाची अतिशय काळजीपूर्वक आखणी करून अपेक्षित निष्कर्ष हा एकच येईल दुसरा येणारच नाही अशी ग्वाही देता येते. त्यायोगेच त्या निष्कर्षास एकप्रकारचे निश्चित व सर्वमान्यपण प्राप्त होते सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रात अशा प्रकारची सनियन्त्रित प्रयोगशीलता (कंट्रोल्ड एक्स्पेरिमेंटेशन) अस्तित्वात येणे जवळ जवळ अशक्य आहे. त्याची ही मर्यादा मान्यच करावयास हवी.

## वैज्ञानिक व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील संशोधन

वैज्ञानिक शास्त्रातले नियम सामाजिक क्षेत्रात पूर्णपणे लागू पडत नाहीत कारण या ठिकाणी मानवी जीवनातील भावना, विचार, कल्पनाजन्य अनेक गोष्टींचा संबंध असल्याने कारणाची अनेकता वाढते व सर्वच अवलोकनात गुंतागुंत अपार वाढते. सामाजिक शास्त्राचा मानवी वागणुकीशी संबंध असल्याने, विशिष्ट प्रयोगातून वा अवलोकनावरून काढलेल्या निष्कर्षांना फार मोठ्या मर्यादा पडतात. कारण मानवी वागणूक ही अंदाजाच्या पलिकडे (नॅाॅन प्रेडिक्टेबल) असते. त्यामुळे ते निष्कर्ष विशिष्ट संदर्भात व विशिष्ट मर्यादेतच विश्वसनीय असतात. या गुंतागुंतीमुळे सामाजिक शास्त्रीय संशोधनात वैज्ञानिक शास्त्राचे तंत्र व संकेत जसेच्या तसे अवलंबणे अशक्य होते.

'शास्त्र' या दृष्टीने सामाजिक शास्त्राची आणखी एक मोठी मर्यादा अशी की, वैज्ञानिक क्षेत्रातील संशोधनात प्रयोग हे पुन: करून वा पडताळून पाहण्याची तरतूद असते. त्यावरच विज्ञानशास्त्रातील नियमांची वा तत्वांची विश्वसनीयता अवलंबून असते. सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात अशा पुन: परीक्षणाला (व्हेरिफिकेशन) स्थान नाही. इतिहासातील एखाद्या घटनेची पुन: निर्मिती कशी करणार ? हीच गोष्ट समाजशास्त्र, राज्यशास्त्र या क्षेत्रातील प्रयोगाबाबत म्हणता येईल. पुन: परीक्षणाची (व्हेरिफिकेशन) तरतूद नसल्याने 'शास्त्र' या दृष्टीने सामाजिक शास्त्राच्या संशोधनाला मोठी मर्यादा पडली आहे. ह्या कारणामुळेच या क्षेत्रातील निष्कर्षांत व्यक्तिगत प्रतिक्रिया, आवडी निवडी, मते, ग्रह, पूर्वग्रह इ. चा काही भाग असणे तरी एकापरीने अपरिहार्य ठरते.

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात कारणाची अनेकता ही महत्त्वाची असते. विज्ञानशास्त्राच्या क्षेत्रात ही विविधता कमी करीत करीत एका कारणापर्यंत येता येते. पण तसे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात अशक्य होते हे आपण पाहिले. तसेच मागे एका ठिकाणी पाहिल्याप्रमाणे ही कारणे शोधता शोधता कित्येकदा दुसऱ्या शास्त्राच्या क्षेत्रात जावे लागते. उदा. राज्यशास्त्र (पॉलिटिक्स), अर्थशास्त्र (इकॉनॉमिक्स), समाजशास्त्र (सोशियालॉजी), इतिहास (हिस्टरी), ही शास्त्रे कित्येक वेळा एकमेकांना एवढी भिडून जातात की एकाची हद्द कुठे संपते व दुसऱ्याची कोठे सुरू होते ध्यानातही येत नाही व आले तरी एका विशिष्ट शास्त्राच्या कक्षेत विशिष्ट विवेचन बसविणे कठिण होते. विज्ञानशास्त्रात काही ठिकाणी असे होते, तर ते तो अपवाद आहे. पण बऱ्याच ठिकाणी सामाजिक शास्त्रात तो नियम आहे. ह्या परस्परावलंबनामुळे अनेक सामाजिक शास्त्रात संशोधनाचे क्षेत्र हे फार मर्यादित होते. विशिष्ट तंत्राच्या अवलंबनाने वैज्ञानिक शास्त्रात संशोधकाकडून होणाऱ्या

तत्त्वे आहेत ही ज्ञानाच्या निरनिराळ्या क्षेत्रात जास्तीत जास्त प्रमाणात आणण्याचा प्रयत्न करणे हे संशोधनाचे उद्दिष्ट ह्या गोष्टी आणण्याचा प्रयत्न अधिकाधिक प्रमाणात होत आहे

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील संशोधनाचे उद्दिष्ट स्पष्ट करताना पॉलिन यंग म्हणतात, "We may define social research as the systematic method of discovering new facts or of verifying old facts, through sequences, inter-relationship, causal explanations and the natural laws which cover them"*

## क्षेत्र-पाहणी-पद्धती (फील्ड सर्व्हे)

अशाप्रकारे सामाजिक शास्त्राच्या अभ्यासाची व संशोधनाची मुख्य भूमिका स्पष्ट झाल्यावर तिच्या अवलंबनासाठी कोणत्या कोणत्या मार्गांचा स्वीकार करण्यात येतो ते पाहणे उद्बोधक होईल आज सामाजिक संशोधनाला अतिशय महत्त्व प्राप्त झालेले आहे योजनाबद्ध जीवनाला त्याची अतिशय जरूरी भासत आहे जीवनाच्या विविध क्षेत्रामध्ये नियोजनाचा अवलंब करावयाचा असेल तर विविध अंगाची वस्तुनिष्ठ माहिती जमविणे अत्यंत आवश्यक झाले आहे व त्यातून आर्थिक व सामाजिक क्षेत्रात व्यापक क्षेत्र पहाणी-पद्धती (फील्ड सर्व्हे) अमलात आलेली आहे या पाहणीला (सर्व्हे), विशिष्ट संदर्भात सामाजिक–आर्थिक–पाहणी (सोशिओ इकॉनॉमिक सर्व्हे) असे म्हणतात विचारासाठी विशिष्ट घटक घेऊन, त्यातील विविध सामाजिक सांस्कृतिक संघटना व लोकांच्या विशिष्ट प्रकारच्या–उद्योगधंदे (ॲक्टिव्हिटीज) वृत्ती, इ गोष्टीची पाहणी ह्या संदर्भात केली जाते सरकारी कमिशनने केलेला 'रुरल क्रेडिट सर्व्हे' हे याचे एक प्रसिद्ध उदाहरण अमेरिकेतील नीग्रोच्या प्रश्नावर अशीच एक व्यापक पाहणी उपलब्ध आहे आपल्याकडे निरनिराळ्या राज्यात निरनिराळ्या प्रकारचे प्रयत्न या दिशेने झालेले आहे महाराष्ट्रातील डॉ ना गो चापेकर यांचा 'आमचा गाव, बदलापूर' हा अशा प्रकारचा पाहणीवजा ग्रंथ ३० वर्षापूर्वी, लिहिला गेला आहे तसेच डॉ धनंजयराव गाडगीळ यांच्या 'गोखले राज्यशास्त्र आणि अर्थशास्त्र संस्थे'ने अशी पाहणी पुणे, सोलापूर, कोल्हापूर, इ शहराच्या बाबतीत विशिष्ट संदर्भात केलेली आहे सामाजिक शास्त्राच्या संशोधन क्षेत्रातील ही एक नवी दिशा, व आधुनिक प्रवृत्ती आहे कोणत्याही क्षेत्रात तिचा तारतम्याने अवलंब करता येईल. पंचेचाळीस वर्षापूर्वी ग्रीयरसन ह्या भाषाशास्त्रज्ञाने भारतीय भाषाची अशीच पाहणी

* Scientific Social Surveys and Research

( लिंग्विस्टिक सर्व्हे ) केलेली आहे पुराणवस्तु-खात्यातर्फे निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या प्रकारचे उत्खनन चालू असते, हा त्या क्षेत्रातला एक पाहणीचाच उपक्रम होय अशा रीतीने ह्या पाहणी पद्धतीचे महत्त्व सशोधनाच्या क्षेत्रात आजकाल सर्वमान्य झालेले आहे

ह्या पाहणीचे मुख्य उद्दिष्ट म्हणजे विश्वसनीय अशी नवी माहिती उपलब्ध करून घेणे सामाजिक सशोधनात पुस्तकाचे साह्य फार तोकडे पडते व त्यासाठी नवनवीन माहिती उजेडात आणण्याचे अन्य उपक्रम हाती घ्यावे लागतात, त्यापैकी हा पहिला उपक्रम होय विशिष्ट उद्देश मनात धरून, चौकशी पद्धतीचा अवलब करून, वस्तुस्थितीचे सत्यदर्शन घडविण्याच्या दृष्टीने ही पाहणी केलेली असते. नियोजनात या पाहणीला अतिशय महत्त्वाचे स्थान आहे त्यामुळे आपल्या नियोजन मडळाने ' रीसर्च प्रोग्रॅम कमिटी ' अशी एक स्थायी सघटनाच उभारली आहे इग्लड अमेरिका इ देशातही या प्रकारचे प्रयत्न चालू आहेत

## काही मर्यादा

ही पद्धत अशा रीतीने बरीच उपयुक्त असली तरी तिच्या काही मर्यादा मान्य कराव्या लागतात व्यक्तिगत सशोधनासाठी ही फारशी उपयुक्त नाही सामुदायिक रीतीने एखादी योजना (प्रॉजेक्ट) अतिशय काळजीपूर्वक आखावी लागते निरनिराळ्या कामासाठी निरनिराळ्या व्यक्तीना प्रशिक्षण देऊन तयार करावे लागते त्यायोगे सरकार अगर मोठमोठ्या सस्था ह्यानाच फक्त ह्या पद्धतीचा अवलब करता येतो योजनाकाराच्या कौशल्यावर हिचे यश अवलबून असते अर्थात अगदी छोटासा घटक घेतला [ उदा०, एखादे खेडेगाव अगर विशिष्ट प्रदेशातील एखादी जमात इ ] तर व्यक्तीलासुद्धा हिचा अवलब करता येईल सामाजिक सशोधनाच्या क्षेत्रात सर्वच देशात ह्या पद्धतीला अतिशय महत्त्व प्राप्त झाले आहे. बऱ्याच देशात या प्रकारचे नजरेत भरण्यासारखे उपक्रम झाल्यामुळे या पद्धतीचे एक तत्र निर्माण झालेले आहे व सशोधकाला त्या तत्राचा परिचय करून घेणे अवश्य झाले आहे उदाहरणार्थ, उपयोगात आणिल्या जाणाऱ्या साधनात व पद्धतीत एक प्रकारचे प्रामाणीकरण (स्टॅंडर्डायझेशन) झालेले आहे तसेच आकडेशास्त्राचीही मदत बरीच घेतली जाते आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे ही पाहणी करताना अनेक शास्त्राचा वा ज्ञानशाखाचा उपयोग करावा लागतो 'सोशियो-इकॉनॉमिक' ह्या शब्दात दोन शास्त्राचा एकत्र उल्लेख येतो तसेच सर्व सामाजिक शास्त्राना ही पद्धती उपयोगी पडण्यासारखी नाही त्याप्रमाणेच समकालीन समस्या प्रश्न सोडविण्यावरच हिचा भर असतो एकदर उपक्रमात

विशिष्ट समस्या सोडविण्याच्या मार्गावर अधिक भर असतो त्यामागील तात्त्विक अधिष्ठानाकडे फारसे लक्ष दिले जात नाही या पद्धतीच्या या व अशा प्रकारच्या काही मर्यादा लक्षात घ्यावयास हव्यात

## काही लक्षणीय विशेष

तथापि जगातील मोठमोठ्या संघटनांनी, सरकारांनी ह्या पद्धतीचा अवलंब करून फार मोठे सामाजिक-शास्त्र-संशोधनाला उपयुक्त होईल असे साहित्य उपलब्ध करून ठेवलेले आहे तसेच नवे नवे संशोधनही ह्या दिशेने अविरत चालू आहे यातूनच पुढे मागे मौलिक व तात्त्विक स्वरूपाचे संशोधन निर्माण होऊ शकेल एकंदरीने पाहता कोणत्याही क्षेत्रातील संशोधकास या पद्धतीची माहिती असणे अवश्य झाले आहे नव्या संशोधकांना या संशोधनपद्धतीची कल्पना येण्यासाठी मर्यादित प्रमाणावर 'नमूना-पाहणी' (सॅंपल सर्व्हे) हाही एक प्रकार उदयास आलेला आहे त्याच्या योगाने अभ्यासकाचा प्रत्यक्ष विषयाशी संबंध येतो

या पाहणी-पद्धतीचा परिणाम अनेक इतर शास्त्रांवरही झालेला आहे कोणत्याही महत्त्वपूर्ण अशा गोष्टीचा विकास कोणत्या कोणत्या अवस्थांतून झाला हे पाहणे हा संशोधनातील एक अतिशय सर्वमान्य असा विषय आहे उदा०, विवाह-पद्धतीचा इतिहास हा समाजशास्त्रातला, विशिष्ट देशातील राष्ट्रवादी विचाराचा विकास हा राज्यशास्त्रामधला, कादंबरी, नाटक, काव्य इ वाङ्मय प्रकाराचा विशिष्ट कालखंडातला (विशिष्ट मर्यादेतील) विकास पाहणे हा वाङमयीन क्षेत्रातला, एका विशिष्ट पद्धतीच्या कराचा इतिहास हा अर्थशास्त्रातला असे अनेक प्रकारचे निरनिराळ्या क्षेत्रातले विषय म्हणजे पाहणी-पद्धतीच्या सर्वकषतेचे वा सर्वव्यापकतेचे नमुनेच होत प्रारंभी ह्या प्रकारची पाहणी ही नवी माहिती उजेडात आणण्याच्या दृष्टीने केली जात असे तिच्यात वस्तुस्थितीच्या पृथक्करणावर एवढा भर दिला जात नसे परंतु आज समाजजीवनातील सबंधातील गुंतागुंत (कॉम्प्लेक्सिटी) एवढी मान्य केली गेली आहे, व समस्यांचे स्वरूपही इतके संमिश्र झाले आहे की, पाहणीतील मर्मस्थळे ही सामाजिक जीवनाची गतिशीलता, चालीरीती, प्रवृत्ती, परस्पर संबंध यांच्या अवलोकनातूनच स्पष्ट होणार आहेत हे मत सर्वमान्य झालेले आहे

त्याचप्रमाणे ह्या पाहणीचा एकंदर रोख हा विस्तृत व तपशीलवार माहिती (डीटेल्स्) मिळविण्याकडे नसतो तर समाजजीवनातील प्रमुख प्रवृत्तींचा रोख (ट्रेंड) कोणीकडे आहे हे स्पष्ट करण्यावर अधिक भर दिलेला असतो ह्या रोख पाहण्यावर भर दिला गेल्याने सामाजिक संबंधाची कारणमीमांसा करण्याकडे लक्ष वेधले आहे ह्या कारणाच्या शोधामुळे अनेक नव्या गोष्टींकडे लक्ष गेलेले आहे

तसेच नव्या प्रवृत्तीची पण जाणीव ह्यायोगे झालेली आहे पण रूढ वा ठराविक पद्धतीने अवलब केल्यामुळे ह्या पद्धतीचे सशोधन-मूल्य कमी होते अर्थात् एक अतिशय सुकर व त्यामुळेच लोकप्रिय झालेली पद्धती म्हणजे ही पाहणी-पद्धती होय

पाहणी-पद्धतीच्या अनुषगाने नवीन माहिती उपलब्ध करून घेण्याच्या दृष्टीने सशोधनाच्या बाबतीत अनेक उपाय अवलबिले जातात अनेक क्षेत्रामध्ये त्याचा उपयोग करणे रूढ झालेले आहे सशोधनाची ती हत्यारेच होत (टूल्स ऑफ रीसर्च) या विविध उपायाचा वा मार्गांचा अवलब प्राय सामाजिक शास्त्राच्या सशोधनातच झालेला आहे आणि यायोगे त्याचा विचार या ठिकाणी करणे युक्त होईल

*प्रश्नमालिका*

अशा उपायात पहिले स्थान हे प्रश्नमालिकेला (क्वेश्चनायर) दिले पाहिजे नियुक्त विषयावर निरनिराळ्या व्यक्तीकडून माहिती मिळविण्याच्या हेतूने विशिष्ट प्रकारची प्रश्नावली तयार केली जाते व ती निरनिराळ्या सबधी, तज्ज्ञ व्यक्तीकडे पाठविली जाते त्याच्याकडून उत्तरे मागविण्यात येतात सर्व उत्तरे आल्यानतर त्याचे पृथक्करण करून काही निष्कर्ष स्थूलमानाने काढता येतात ह्या प्रश्नावलीची रचना करताना बरीच दक्षता घ्यावी लागते मिळवावयाची माहिती ही वस्तुनिष्ठ असावी अशा रीतीने प्रश्नाची रचना करावी लागते शब्दाची निवड करताना नेमके उत्तर येईल अशी करावी लागते त्यात विपर्यासाला अवसर नसावा, अर्थात् कोणत्याही प्रकारची सदिग्धता नसावी, तसेच प्रश्नाची भाषा सुगम असावी इ प्रकारची दक्षता घ्यावी लागते कोणत्या तरी माहितीवर प्रश्न केंद्रित झालेले असावेत प्रश्नाचा क्रमही असा असावा की त्याच्यामधून एक प्रकारची तार्किक सगती स्पष्ट व्हावी प्रश्न सरळ स्वरूपाचे असावत उत्तर देताना उत्तर देणाराला फार त्रास पडेल असे प्रश्न विचारणे योग्य नाही (तज्ज्ञाकडून जरी माहिती मिळवावयाची झाली तरी प्रश्नाचे स्वरूप फार गहन नसावे) त्याला शक्य तितक्या कमी वेळात उत्तरे देता यावीत व्यक्तिगत मुलाखतीतून विचारण्यासारखे प्रश्न टाळले जावेत काही प्रश्न 'हो' वा 'नाही' अशा प्रकारची उत्तर येतील असे असावे ज्या वेळी व्यक्तिगत स्वरूपाचे प्रश्न विचारावयाचे असतील त्या वेळी ती माहिती पूर्णपणे गुप्त राखली (कॉन्फिडेंशियल) जाईल अशा प्रकारचे आश्वासन देणे जरूर असते त्याच्या सहकार भावनेला आवाहन केलेले असावे अशा प्रकारच्या दक्षता घेऊन जर प्रश्नावली तयार केली तर ती पुष्कळच उपयुक्त होऊ शकते यात जर काही वैगुण्य असेल तर ते म्हणजे कित्येक वेळा उत्तरे पाठविली जात नाहीत आपणाकडे सामाजिक जाणीव ही बरीच प्राथमिक अवस्थेत असल्याने प्रश्नमालिकेला प्रतिसाद हा बेताचाच मिळतो

कित्येक वेळा आलेल्या उत्तराची प्रश्नावलीकर्त्याकडून दखलही घेतली जात नाही हेही लक्षात धरणे अवश्य आहे

उत्कृष्ट प्रश्नमालिका तयार करण्याकरिता ग्रंथालयाची मदत ही अत्यवश्य ठरते त्याचबरोबर, व्यक्तिगत अनुभव, अवलोकन, तसेच योग्य असा गृहीत पक्ष (हायपॉथेसिस), ह्या गोष्टी अत्यंत महत्त्वाच्या आहेत चांगल्या प्रकारची प्रश्नावली तयार करण्यासाठी अनेक तज्ज्ञांचा सल्लाही अपरिहार्य ठरतो प्रश्नावलीची विश्वसनीयता (रिलायबिलिटी) व उपयुक्तता (व्हॅलिडिटी) ही ज्या प्रकारे प्रश्नावलीतील प्रश्नांची आयोजना झालेली असेल त्यावर अवलंबून असते

प्रश्न तयार करताना (१) कोणत्या प्रकारची माहिती आपण मिळविणार आहोत, (२) कोणाकडून ती मिळवावयाची आहे, (३) कोणत्या मार्गाने वा पद्धतीने माहिती देणाऱ्याकडे आपण जाणार आहोत, व (४) कोणता कल्पितपक्ष आपण मानला आहे, ह्या गोष्टी महत्त्वाच्या आहेत त्यांच्या स्वरूपावर प्रश्नावलीतील प्रश्नांचे स्वरूप अवलंबून असते अलीकडे निरनिराळ्या क्षेत्रांत ह्या पद्धतीचा अवलंब केला जातो

## 'कोष्टक' व मुलाखत

प्रश्नमालिकेच्या धर्तीवर योजल्या जाणाऱ्या आणखी दोन मार्गांचा उल्लेख करावयास हवा हे मार्ग म्हणजे विशिष्ट कोष्टक (शिड्यूल) व मुलाखत (इंटरव्ह्यू) हे होत प्रश्नावली प्रमाणेच 'कोष्टक' रचनाही पण मोठ्या काळजीपूर्वक करावी लागते या पद्धतीने जमा करावयाची माहिती वस्तुनिष्ठ, तसेच विस्ताराच्या दृष्टीनेही महत्त्वाची (क्वांटिटेटिव्ह) अशी असावी हे ध्यानात धरून ह्या कोष्टकाची वा 'परिशिष्टाची' रचना करावी लागते पुष्कळशी वस्तुनिष्ठ माहिती जमविण्याकडे प्रश्नांचा रोख असावा (उदा०, कुटुंबात माणसे किती ? ग्रंथालयात पुस्तके किती ? गावात कोणत्या भाषा बोलल्या जातात ? इ. प्रकारची) इतर कोणत्याही मार्गाने मिळणार नाही अशी माहिती मिळविण्याकडे रोख असावा मिळालेल्या माहितीचे पाहणीसाठी पृथक्करण करता येईल, इतर ठिकाणाहून मिळालेल्या तत्सम माहितीशी ती ताडून तोलून पाहता येईल, ह्या गोष्टी मनात धरून प्रश्न विचारले जावेत शब्दांची योजना करताना 'प्रश्नावली'तील प्रश्नांच्या बाबत घ्यावयाच्या दक्षतेप्रमाणेच दक्षता घ्यावी लागते सुगम रीतीने माहिती मिळण्यासाठी उत्तरे देणाऱ्यांना थोड्या सूचना देऊन मार्गदर्शनही करावे व संदिग्धता कमी करावी परिशिष्टात व्यक्तिगत स्वरूपाचे प्रश्न नसतात, ते प्रश्नावलीत असू शकतात

पुष्कळशी नवनवी माहिती ह्या परिशिष्ट-पद्धतीनेच जमविली जाते शिक्षण-सस्थाची विविध प्रकारची माहितो, बाजारासबधी माहिती व अशा प्रकारची अनेकविध माहिती ह्या मार्गानेच मिळविली जाते ह्यामुळे सशोधनाच्या अभ्यासात व विशेषत सामाजिक शास्त्राच्या अभ्यासात या मार्गाला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे चागले परिशिष्ट अगर चागली प्रश्नावली तयार करण्यासाठी कोणत्या गोष्टी लागतात ते मागे आलेले आहे ती माहिती मिळविण्यामागील ध्येये आपणापुढे स्पष्ट असावी लागतात आजकाल जवळ जवळ सर्व क्षेत्रात या दोन्ही मार्गांनी माहिती सतत जमविली जाते ती जमा करण्यासाठी तिचे पृथक्करण इ करण्यासाठी स्वतत्र रीती निरनिराळ्या शासकीय, वैज्ञानिक, शैक्षणिक इ सार्वजनिक सस्थाच्या कार्यालयात उघडली आहेत सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील माहिती जमा करण्याचे हे दोन महत्त्वाचे सर्वसमत मार्ग आहेत पण अद्यापपर्यंत त्याच्या रचनेबाबत प्रामाणित (स्टॅंडर्ड) परिमाणे निर्माण झालेली नाहीत

## मुलाखत

या शिवाय अगदी अलीकडे आणखी एका मार्गाचा अवलब केला जातो व तो मार्ग म्हणजे मुलाखत (इटरव्ह्यू) हा होय वरील दोन मार्गापेक्षा आपल्या सारख्या अल्पविकसित देशाला हा मुलाखतीचा मार्ग अधिक जवळचा आहे, याचे कारण आपणाकडे असणारी निरक्षरता प्रश्नमालिकेचा उत्तर देणारा हा लिहिता वाचता येणारा व बराच सुबुद्ध असावा लागतो विशेष वेळा तर तो चागला तज्ज्ञ असतो, पण बहुसख्य अल्पशिक्षित किंवा जवळजवळ अशिक्षित अशा लोकापासून नवी माहिती मुलाखतीच्या द्वारेच जमविणे शक्य आहे उत्तर देणाराशी प्रत्यक्ष सबध येत असल्याने काही वेगळ्या प्रकारची माहिती या मार्गाने मिळू शकते हा एक बराच विश्वसनीय मार्ग असला तरी त्याचे स्वरूप परिस्थितिनुरूप वेगळे असणे स्वाभाविक आहे प्रश्नमालेतील काही प्रश्न सरळ टाळता येतात या ठिकाणी तसा उत्तर देण्याचे टाळण्याचा प्रयत्न झाला तरी व्यक्तीची प्रतिक्रिया अजमावता येते व त्यातून काही प्रकाश पडतो व्यक्तीचा अनुभव व कल्पना याची जाणीव पण मुलाखतीच्या मार्गाने अधिक स्पष्टपणे होते

असे असले तरी या मार्गाच्या काही मर्यादा पण जाणवतात पहिली म्हणजे हा मार्ग बराच खर्चाचा आहे मुलाखतीसाठी सबधिताकडे मुद्दाम जावे लागते त्यानतर महत्त्वाची अडचण म्हणजे बरीच उत्तरे सदिग्ध असतात, काही चुकीची असतात, काही अतिशयोक्त असतात, काही वरवरची असतात याशिवाय व्यक्तिगत सबध येत असल्याने दोन्ही सबधित व्यक्तीच्या परस्पर सबधावर, स्वभावावर

बरेच अवलंबून असते दोघेही या प्रकारात नवे असल्यास प्रारंभी दोघानाही थोडे चमत्कारिक वाटणे स्वाभाविक असते आणि त्यामुळे एक प्रकारचे प्रशिक्षण दोघानाही अवश्य आहे आमच्याकडे हा सबंध प्रकार बराच नवा आहे मुलाखत दोनतीन प्रकारची असते (१) केवळ प्रतिक्रिया जाणून घेण्याच्या स्वरूपाची, (२) उत्तरे देणाराला परिस्थिती समजावून सागून विशिष्ट कामासाठी त्याचे सहकार्य मिळविण्यास उद्युक्त करण्यासाठी, (३) संशोधनासाठी निरनिराळ्या प्रकारची माहिती मिळविण्यासाठी

ज्याची मुलाखत घ्यावयाची त्याचे काही प्रकार आहेत (१) अधिकारावर, सत्तेवर असणारी व्यक्ती, (२) विशिष्ट विषयातला तज्ज्ञ, व (३) सवसामान्य मनुष्य मुलाखती घेणाऱ्याला काही पथ्ये पाळावी लागतात काही प्रश्नामुळे गैरसमज निर्माण होतात, रोष निर्माण होतो (उदा, कामगाराची बाजू घेऊन विचारलेले विशिष्ट प्रश्न त्या कारखान्याच्या चालकाना आवडत नाहीत ) यासाठी थोडासा खुलासा करून प्रश्न विचारणे जरूर असते आपणाकडे मुलाखत हा प्रकार काही प्रमाणात अवलंबण्यात आल्याचे वृत्तपत्रात वाचण्यात येते प्रत्यक्ष संशोधन-कार्यात त्याचा उपयोग करून घेतलेली उदाहरणे अत्यल्प आहेत यासाठी योग्य प्रकारचे वातावरण, प्रशिक्षण इ अवश्य आहे पण सामाजिक संशोधनाची विश्वसनीयता व उपयुक्तता वाढविण्याचा हा एक आधुनिक माग आहे हे लक्षात घरणे जरूर आहे

प्रश्नावली, परिशिष्ट, (कोष्टक) व मुलाखत ही एकमेकाशी समान असणारी, एकमेकाना पूरक असणारी अशी संशोधनाची आयुधे आहेत सामाजिक शास्त्राच्या संशोधनात त्याचा उपयोग सर्रास केला जातो पण प्रयोजन, प्रत्यक्ष उपयोग व योग्य प्रमाण ह्या दृष्टीने ती शोधविषयाशी अविभाज्यपणे जोडण्यात शोधकाचे कौशल्य असते त्याचा उपयोग करणाराने त्याचा स्वतंत्र अभ्यास करणे जरूर आहे कारण त्या प्रत्येकाचे स्वत चे असे तंत्र निर्माण झालेले आहे

### *मानसशास्त्राचा प्रभाव*

अलीकडे मानसशास्त्राच्या नव्या प्रयोग-पद्धतीना सुरुवात झाली आहे विशेषत मनोगाहनशास्त्राचा परिणाम म्हणून सामाजिक, आर्थिक शास्त्राच्या क्षेत्रात वस्तुनिष्ठ अभ्यास (केस स्टडी) ह्या नव्या पद्धतीचा वापर सुरू झाला आहे उदा० विशिष्ट जमातीच्या, गावाच्या, विभागाच्या, कुटुंबगटाच्या मायतालील परिस्थितीचा एका विशिष्ट उद्देशाने अभ्यास केला जातो या अनुषगाने या क्षेत्रात तसेच शिक्षणाच्या क्षेत्रात नव्या पद्धतीचे हेतूमूलक (मोटिव्हेटिव्ह) संशोधन सुरू

झालेले आहे. शिक्षणाच्या क्षेत्रात प्रात्यक्षिक (ॲक्टिव्ह) संशोधन असे म्हणतात. हे पूर्वी आलेच आहे हे सर्व उपक्रम अद्याप प्रयोगावस्थेत आहेत त्याचे तंत्र अद्यापपर्यंत विकसित व्हावयाचे आहे पण एकंदर प्रगतीचा मार्ग कोणत्या दिशेने जात आहे ह्याची कल्पना येऊ शकेल. या सर्व प्रयोगात विलक्षण लवचिकपणा ठेवावा लागतो. त्यामुळे त्या मार्गाचा अवलंब, त्याचे स्वरूप इ. ठरविणे हे संशोधकाच्या उद्दिष्टावर, कुवतीवर, चिंतनावर, विचारावर, तसेच त्याच्या एकंदर संशोधनात्मक झेपेवर अवलंबून राहणार आहे. सामाजिक संशोधनात भौतिक-शास्त्राची वस्तुनिष्ठता आणण्याचा हा एक उपक्रम आहे.

वैज्ञानिक शास्त्रात मूलभूत संशोधन व तंत्रात्मक संशोधन हे जसे दोन परस्पर-पूरक पण स्वतंत्र भाग पडलेले आहेत तसाच प्रकार याही क्षेत्रात होत आहे असे दिसते तंत्रात्मक संशोधन हे कोणतातरी हेतू मनात धरून केलेले संशोधन येत असते तशा प्रकारची हेतुपूर्णता सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात मोठ्या प्रमाणावर येत आहे असे दिसते.

### *व्यक्ति-प्रयत्नाचा संकोच*

या हेतुपूर्णतेचा आणखी एक दृश्य परिणाम दिसून येत आहे; तो म्हणजे ह्या सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील संशोधन हे विज्ञानशास्त्रातील संशोधनाप्रमाणे व्यक्तीच्या कक्षेपलीकडे जात असून समाजाच्या कक्षेत जात आहे. या संशोधनासाठी मोठी संघटना लागते, तिने व्यापक तत्वे धरून, विशिष्ट उद्दिष्टे धरून काही एक योजना आखलेली असते; व ती योजना पार पाडणे एवढेच संशोधकाचे काम होय. त्यासाठीही प्रशिक्षण लागते

एका दृष्टीने सर्वत्र क्षेत्रात ह्या सामुदायिकतेचा नवा मनू अवतरणार असे दिसावयास लागले आहे व्यक्तिगत संशोधकाचा आवाका त्या मानाने अल्प राहणार आहे अशा रीतीने सामाजिक शास्त्रातले मूलभूत संशोधन हे काही काळ थोडे बाजूलाच पडणार किंवा त्या क्षेत्रात जे अतिशय मोठे व प्रतिभेचे संशोधक असतील त्यांच्या वाट्याला येणार. एका परीने हे अपरिहार्य दिसले तरी विद्यापीठासारख्या शिक्षणपीठात सामुदायिक प्रयत्न व व्यक्तिगत गुणविकास ह्यांचा समन्वय झाला पाहिजे असे वाटते.

### *सामाजिक शास्त्रांतील विविधता*

सामाजिक शास्त्राचा विस्तार खूप मोठा आहे त्याचे पृथक्करण निरनिराळ्या रीतीने करता येते. त्यातली काही शास्त्रे मूलभूत (बेसिक वा

फंडामेंटल) असतात, तर दुसरी संबद्ध (ॲप्लाईड) असतात विज्ञानाच्या क्षेत्रात पदार्थविज्ञान हे अभियांत्रिकी (इंजिनिअरिंग)चे मूलभूत (फंडामेंटल) शास्त्र आहे तसेच समाजशास्त्र हे अनेक सामाजिकशास्त्राचे आधारभूत (बेसिक) शास्त्र आहे या मूलभूत शास्त्रातील विशिष्ट तत्त्वाचा वापर अशा प्रकारे त्याशी संबद्ध अशा अवलंबन (ॲप्लाईड) शास्त्रात करता येईल

सामाजिक शास्त्रांना ऐतिहासिक महत्त्व आहे विज्ञानशास्त्राप्रमाणे केवळ तात्त्विक वा पृथक्करणात्मक भूमिकेवरून त्याचा अभ्यास करता येत नाही त्याच्या अभ्यासासाठी सदैव ऐतिहासिक व संश्लेषणात्मक (सिन्थेटिक) दृष्टी स्वीकारावी लागते विज्ञानशास्त्राच्या बाबतीत दहावारा वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली पुस्तके निरुपयोगी म्हणून बाजूला टाकावी लागतात त्याचे महत्त्व त्या प्रमाणात कमी होते सामान्यत प्रचलित तत्त्वे व सिद्धान्त याच्या अभ्यासासच प्रामुख्याने वैज्ञानिक शास्त्रात महत्त्व असते परंतु सामाजिक शास्त्रातील अभ्यासातले बरेच संशोधन १५० वर्षांपूर्वीइतक्या जीवनाशी संबद्ध असते इतिहास तर भूतकाळाशीच संबद्ध आहे पण सामान्यत सामाजिक शास्त्रातील संशोधनाचा आवाका वैज्ञानिक शास्त्राच्यापेक्षा किमान दहा ते पधरा पटीने अधिक असतो

वैज्ञानिक शास्त्रे व सामाजिक शास्त्रे याच्या प्रकृतीतील फरक लक्षात घेणे अवश्य आहे वैज्ञानिक शास्त्राचे तंत्र सामाजिक शास्त्राच्या अभ्यासात तसेच्या तसे अवलंबणे अशक्य आहे हे वर पाहिलेच आहे सामाजिक शास्त्रातील अभ्यासात बरेच निष्कर्ष हे बऱ्याच प्रमाणात उत्स्फूर्ततेवर (इंटयुइशन) व अनुमाना (सरमाइज)वर आधारलेले असतात तसेच त्याच्या संशोधनातील तंत्र व समस्या परस्परावलंबी असतात उलटपक्षी विज्ञानशास्त्राचा भर अवलोकन, त्यातील सूक्ष्मता व प्रयोगक्षमता यावर अधिक असतो

सामाजिक शास्त्रे ही दोन प्रकारची आहेत इतिहास, राज्यशास्त्र, कायदा, अर्थशास्त्र ही साधनप्रधान (फॅक्च्युअल वा डॉक्युमेंटरी) शास्त्रे आहेत त्याच्या अभ्यासात अधिक महत्त्व सामग्रीच्या अभ्यासास दिले जाते या प्रत्येक शास्त्रास स्वत च्या अशा समस्या, व स्वत ची अशी उद्दिष्टे असतात, वैशिष्ट्ये असतात

याउलट मानसशास्त्र, समाजशास्त्र व मानवशास्त्र (ॲन्थ्रॉपॉलॉजी) ह्याचे स्वरूप वेगळे असते त्याना वर्तनवादी (बिहेव्हियरीअल) शास्त्रे असे म्हणतात याच्यात आशयावर अधिक भर असतो अभ्यासात सर्वसामान्य तत्त्वे (प्रापोझिशन्स) धरून घ्यावी लागतात त्याप्रमाणे वापरावयाचे संकेत (कन्सेप्ट्स) अतिशय दक्षतेने वापरावे लागतात ह्याच्या अभ्यासाच्या द्वारे होप्यमान वर्तविता येत नाही

(नो अटेम्ट अॅट प्रिडिक्शन). साधनप्रधान शास्त्रे ही विशिष्ट प्रसग, परिस्थिती, घटना विशद करतात. त्याच्या विवरणात रोजच्या व्यवहारातील भाषा वापरली जाते. आणि तुलनात्मक पाहणीच्या योगाने थोड्याफार प्रमाणात भविष्यही वर्तविता येते.

अर्थात सशोधकाने ही परस्परभिन्न न मानता परस्परपूरक मानणे योग्य होईल. दोन्ही प्रकारची शास्त्रे एकमेकापासून बरेच शिकू शकतात. वर्तनवादी शास्त्रे, महत्त्वाच्या घटनातील व विविध परस्परभिन्न घटकातील एकात्मता पाहू शकतील तर बरे होईल. तसेच ऐतिहासिक, सास्कृतिक घटनातील विविधता व परस्पर विभिन्नता याच्याकडे सश्लेपणात्मक दृष्टीने पाहिले तर बराच लाभ होईल.

## वैज्ञानिक व मानवशास्त्राचे आणखी एक पृथःकरण

विल्हेम डिल्थे याने ऐतिहासिकशास्त्रे व वैज्ञानिक शास्त्रे असे दोन प्रकार मानून पहिली ही समालोचन-(कॉम्प्रिहेन्शन) प्रधान आहेत व दुसरी ही स्पष्टीकरण (एक्स्प्लेनेशन) प्रधान आहेत असे म्हटले आहे शास्त्रज्ञ हा घटनामधील कार्यकारणसबध विचारात घेतो, तर इतिहासकार त्याचा नेमका अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करतो. ही प्रक्रिया बरीचशी व्यक्तिनिष्ठ असते. यायोगे ऐतिहासिक शास्त्रानी वैज्ञानिक शास्त्रानी पूनित केलेल्या पद्धतीचे अवलबन करावे ह्या गोष्टीस अनेकानी विरोध केलेला आहे त्याचे म्हणणे वैज्ञानिक शास्त्रे ही सर्वसामान्य सिद्धान्त प्रस्थापित करतात तर ऐतिहासिक शास्त्रे पुनः घडू न शकणाऱ्या घटनाचे असामान्यत्व (यूनिकनेस) समजून घेण्याचा प्रयत्न करतात. हेन्रीच् रिकेटने तर विज्ञानशास्त्राना निसर्गाची शास्त्रे (सायन्सेस ऑफ् नेचर) व इतिहासप्रधान शास्त्राना सस्कृतिप्रधान शास्त्रे (सायन्सेस ऑफ् कल्चर) असे दोन प्रकारच मानले. पहिल्याचा रोख साधारणीकरणावर (जनरलायझेशन) असतो तर दुसरी व्यक्ती वा घटक वा घटनाविशिष्टतेवर भर देतात विज्ञानशास्त्रात घटनाची पुनरुक्ती होत असते, उलट पक्षी इतिहास व सस्कृतिप्रधान शास्त्रात एकप्रकारच्या सातत्या" (सक्सेशन)ला अधिक महत्त्व असते बेनेडेट्टो क्रोसेने तर आपले तत्त्वज्ञानविवेचन एका वेगळ्या प्रकारच्या ऐतिहासिक पद्धतीवर आधारले की जी नैसर्गिक शास्त्राच्या पद्धतीपासून पूर्ण भिन्न होती.

सामाजिक शास्त्राच्या अभ्यासात अनेक शास्त्राचा व त्याच्या उपशास्त्राचा अभ्यास करावा लागतो, नव्हे तो आवश्यक असतो पूर्णपणे एकाच शास्त्रात पडतील असे विषय फारच थोडे असतात हा अभ्यास कित्येक वेळा इतर सामाजिक शास्त्राच्या

अभ्यासापुरताच मर्यादित असून चालत नाही तर कित्येकदा स्थापत्य, भूगर्भशास्त्र शेतकी, वैद्यक, इ. वैज्ञानिक शास्त्रांबरोबर, धर्म, विचार, परंपरा, तत्त्वज्ञान इ. चाही विचार करावा लागतो. एवढेच नव्हे तर या शास्त्राचे परिणाम बऱ्याच खोलवर जाऊन तपासावे लागतात. माणसामाणसातील संबंध (ह्यूमन रिलेशन्स) समजून घेणे हे आजच्या संबंध सामाजिक संशोधनाचे उद्दिष्ट आहे. हे उद्दिष्ट केवळ सामाजिक शास्त्राच्या अभ्यासाने पुरे होईल असे नव्हे. त्याला कित्येक वेळा वाङ्मयीन संशोधनाची बरीच मदत होईल, होतेही.

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात माहिती जमा करण्यास बरेच परिश्रम पडतात. माहिती मिळविण्यासाठी कोणकोणत्या मार्गांचा अवलंब करावा लागतो ह्याचे विवेचन मागे आले आहेच. मिळविलेल्या माहितीचे पुनःपरीक्षण करण्याची तरतूद नसल्याने माहिती मिळविण्यास फार दक्षता घ्यावी लागते. ती सारी घेतली तरीही ती माहिती विशिष्ट मर्यादेत व संदर्भातच खरी असते, त्यामुळे तिच्या मर्यादा मान्य कराव्या लागतात. माहितीचा मानवी जीवनाशी संबंध असल्याने व ते सदैव बदलत असल्याने माहिती अल्पकाळ विश्वसनीय राहाते. एखाद्या गावाची आधुनिक पद्धतीचा अवलंब करून विशिष्ट प्रकारची पाहणी केली तरी ती तेवढ्या-पुरतीच मर्यादित असणार. काही काळानंतर तीत फरक हा पडणारच.

## संख्याशास्त्राचा परिणाम

सामाजिक शास्त्राच्या संशोधनात संख्याशास्त्राने क्रांती केली आहे. आधुनिक समस्यांच्या सोडवणुकीकरता संख्याशास्त्रीय पद्धती (स्टॅटिस्टिकल मेथड्स) व संख्याशास्त्रीय कल्पनांचे फार मोठे साह्य घेतले जाते. आपणाला कितीतरी गोष्टींची माहिती हवी असते, की जी एका अवलोकनात मिळत नाही. माणसाच्या वर्तणुकीची आपणास माहिती जमवायची असते, एखाद्या सामाजिक गटाचा अभ्यास करावयाचा असतो, एखाद्या लहान मुलाची वाढ कशी होते हे जसे माहीत करून घेणे जरूर वाटते तसे लोकसंख्येची वाढ कशी होते, हेही औत्सुक्य आपल्या ठिकाणी असते. या सगळ्यासाठी संख्याशास्त्रीय माहिती व संख्याशास्त्रीय दृष्टिकोण आवश्यक असतो.

संख्याशास्त्र हे सामाजिक संबंधाच्या अभ्यासास अत्यंत उपयुक्त आहे. व्यापारी संस्था, सरकारी खाती, सार्वजनिक संघटना इ. सर्वांना संख्याशास्त्राचा अवलंब करावा लागला. संख्याशास्त्र विविध वैशिष्ट्यांचे व गुणांचे संख्यात्मक परिमापेमध्ये परिगणन करते. संख्यांच्या परिभाषेत विशिष्ट गोष्टीचे अवलोकन

व विशदीकरण करण्याचे काम सख्याशास्त्र करते उदा , एखाद्या वर्गातील विद्यार्थ्यांची उची व वजन याचा अभ्यास करावयाचा असल्यास वय, वजन, उची याची विशिष्ट पद्धतीने एखाद्या कोष्टकाच्या साहाय्याने माहिती माडली जाते वास्तविक वजन, उची व वय या तीनही गोष्टी प्रत्येक विद्यार्थ्याच्या वेगळ्या वेगळ्या आहेत (व्हेरिएबल), पण सख्याशास्त्राच्या साहाय्याने त्या विशिष्ट पद्धतीने माडून काही अवलोकन करून निष्कर्ष काढले जातात त्या निरनिराळ्या पद्धतीना सख्याशास्त्रीय पद्धती (स्टॅटिस्टिकल मेथड्स) म्हणतात त्यात प्रामुख्याने सख्यात्मक (क्वांटिटेटिव्ह) दृष्टीने विचार केला जातो

त्यामुळे सामाजिक शास्त्राच्या सशोधनात सख्याशास्त्रीय पद्धतींचा अवलब करून विशिष्ट प्रयोगासाठी अवलोकन घटकाची योजना (एक्स्परिमेंटल डिझाइन) आखावी लागते अर्थात ह्यासाठी जी माहिती मिळविली जाते ती प्रश्नमाला मुलाखती, नमुना-पाहणी (सॅंपल सर्व्हे), उपलब्ध विविध अहवाल, विविध दस्तऐवजी सामग्री (रेकॉर्डस) या सर्वांचा उपयोग करून आपल्या शोधकार्याची आखणी केलेली असते ती करताना अर्थात अवलोकन, तसेच पृथक्करण, तार्किक सगती इत्यादी गोष्टींच्या उपयोगावरच सारे सशोधन आधारलेले असते

सख्याशास्त्राची काही वैशिष्टये आहेत, त्यात सर्वसाधारणाचा (ॲव्हरेज) विचार केला जातो त्या प्रमाणेच विशिष्ट कार्याची विशिष्ट सदर्भातील प्रतिक्रियेची शक्यता विचारात घेतली जाते, म्हणून सख्याशास्त्र हे 'सामान्याचे शास्त्र' (सायन्स ऑफ ॲव्हरेजेस), तसेच 'सभावनादर्शकशास्त्र' (सायन्स ऑफ प्रोबॅबिलिटी) असे ओळखले जाते आणि ह्या शास्त्रातील समाव्यतचा सिद्धान्त (थिअरी ऑफ प्रोबॅबिलिटी) सशोधनात वारवार आधारास घेतला जातो माहिती साधार, बिनचूक व विश्वसनीय अशी असण्याचा प्रयत्न कसोशीने केला जातो आजच्या जीवनातील, राहणीचा गणनाक, (लिव्हिंग इडेक्स), राष्ट्रीय उत्पन्न, (नॅशनल इनकम्) या सगळ्या गोष्टी सख्याशास्त्रीय साहाय्याने ठरविल्या जातात त्यामुळे सामाजिक शास्त्राच्या शोधक्रियेत सख्याशास्त्रास बराच अवसर आहे

तथापि सख्याशास्त्राच्या काही मर्यादा पण मान्य केल्या जातात समूहाच्या पाहणीसाठी हे जसे उपयुक्त आहे तसे व्यक्तीच्या पाहणीसाठी नाही त्याप्रमाणेच सख्याशास्त्राच्या साहाय्याने कित्येक वेळा चुकीचे निष्कर्ष काढले जातात निवडणुकीत पराभूत झालेला पक्ष सख्याशास्त्रीय परिमापेचा अवलब करून आपलाच खरा विजय झाला आहे असे दाखवितो तसेच ही पद्धतीच तपशीलवार सामुदायिक माहिती मिळविण्याला उपयुक्त आहे असे नाही

संख्याशास्त्राची फार मोठी मर्यादा म्हणजे ते संख्येचा विचार करते, पण गुणाचा (क्वॉलिटी) विचार करीत नाही मुलाची उंची, वय, वजन इ. चा अभ्यास ते करू शकते, पण हुषारी, चपलता, मदपणा, धैर्य, मित्रेपणा, इ. विशिष्ट मनोविशेषांची मोजणी संख्याशास्त्र करू शकत नाही. मिळविलेली माहिती ही विशिष्ट प्रकारची प्रवृत्ती (ट्रेंड) दाखविते. तिचा व्यक्तिगत वेगळेपणा अल्प असतो. संख्याशास्त्राच्या ग्रंथात ह्या मर्यादा मान्य केल्या जातात पण अलीकडे शिक्षण व मानसशास्त्र यासारख्या शास्त्रात संख्याशास्त्रीय पद्धतीचा अवलंब वेगळ्या रीतीने केला जातो. म्हणजे विशिष्ट गुणाचे अवलोकन व पृथक्करण करून त्याचे संख्याकन केले जाते. अशा प्रकारे या गुणांचेही संख्याकन (क्वांटिफिकेशन ऑफ् क्वॉलिटीज) केले जाते सामाजिक शास्त्राप्रमाणे, मानसशास्त्राप्रमाणे, साहित्यातही या पद्धतीचा अवलंब करण्याचा उपक्रम करून पाहण्यास हरकत नाही

उदाहरणार्थ, रेडिओवरील कार्यक्रमात जी लोकप्रिय म्हणून गीते लावली जातात त्यांची सततता (फ्रीक्वेन्सी) लक्षात घेऊन काही रसिक गट ठरवून त्यांना काही प्रश्न विचारून काही निष्कर्ष काढता येतील. अर्थात् आधुनिक दृष्टीने हे जरी शोधप्रधान कार्य असले तरी पारंपरिक दृष्टीने पाहणाराना हा उपक्रम किती रुचेल वा त्याचे शोध-महत्त्व पटेल हा प्रश्न आहे पण ही एक नवी दिशा आहे, एवढे लक्षात आले तरी पुरे.

### *संशोधनाची सर्वसामान्य वैशिष्ट्ये*

कोणत्याही क्षेत्रातले संशोधन असले तरी त्याची काही सर्वसामान्य वैशिष्ट्ये लक्षात घेणे जरूर आहे

(१) संशोधनामध्ये एक प्रकारची योजकता व आखणी असते. (सेन्स ऑफ डिझाइन), ही त्याच्या मथळ्यातून व्यक्त होते

(२) संशोधन हे सजीव (सेंद्रिय) प्राण्याप्रमाणे स्वयपूर्ण व स्वयभू आहे. ह्या सेंद्रियतेच्या निकषावर निवडलेली वा संपादित केलेली सामग्री (मटेरियल), तिचे पृथक्करण, त्याची एकदर झेप, गृहीत धरलेला विशिष्ट कल्पितपक्ष, विविध घटकामधील परस्परावलंबित्व किंवा परस्परपूरकता या गोष्टी ताडून पाहता आल्या पाहिजेत.

(३) जी माहिती (डाटा) मिळविली असेल, ती पुस्तकातून तयार असलेली मिळविलेली असेल किंवा पाहणी-पद्धतीने जमविलेली असेल, प्रयोगशाळेच्या द्वारे किंवा अन्य मार्गांनी ती सिद्ध केलेली असेल पण ही माहिती किंवा हे ज्ञान संशोधनाचा पाया आहे. त्याशिवाय संशोधनाचे यत्न हे पुढे हलूच शकत नाही.

(४) सर्वसामान्य माहिती, तिचे पृथक्करण हे प्रारंभी जरी निर्जीव वाटले तरी संशोधकाच्या हाती त्याला एक वेगळीच गतिशीलता प्राप्त होते, व तिच्यापासून काही निष्कर्ष काढले जातात.

प्रत्येक क्षेत्रामधील संशोधनात ही वैशिष्ट्ये दिसतात किंवा दिसणे अवश्य आहे त्या दृष्टीने संशोधकांनी प्रयत्नशील राहावयास हवे.

## *शोधकार्याची आखणी (रीसर्च डिझाइन)*

संशोधनाच्या क्रियेत शोध-क्रियेची आखणी (रीसर्च डिझाइन) अतिशय महत्त्वाची आहे विषयपरत्वे या आखणीचे स्वरूप बदलते अगदी प्रथम, घेतलेल्या विषयाचे (टॉपिक) व त्यातल्या विशिष्ट प्रश्ना (प्रॉब्लेम) चे स्वरूप स्पष्ट करणे; नंतर मिळवावयाची माहिती कोणत्या साधनाचा अवलंब करून कशी मिळवायची ते विशद करणे, नंतर मुख्य प्रश्नाच्या सोडवणुकीसाठी भेदक चिकित्सकतेचा अवलंब (अॅनॅलिसिस) करून पृथक्करण करणे, या पृथक्करणात एक प्रकारच्या चिकित्सकवृत्तीचा (क्रिटिकल सेन्स) प्रत्यय येतो

नंतरची अवस्था म्हणजे प्रत्येक घटकाची पाहणी करून कोणत्या प्रकारे प्रश्नाची सोडवणूक शक्य आहे, तिच्यासाठी एखादे कल्पितकृत्य मानावयास हवे काय, असल्यास कोणते इ. गोष्टी येतात नंतर त्या विविध घटकांचे परस्पर संबंध पाहणे, कल्पित-पक्षाचे परीक्षण व शेवटी निष्कर्ष

निष्कर्ष काढताना आपले जे फलित (कन्क्लयूजन) असेल ते एकच निघेल, वेगळे निघणार नाही यासाठी, इतर घटकांचे नेमकेपण सिद्ध करून फक्त एकच घटक वेगळा केला जाईल, तो व तोच बदलता (ओनली वन् व्हेरिएबल) असेल अशी काळजी घेऊन संबंध शोधक्रियेच्या विविध अवस्था ठरवाव्या, व आखणी करावी.

आखणी करताना तर्कशुद्धता कटाक्षाने पाळावी आपले संशोधन सर्व लोकांच्यापुढे परीक्षणासाठी आहे हे लक्षात घेऊन जितका मोकळेपणा ठेवता येईल तेवढा ठेवावा माहिती जरी इतर ठिकाणाहून मिळवलेली असली तरी रचना आपली आहे. विटा जरी कुठून कुठून मिळविलेल्या असल्या तरी इमारतीची रचना ही कारागिराची असते. तसेच शोधकृतीचे आहे

## *काही सर्वसामान्य संकेत*

संशोधन सामान्यत कोणत्याही क्षेत्रातले असो, ते कोणत्या तरी प्रश्नामुळे (प्रॉब्लेम) सुरू होते तो प्रश्न औत्सुक्य निर्माण करील अशा शब्दात पुढे ठेवावा

लागतो. पुढची पायरी उत्तर शोधणे, त्यासाठी माहिती जमविणे जरूर असते. माहिती वर दिलेल्या मार्गांनी मिळवावयाची असते. उत्तरे शोधण्याची पद्ध प्रत्येक विषयाच्या बाबत वेगळी असेल पण तिच्यातले पायाभूत धोरण हे शास्त्र पद्धतीच्या सस्करणाने निश्चित झालेले असेल माहिती कित्येक वेळा उपयु असते, पण अशा प्रकारचे काही सशोधन असते की ते शेवटपर्यंत डोक्यातच चाल तत्त्वज्ञान हा अशा प्रकारचा विषय होय. गणितातील आकडेमोड (कॅल्क्युलेशन एखाद्या सिद्धाताची प्रमाणे शोधून काढणे इ गोष्टी डोक्यातच चालतात. प्रत्यक्ष आकडेमोड इ रूपाने त्या कागदावर उतरतात. शास्त्रात प्रयोगाना महत्त्व असले त केवळ त्यानी भागत नाही. तर चिंतन (रिफ्लेक्सेस), आकडेमोड (कॅल्क्युलेशन विगमनात्मक कारणमीमासा (इडक्टिव्ह रीझनिंग), अवलोकन (ऑब्झर्वेशन प्रयोग (एक्स्पेरिमेंट), ह्या सर्व गोष्टी केवळ अवस्थारूप (फेजेस) आहेत. महत्त्वा गोष्ट प्रश्नाची उकल शोधणे (हिटिंग ऑन क्वेश्चन); संभाव्य उत्तर मिळविण्या (थिंकिंग अप् पॉसिबल ॲन्सर) प्रयत्न करणे व आलेले निष्कर्ष परत परत यो साधनानी पारखून घेणे, या सर्वांनी बनलेली एक सलग स्वयपूर्ण मानसिक प्रक्रि म्हणजे सशोधन होय सामाजिक शास्त्राचे स्वरूप सामान्यत समान असले त काही सामाजिक शास्त्रे इतिहासातील व सद्य परिस्थितीतील विशिष्ट महत्त्वामु अधिक महत्त्वाची झालेली आहेत व त्याच्यातील सशोधनासाठी त्याच्या वैशिष्ट्य पूर्ण स्वरूपामुळे काही अगाना विशेष महत्त्व प्राप्त झालेले आहे सामाजिक शास्त्राच सशोधनाच्या विवरणात त्याचा स्वतत्र उल्लेख करणे योग्य होईल. ही शास्त्रे म्हण इतिहास, शिक्षण व भूगोल ही होत.

## *तत्त्वज्ञानातील संशोधनाचे वेगळेपण*

तत्त्वज्ञानासारख्या शास्त्रात 'साधने' ही सकेत, संकल्पना (कन्सेप्ट) सारखी प्रायः बुद्धिनिर्मित असतात. त्यामुळे, सूक्ष्म चिकित्सा व पृथक्करण य वरच भर द्यावा लागतो. तसेच विशदीकरणा (इटरप्रिटेशन) सारख्या क्रिये तत्त्वज्ञानचिकित्सेत अधिक महत्त्व आहे.

"In Philosophical Research central phase of work becom a form of interpretation or exegesis. The significance of inte relationship of the ordered data are brought out in a convi cing manner by force of logical exposition......Finaly a luci report of how and what has achieved by the researche

completes the picture of research to whatever area of human knowledge it might belong

—M Varma 'Educational & Psychological Research'

*इतिहास-संशोधन*

इतिहास-सशोधनात अतिम महत्त्वाचे काही असेल तर ते म्हणजे साधनाचे सकलन होय अनेक प्रकारची साधने उपलब्ध होत असतात, त्याची विश्वसनीयता प्रथम सिद्ध व्हावी लागते इतिहासातली साधने निर्माण केली जात नाहीत ती कोठेनरी असतातच प्रयत्नाच्या साहाय्याने ती उजेडात आणली जातात एवढेच काय ते अर्थात जितका काल दूरचा तितके साधने मिळविणे अतिशय अवघड असते व ते साधन महाप्रयत्नानी उपलब्ध करून घेतल्यानतर त्याची विश्वसनीयता ठरविणे हे काम इतके अवघड व महत्त्वाचे असते की केवळ असल्या प्रकारचे एखादे अव्वल साधन उपलब्ध करून देणाऱ्या व त्याचे साधनत्व सिद्ध करणाऱ्या सशोधकाचे मोठेपण मान्य करावे लागते

इतिहास सशोधनातल्या ह्या महत्त्वाच्या अगाचे महत्त्व म म दत्तोपत पोतदार याच्या शब्दात देणे योग्य होईल 'इतिहासाला पाचवा वेद मानण्याची प्रथा फार जुनी आहे, तथापि काळाच्या कोष्टकात सर्व घटिते (फॅक्ट्स) पक्की बनवन मानव-समाजाच्या कर्तृत्वाचे मदिर यथार्थरीत्या पाहणे हे जे इतिहासाचे मुख्य कार्य ते, कालक्रमाचे अनुसधान जर सुटले तर, साधू शकत नाही' 'घटिताच्या वास्तवतेवर त्याचप्रमाणे स्थलकालव्यक्तिनिश्चयावर नवीन सशोधन-पद्धतीत जो भर दिलेला आहे त्यामुळे इतिहास शब्दाचा निश्चित होणारा अर्थ हा त्याच्या मूलार्थाला जुळणारा असा झालेला आहे '

इतिहास सशोधनात साधनाच्या चिकित्सेला अतिशय महत्त्व असते व ते एक स्वतत्र शास्त्र निर्माण झालेले आहे साधने अनेक प्रकारची असतात, उदा , पत्रे, नाणी, मूर्ती, कजुलायती, करारनामे, जाहीरनामे, शिलालेख, दानपत्रे, शिल्पकृती, विविध दस्तऐवज हत्यारे इ इ त्या प्रत्येकाची परीक्षा करण्याचे अनेक निकष असतात त्याची माहिती व निष्पत्ती हा इतिहाससशोधनाचा पाया होय "इतिहास शास्त्रात 'पद्धतशीर सशय', अगदी जरुरीचा आहे इतिहासशास्त्रज्ञाची वृत्ती अतिशयित सशयी असली पाहिजे कोणत्याही गोष्टीचा खरेपणा जाणल्याशिवाय ती खरी मानणे साहसाचे होईल" असे के मो पडित आपल्या 'इतिहास-सशोधन-पद्धती' या निबधात म्हणतात (पृ ३३) ते अर्थपूर्ण आहे उपलब्ध कागदपत्राची

छाननी करणे हे फार महत्त्वाचे आहे विश्वासाला इतिहासात स्थान नाही प्रा शेजवलकरानी एका ठिकाणी म्हटले आहे —"नुकतेच एका मराठ्याने मला विचारले की, शिवाजीने स्वत ला गोब्राह्मणप्रतिपालक म्हणवून घेतले याला आधार दाखवा त्याने स्वत ला 'क्षत्रियकुलावतस' म्हणवून घेतले आहे पण "गोब्राह्मणप्रतिपालक" म्हणवून घेतले, या समजुतीस अस्सल कागदपत्राचा आधार नाही" [इतिहास-अभ्यास वर्ग व्याख्यानमाला पृष्ठ ६०] इतिहास-संशोधनाचे मर्म ह्या उल्लेखावरून स्पष्ट होईल

## ऐतिहासिक शास्त्रात शास्त्रीय पद्धतीचा अवलंब

साधन-साहित्याची तसेच पुराव्याची जुळवाजुळव व चिकित्सक पाहणी केल्यानतर महत्त्वाचा भाग म्हणजे साधनातून उपलब्ध होणाऱ्या माहितीचा अर्थ निश्चित करणे, हा होय एखाद ऐतिहासिक लेखरूप साधन विश्वसनीय वा अस्सल आहे असे ठरले तरी त्यातील मजकुरातील मथितार्थ बरोबर स्पष्ट करणे हे काम सोपे नाही त्यासाठी तत्कालीन लिपीची माहिती, तसेच इतर विविध लेखनसभेत माहीत असणे जरूर असते मजकुरात कित्येकदा उणीवा असतात, कोणीतरी अधिक मजकूर पुढे केव्हातरी समाविष्ट केलेला असतो, इ अनेक प्रकारच्या शक्यता लक्षात घेऊन,—थोडक्यात पुढल्या कालाचा सस्कार बाजूला सारून—तात्पर्याचा निर्णय करावा लागतो वस्तूरूप म्हणजे, मूर्ती, हत्यारे, विविध भाडी इ सारखे साहित्य असेल तर खूपच बारकाईने पाहून अस्सलपणा ठरवावा लागतो

नुसती साधनाची यथार्थता अगर अन्वयकरव पटवून भागत नाही, तर त्या साधनाचे ऐतिहासिक महत्त्व (हिस्टॉरिकल एव्हिडन्स) सिद्ध करणे हा पुढचा भाग शिवाजी महाराजाना 'गोब्राह्मणप्रतिपालक' म्हणून सामान्यत म्हटले जाते, पण पुराव्याच्या आधारे हे बिरुद सिद्ध होऊ शकत नाही, हा उल्लेख वर आलेलाच आहे तथापि एखादे साधन किंवा एखादा मजकूर अस्सल ठरला तरी त्याचे ऐतिहासिक महत्त्व हे शिल्लक उरतेच अनेक पुराणकथा, दतकथा आलेल्या असतात त्याचे ऐतिहासिक मूल्य ठरवणे हे सोपे नसते ते ठरविण्यासाठी एखादा कल्पितपक्ष मानावा लागतो त्यायोगे मजकुरातील त्रुटी दूर कराव्या लागतात हा कल्पितपक्षही निरनिराळे कस लावून पारखून घ्यावा लागतो

शेवटला महत्त्वाचा भाग म्हणजे ऐतिहासिक घटनाचे विशदीकरण अमुक घटना का घडली त्याची कारणमीमासा करणे हे इतिहासकाराचे खरे कार्य नुसती माहिती, जत्री, इ देऊन चालत नाही, तर पृथक्करणशीलतेच्या जोरावर त्या

घटनेचे, प्रसंगाचे पापुद्रे उलगडून दाखवणे व कारणावर बरोबर बोट ठेवणे हे फार मोठचा ऐतिहासिक प्रतिभेचे काम आहे इतिहासाचा काही ओघ असतो असे आज मानले जाते, त्या दृष्टीने काही गोष्टी वा घटना ह्या 'ऐतिहासिक अपरिहार्यते'- मुळे (हिस्टॉरिकल नेसिसिटी) आलेल्या असतात त्याचे ते अपरिहार्यत्व सिद्ध करणे हे ह्या कारणमीमासेत बसते शास्त्रीय पद्धतीच्या इतिहासक्षेत्रीय अवलबनाचे स्वरूप ह्या विवेचनावरून स्पष्ट होईल

## मानसशास्त्र व घटकाभ्यास (केस स्टडी)

इतिहास हे प्राचीन जीवनाची पाहणी करणारे शास्त्र आहे, तर मानसशास्त्र हे माणसाच्या मनाची पाहणी करणारे आधुनिक शास्त्र आहे मानसशास्त्र अलीकडे एवढे विकसित झालेले आहे की त्याची प्रायोगिक मानसशास्त्र ही एक शाखा निर्माण झालेली आहे, व तिच्यातले संशोधन जवळजवळ विज्ञानशास्त्राच्या पद्धतीने चालते इतिहासाच्या संशोधनात ज्याप्रमाणे साधन चिकित्सेला विशेष स्थान आहे त्याप्रमाणे मानसशास्त्राच्या संशोधनात अलीकडे एक विशेष स्वरूपाचे संशोधन-साधन निर्माण झालेले आहे त्याचे नाव 'केस स्टडी' उर्फ विशिष्ट घटकाभ्यास हा घटक वा ही 'केस' हा एक व्यक्तिगट असेल, व्यक्ती असेल, एखादी जमात असेल, एखाद्या विशिष्ट वयाचा, प्रवृत्तीचा समुदाय इ असेल निवडलेल्या घटकाची सखोल चिकित्सक पाहणी (इन्टेन्सिव्ह इन्व्हेस्टिगेशन) करणे हे ह्या पद्धतीचे उद्दिष्ट होय निवडलेल्या घटनाबाबत प्रथम विशिष्ट प्रकारचे निदान करून, त्या दृष्टीने पाहणीसाठी योग्य पद्धतीचा अवलंब करून, सर्व प्रकारच्या विकासाचे निरीक्षण करणे हे 'घटक निरीक्षणात' मुख्य काम असते ही एक दृष्टी आहे, कित्येकदा पद्धती आहे काही ठिकाणी ते एक तंत्रही ठरते थोडक्यात संशोधनातला तो नवा उपक्रम आहे

घटक निरीक्षणाला एवढे महत्त्व का आले ते पाहणे आवश्यक आहे सख्याशास्त्रीय पद्धतीच्या अवलबनाची एक उणीव मागे उल्लेखिलेली आहे व ती ही की तीत समूहाच्या प्रवृत्तीला (ट्रेंड) अधिक प्राधान्य मिळते तीत व्यक्ति-वैशिष्टचाचा फार सकोच होतो व्यक्तिगत गुणाचा अभ्यास करताना तिच्या मर्यादा जाणवतात सख्याशास्त्रीय पद्धतीत सख्यात्मक (क्वॉंटिटेटिव्ह) दृष्टी असते उलट ह्या घटक निरीक्षण पद्धतीत गुणावलोकनावर (क्वॉलिटी) अधिक भर दिलेला असतो निवडलेल्या घटकाचे सर्वांगीण व चिकित्सक निरीक्षण हे उद्दिष्ट होय ते पार पाडण्यासाठी प्रश्नमालिका, तसेच परिशिष्टे, मुलाखती इ चा अवलब करण्यात येतो व्यक्तीच्या वा घटकाच्या विशिष्ट स्वरूपाचा विकास पाहणे उर्फ

बदल लक्षात घेणे हे ह्या पद्धतीचे वैशिष्ट्य होय. ऐतिहासिक सांस्कृतिक दृष्टीही निरनिराळ्या ठिकाणी प्रमाण मानली जाते व्यक्तीच्या वा घटकाच्या वागणुकीचे, प्रतिक्रियाचे वा प्रवृत्तीचे संपूर्ण चित्र उभे करणे हे ह्या पद्धतीचे एक अंग होय. गुणात्मकता, संश्लेषणात्मकता व विवासदर्शकता ह्या प्रमुख गुणामुळे ही पद्धती विशेष स्वीकार्य झालेली आहे.

घटक-निरीक्षण-पद्धती ही संख्याशास्त्रीय पद्धतीला विरोधी नसून एका परीने पूरक आहे एकीतील उणीवा दुसरीने दूर होऊ शकतात या पद्धतीत एकापेक्षा अनेक तत्राचा वा प्रक्रियाचा अवलंब करावा लागतो निरनिराळ्या अवस्थात निरनिराळी तंत्रे निवडावी लागतात, व संशोधनाची आखणी अत्यंत काळजीपूर्वक करावी लागते.

तथापी निरीक्षणासाठी घटकाची निवड करणे अतिशय अवघड असते. त्यासाठी अनेक तत्सम संशोधनाचा बारकाईने अभ्यास करावा लागतो. एकंदर पद्धती ठरविताना पाहणी करताना संशोधकाला कल्पनाशक्तीचा वापर बराच करावा लागतो सबंध निरीक्षणात एक प्रकारचे सातत्य राहील अशी दक्षता घ्यावी लागते. सलग्न गोष्टींचा मोठा ढीग जमा होतो, आणि पृथक्करणाचा अवलंब करून त्यातून नेमके निष्कर्ष काढणे हे अतिशय अवघड असते तसेच वस्तुनिष्ठता, बिनचूकपणा, उद्दिष्टातील स्पष्टपणा हे गुण प्रयत्नाने आणणे आवश्यक असते संशोधकाजवळ एक प्रकारची भेदक सामाजिक दृष्टीही असावी लागते.

ह्या साऱ्या गोष्टी प्रयत्नपूर्वक आणाव्या लागतात त्या अभावी ह्या पद्धतीला काहीही महत्त्व नाही. अशा प्रकारे दक्षता घेऊनही संपूर्णतया वस्तुनिष्ठ असणे बरेच असंभवनीय असते, ही या पद्धतीची फार मोठी मर्यादा आहे. सबंध पाहणीच व्यक्तिगत स्वरूपाची असते पूर्वग्रह हे निश्चित असतातच. त्याच्या पलीकडे जाणे जवळ जवळ अशक्य असते तिसरी मर्यादा अशी की ह्या पद्धतीत निरनिराळ्या प्रकारची एवढी अमाप सामग्री जमा होते की संशोधक भांबावून जातो त्यातून मार्ग काढण्याची कुवत अत्यंत निष्णात संशोधकाजवळच असू शकते.

ह्या मर्यादा मान्य करूनही ह्या पद्धतीचे नावीन्य व महत्त्व हे मान्य करावे लागते या पद्धतीपासून काही निष्कर्ष निघू शकतील, किंवा काही कल्पितपदांही आधारास घ्यावे लागतील.

निरनिराळ्या क्षेत्रात ह्या पद्धतीचा वापर करता येईल. साहित्याच्या क्षेत्रातील एखादा प्रकार, किंवा ग्रंथ, एखादी प्रवृत्ती यासारखे पाहणी-घटक म्हणून स्वीकारता येतील. पण तत्पूर्वी स्वतः संशोधकाने या पद्धतीचा खूप सखोल

अभ्यास करून आपली विशिष्ट पद्धती (प्रोमीजर) अतिशय दक्षतेने ठरवावी लागेल सामाजिक क्षेत्रातील काही विषयाचा उल्लेख वर आलेलाच आहे

## 'ॲक्शन रीसर्च' ऊर्फ कार्यकारी संशोधन

सशोधन हे प्राय दोन प्रकारचे असते हे पूर्वी पाहिले आहेच एक तात्त्विक स्वरूपाचे यालाच मूलभूत (फडामेंटल) सशोधन म्हणतात यात कोणत्यातरी, तत्त्वाचा, मूल्याचा परिशोध करण्याचा प्रयत्न केलेला असतो पूर्वी पाहिल्याप्रमाणे हेही अतिशय उपयुक्त असेच सशोधन आहे तथापि जीवनाच्या गुतागुतीबरोबर, विकासाबरोबर तत्त्वसशोधनाचे क्षेत्र अधिकाधिक गोलात जाऊ लागते. त्यासाठी (मूलभूत तात्त्विक सशोधनासाठी) विविध प्रकारची माहिती वा साधने (डाटा) हीही एक प्रकारच्या सशोधनानेच परिप्राप्त करून घ्यावी लागतात वास्तव विशेषत सामाजिक सशोधनाच्या क्षेत्रात अवलबन (ॲप्लाईड रीसर्च) सशोधनाचा पायडा पडला आहे यात विशिष्ट सामाजिक समस्येचा वा तत्सम गोष्टीचा शोधकाच्या भूमिकेवरून व मापपद्धतीचा अवलब करून अभ्यास केला जातो म्हणजे कार्यकारण पद्धतीच्या अवलबनाने काही निष्कर्ष काढले जातात शैक्षणिक क्षेत्रात ह्या अवलबन-सशोधनाचे आणखी एक अग उपलब्ध झाले आहे त्याला कार्यकारी सशोधन (ॲक्शन रीसर्च) असे म्हटले जाते

अवलबन सशोधनाचे क्षेत्र दिवसेदिवस मर्यादित होत जाते, त्यामुळे शिक्षणासारख्या क्षेत्रास ते फारसे उपयुक्त ठरू शकत नाही विशेषत जेव्हा एखाद्या वर्गातील विद्यार्थ्यांची शिक्षा प्रक्रिया (लर्निंग प्रोसेस) अभ्यासावयाची असते व निरनिराळे उपाय योजून तीत सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करावयाचा असतो, तेथे रूढ अर्थाने अवलबन-सशोधनपद्धती (ॲप्लाईड रीसर्च) ही अपुरी पडते, व नव्या मार्गाचा अवलब करावा लागतो अशा प्रकारच्या अडचणीच्या परिहारासाठी सशोधनप्रकार उत्पन्न झाला आहे

कार्यकारी सशोधन हे एखाद्या सिद्धाताची पाहणी करण्याच्या हेतूने अस्तित्वात आलेले नाही तर विशिष्ट समस्येचा तिच्या विशिष्ट पार्श्वभूमीवरून अभ्यास करणे व *तिच्या सोडवणुकीचे मार्ग शोधणे हे या सशोधनप्रकाराचे उद्दिष्ट होय हे मार्ग* वा उपाय हे त्या विशिष्ट समस्येपुरतेच म्हणजे सापेक्ष महत्त्वाचे असतात त्यात सार्वत्रिकता (यूनिव्हर्सॅलिटी) नसते शाळेतील विद्यार्थ्यांची, शिक्षकाची व शिक्षण-पद्धतीची सुधारणा घडवून आणणे हे ह्या प्रकाराचे वैशिष्ट्यच

मूलभूत सशोधन व आताच पाहिलेले 'कार्यकारी' सशोधन यात मूलभूत सघर्ष आहे काय ? असा प्रश्न काही लोक विचारतात तसा तो नाही दोहोची

मूलभूत धारणा एकन आहे. फक्त कोणत्या गोष्टीवर अधिक भर द्यायचा या बाबत मतभेद आहेत. मूलभूत सशोधन अर्थातच अधिक महत्त्वाचे आहे कारण त्यानेच त्या क्षेत्राची उची वाढते, तेव्हा मोठ्या पदवीसाठी प्रयत्न करणारानी, तसेच शिक्षण-तज्ञ, विशिष्ट तज्ज्ञता मिळविण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणारे सशोधक यानी आपले लक्ष मूलभूत सशोधनावरच केंद्रित करणे योग्य ठरेल. परतु साध्या शिक्षकाच्या दृष्टीने व शिक्षणपद्धतीत सुधारणा घडवून थाणण्याच्या हेतूने हे कार्यकारी सशोधन तितकेच महत्त्वाचे आहे विस्येक तज्ज्ञाचा मते ह्या प्रकारच्या सशोधनातून खरी व सतत प्रगती साधणार आहे. " While there will always be a need for fundamental research and the development of more adequate theories of education, it is Action Research that will involve classroom teacher, providing, avenue for professional growth and improvement of the curriculum ( J. W. Best in " Research in Education." page 13 ).

### भूगोल : एक दुर्लक्षित संशोधन-क्षेत्र

सामाजिक क्षेत्रातील सशोधनाचा तिसरा महत्त्वाचा विषय भूगोल होय भूगोल वैज्ञानिक शास्त्रे व सामाजिक शास्त्रे याच्या सीमारेषेवर पडतो. भूगोलातील जो प्राकृतिक (फिजिकल) भूवर्णनाचा भाग आहे तो विज्ञानशास्त्रात पडेल. त्याचा मानवी जीवनाशी सबद्ध जसा भाग आहे तो सामाजिक शास्त्राच्या कक्षेत पडेल. वनस्पती व प्राणी याचा अभ्यास हा जीवशास्त्राच्या कक्षेत समाविष्ट होईल

त्यामुळे भूगोलाच्या सशोधनातील विषय ठरविताना ह्या तीनपैकी कोणत्या कक्षेत पडणारा विषय आहे हे लक्षात घेऊन त्याप्रमाणे त्याच्या सशोधनाचे स्वरूप ठरवावे लागेल. इतिहासाप्रमाणे किंवा मानसशास्त्राप्रमाणे एखादी विशिष्ट पद्धती भूगोलाच्या बाबतीत निर्माण झालेली नाही हे खरे आहे तथापि भूगोलाची स्वत ची अशी वैशिष्टचपूर्ण भूमिका आहे. एक महत्त्वाचा, त्याचबरोबर राष्ट्रीय दृष्ट्या अत्यत आवश्यक पण तेवढाच दुर्लक्षित असा अभ्यासविषय म्हणून त्याच्याकडे येथे लक्ष वेधले आहे. आपणाकडे सर्व मोठचा व महत्त्वाच्या सामाजिक व वैज्ञानिक शास्त्रात मोठमोठे सशोधक झालेले आहेत, परंतु भूगोलाचे क्षेत्र असे दिसते की ज्यात सशोधनाची पहाटच अद्याप उजेडावयाची आहे. राष्ट्रीय व अन्य दृष्टीनी इतके महत्त्वाचे शास्त्र इतके दुर्लक्षित असावे हे खरोखर खेदजनक होय.

राष्ट्रीय दृष्टीने भूगोलाचे अपरिमित महत्त्व शासनाने वा विद्यापीठानी ओळखून त्यास अग्रहक्क देणे जरूर आहे आजच्या या आतरराष्ट्रीय सबधाना महत्त्व

असणाऱ्या जगात खरोखर अतिशय महत्त्वाचा विषय असेल तर तो भूगोल होय. पाश्चात्य राष्ट्रांत भूगोलाच्या राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, आंतरराष्ट्रीय अशा शाखा पाडलेल्या आहेत. आणि या प्रत्येकीचा अभ्यास स्वतंत्र शास्त्राच्या वैभवाने केला जातो. वास्तविक पाहता जागरूकतेने जगावयाचे असेल तर प्रत्येक देशाचा बारकाईने–अगदी बारकाईने अभ्यास करणारे–केलेले अभ्यासक प्राध्यापक देशात तयार हवेत त्यासाठी प्रत्येक विद्यापीठात भूगोलाचे खाते उघडून स्वतंत्र अभ्यासासाठी (स्पेशलायझेशन) तीनचार देश त्या त्या प्राध्यापकाकडे सोपवायचे. त्या देशाच्या इतिहास, भूगोल, राज्यपरंपरा, संस्कृती, व्यापार, अर्थव्यवस्था इ. सर्व गोष्टींचा अद्ययावत् अभ्यास त्यांनी करावयाचा अशी तरतूद करावयाची. म्हणजे प्रत्येक देशाशी खऱ्या अर्थाने चांगले संबंध प्रस्थापित करता येतील व आपणांलाही जागरूकतेने जगता येईल [ चीनचे आक्रमण झाले तेव्हा चीनचा खराखुरा व बारकाईने अभ्यास असलेले कोणी नव्हतेच या देशात. काही अमेरिकन प्राध्यापकांनी लिहिलेल्या पुस्तकांवरून आम्ही चीनला ओळखायला लागलो ! ]

जगातला प्रत्येक देश जागृत होत आहे दुसऱ्या देशाशी चांगले संबंध प्रस्थापित करू इच्छित आहे. देशादेशात जा-ये इतकी सुरू झालेली आहे की, भूगोल अभ्यासाला फार महत्त्व आहे. देशादेशाशी संबंध ठेवायला खरे अभ्यासकच उपयोगी पडतात. त्यासाठी जादा खर्च झाला तरी ती एक भांडवल-गुंतवणी आहे ह्या दृष्टीने विद्यापीठाच्या व संशोधनाच्या सर्वच क्षेत्राकडे पाहणे जरूर आहे.

ज्या विद्यापीठात भूगोल अभ्यास सुरू आहे त्या विद्यापीठानाही काही देशाचा वा त्याच्या काही भागाचा अभ्यास ह्या प्रकरणात आलेल्या घटकावलोकन (केस स्टडी) च्या धर्तीवर किंवा पाहणी-पद्धती करून घ्यावयास हरकत नाही. संशोधन राष्ट्राभिमुख करण्याचा तो एक मार्ग आहे.

## सामाजिक शास्त्रांत वैज्ञानिक पद्धती : स्वरूप व मर्यादा

ऐतिहासिक शास्त्राकडून सामाजिक शास्त्राकडे वळले की एक फरक जाणवतो. ऐतिहासिक शास्त्रात दोन घटनामधील संबंध दाखविणे हेच महत्त्वाचे असते. सामाजिकशास्त्रांत यापलिकडे काहीतरी असते. जेथे काही सर्वसामान्य नियम सांगण्याचा प्रयत्न केला जातो, ते अंग भौतिक शास्त्राच्या अभ्यासास जवळचे असते. सामाजिक शास्त्राच्या बाबतीत शास्त्रीय पद्धतीचा अवलंब कसा केला जातो त्याचे स्वरूप सामान्यतः असे असते :—

(१) प्रथम पाहणी-क्षेत्र ठरवून सूक्ष्म अवलोकनाच्या आधाराने वस्तुस्थितीचे स्वरूप निश्चित करणे व पृथक्करण करणे, (२) त्यानंतर त्या विविध घटकांचे योग्य

स्वरूप वा संबंध व्यक्त करण्यासाठी आवश्यकतेनुसार एखादा कल्पितपक्ष मानणे (३) ह्या कल्पितपक्षापासून जे निष्कर्ष निघतात त्याचे पुन परीक्षण (व्हेरिफिकेशन) करून कल्पितपक्षाची युक्तायुक्तता सिद्ध करणे व या सर्वांच्या आधारे काही निष्कर्ष काढणे अर्थात ही सारी प्रक्रिया विज्ञानशास्त्रात अवलंबल्या जाणाऱ्या पद्धतीसारखीच आहे पण विज्ञानशास्त्रातील मांडणीत, मापेत, परिमापेत एक प्रकारचा काटेकोरपणा असतो सामाजिक शास्त्राची ठेवणच भिन्न असल्याने विवेचनात इतका नेमकेपणा वा काटेकोरपणा येणे कठिण असते त्यामुळे काही फरक हे गृहीतच धरावे लागतात

पहिला फरक यापूर्वीच स्पष्ट केला आहे, व तो म्हणजे सामाजिक शास्त्रात विज्ञानशास्त्राप्रमाणे पुन तपासण्याची तरतूद नाही येथे प्रत्येक घटना ही जवळ जवळ 'एकमेवाद्वितीय' (यूनिक) अशीच असते दोन घटना समान वाटल्या तरी त्यातील साम्य फार मोजके वा मर्यादित असते तुलनेसाठी एखादे उदाहरण घ्यायचे झाले तर ते कल्पनेने निर्माण करून घ्यावे लागते 46883

दुसरा फरक असा की विज्ञान शास्त्रातील कार्यकारणभाव व सामाजिक शास्त्रातील कार्यकारणभाव याचे स्वरूप वेगळे असते भौतिक शास्त्रातील कार्यकारण-संबंध हा जवळ जवळ प्रयोगसिद्ध असतो, पण सामाजिकशास्त्रात मानवी मनाच्या प्रतिक्रियावर कार्यकारणसंबंध आधारलेला असल्याने तो संभाव्यतेच्या स्वरूपाचा असतो हा अंदाज नेहमी वा विशिष्ट संदर्भातही खरा ठरेलच असं सांगता येत नाही दारिद्र्याने समाजातल्या अपप्रवृत्तीची वाढ होते, हे मान्य केले व त्याप्रमाणे एखाद्या समाजातील दारिद्र्य नष्ट केले, तरी अपप्रवृत्ती कमी झालीलच असे नाही पण त्याचबरोबर अपप्रवृत्तीचा व दारिद्र्याचा काहीच संबंध नसतो असेही मानता येणार नाही सामाजिक गोष्टींचा विचार करताना अनेक कारणे विचारात घ्यावी लागतात तीही अंदाजाच्या स्वरूपाचीच असतात.

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात मानवी प्रेरणा, प्रज्ञा, हेतू, उद्दिष्टे, वासना इ गोष्टींना 'कारणे' म्हणून महत्त्व प्राप्त झालेले असते भौतिक शास्त्रात ह्यांना स्थान नाही त्यामुळे सामाजिक क्षेत्रातील कार्यकारणाची पाहणी करताना ह्या गोष्टींना प्राधान्य द्यावे लागते, उलट भौतिक शास्त्रीय कार्यकारणभावात ते कटाक्षाने टाळले जाते, इतकेच नव्हे तर ते वर्ज्य असते

व्यक्तीच्या प्रेरणा, हेतू, उद्दिष्टे ही संकीर्ण (कॉम्प्लेक्स) असतात, ती विविधही असतात त्यामुळे एखाद्या माणसाचे एखाद्या प्रसंगी विशिष्ट परिस्थितीत वर्तन कसे घडेल ते निश्चितपणे सांगता येत नाही व्यक्तिसमूहाविषयी काहीतरी सांगता येईल, तेही संख्याशास्त्रीय पाहणीचा अवलंब केल्यावर म्हणजे निरनिराळ्या

सामाजिक घटना व निरनिराळे सामाजिक घटक अगर परिस्थिती यांच्या साहचर्याचे स्वरूप (रिलेशन्स) आपण पाहतो, व सभाव्य स्वरूपाचे काही निष्कर्ष काढतो. सामाजिक शास्त्रे मानवी हेतू, प्रेरणा, कल्पना इ. ना मध्यवर्ती कल्पून मानवी जीवनाच्या विविध अंगाचे अवलोकन करतात उलट भौतिक शास्त्रे 'वस्तू' (सब्स्टन्स) ला अधिक महत्त्व देतात या मर्यादा लक्षात घेऊनही सामाजिक शास्त्राच्या संशोधनात शास्त्रीय पद्धती ही स्वीकार्यच मानावी लागते. तिचा गाभा 'वस्तुनिष्ठता' (ऑब्जेक्टिव्हिटी) हा आहे सामाजिक संशोधनाच्या क्षेत्रात तो गुण आणण्याचा प्रयत्न या पद्धतीच्या तारतम्यपूर्वक अवलंबनानेच चालू आहे

## राष्ट्राराष्ट्रांतील भिन्नतेचे पडसाद : ब्रिटन

सामाजिक शास्त्रातील संशोधन पुढारलेल्या मागासलेल्या अशा सर्वच राष्ट्रात आज एकप्रकारच्या आस्थेवाईकपणे चालविले जात आहे त्याचे स्वरूप प्रत्येक राष्ट्राच्या प्रगतीच्या अवस्थेप्रमाणे, गरजेप्रमाणे बदलते आहे मागास, अर्धमागास राष्ट्रातील प्रश्नांचे, त्यांच्या सोडवणुकीचे स्वरूप वेगळे आहे, तर सुधारलेल्या राष्ट्रात वेगळीच परिस्थिती दिसून येते राष्ट्राच्या परंपरेमुळे तसेच ध्येयवादामुळेसुद्धा सामाजिक संशोधनातील विशिष्ट प्रकारचे गुणदोष किंवा समस्या निर्माण होतात. आपल्याशी संबद्ध अशा तीन प्रमुख राष्ट्रातील उदाहरणांनी हा मुद्दा स्पष्ट होईल

आपला प्रथम संबंध ब्रिटनशी आहे ब्रिटनमध्ये सामाजिक शास्त्राविषयी आस्था वाढत आहे बरेच विद्यार्थी पुढे येत आहेत त्यासाठी निरनिराळ्या संघटना निर्माण होत आहेत. पण ब्रिटनपुढील सर्वांत अवघड प्रश्न आर्थिक तरतुदीचा आहे त्यासाठी निरनिराळे मार्ग शोधले जातात पूर्वकालीन ब्रिटिश साम्राज्यात जे लहान मोठे देश होते, त्यांच्याशी संबंध निरनिराळ्या कराराच्या योजनांच्या मार्गानी ठेविला जातो त्यातून पैसा उत्पन्न करून तो संशोधनासाठी उपलब्ध केला जातो. इंग्लंडमधील 'युनिव्हर्सिटी ग्रँट्स् कमिटी' ही विद्यापीठीय संशोधनाचे नियंत्रण करते. तिच्या धर्तीवरच आपले 'विद्यापीठ अनुदान मंडळ' स्थापन झालेले आहे. ब्रिटनचा मागास व अर्धमागास देशाशी पूर्वकालीन साम्राज्यामुळे विशेष संबंध आल्यामुळे तेथील सामाजिक संशोधनास वेगळेच व व्यापक स्वरूप येत आहे.

## रशिया

ब्रिटनकडून रशियाकडे वळले तर वेगळेच दृश्य दिसते रशियात सामाजिक शास्त्रीय संशोधनास विलक्षण प्राधान्य दिले जात आहे नियोजनप्रधान अर्थरचना असल्यामुळे तसा आर्थिक प्रश्न नाही तसेच समाजवादी तत्त्वज्ञानामुळे सर्व संशोधन शासकीय नेतृत्वाने चालू आहे. एका दृष्टीने ते अपरिहार्यही असेल

सामाजिक व इतर सर्व क्षेत्रातील संशोधनाबाबत, तसेच एकदर सर्व बौद्धिक क्षेत्रातील व्यवहारावर एका विशिष्ट विचारसरणीचा प्रभाव तेथे विशेष जाणवतो त्या विचारसरणीमागे जी पायाभूत पद्धती आहे तिला शास्त्रीय व सर्वच संशोधनात सोव्हिएत देशात अपार महत्त्व आहे म्हणजे इतर राष्ट्रात 'शास्त्रीय-पद्धती'ला जे अनन्य महत्त्व आहे, त्या 'शास्त्रीय'तेचे रशियन विचार-परंपरेप्रमाणे तेथील विचारवंतांनी एका विशिष्ट तत्त्वसरणीत रूपांतर करून घेतले आहे व ती तत्त्वसरणी म्हणजे ऐतिहासिक विरोध-विकासवादाची (डायलेक्टिक मटेरियालिझम) होय सामाजिक व वैज्ञानिक शास्त्रातील संशोधनात हा दृष्टीकोन प्रमाण मानला जातो अर्थात काही बाबतीत रशियन संशोधकांनी फार चांगले काम केलेले आहे उदा, भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात मार (Marr) या भाषाशास्त्रज्ञाने काही मूलगामी उपपत्ती लाविल्या आहेत [आमच्याकडे त्याचा अवलंब झालेला दिसत नाही ] अशा रीतीने *विशिष्ट तात्त्विक आग्रहातून काही चांगले, काही वाईट असे दोन्ही निष्पन्न होते* असे दिसते अनेक संशोधन-पद्धतींपैकी ही एक महत्त्वाची पद्धती ह्या दृष्टीने तिच्याकडे पाहण्यास हरकत नाही प्रत्येक देशाच्या ध्येयसरणीचा परिणाम सामाजिक संशोधनावर पडतो असे वर म्हटले आहे त्याचा प्रत्यय ह्या उदाहरणाने स्पष्ट येईल

ऐतिहासिक भौतिकवादी वा मार्क्सवादी विचारसरणी ही संशोधनाच्या व विचाराच्या क्षेत्रात जरी नवे चैतन्य निर्माण करण्यास प्रारंभी प्रारंभी यशस्वी होत असली तरी काही कालानंतर तिच्यातील मर्यादा अधिकाधिक स्पष्ट होऊ लागतात ह्या पद्धतीला, ज्यांना मार्क्सवाद मान्य नाही अशांचा तर विरोध असतो, व तो विरोध समजण्यासारखा असतोच पण वस्तुस्थिती मात्र अशी आहे की मार्क्सवाद मान्य असणाऱ्या दोन विचारवंतांतच या पद्धतीच्या अवलंबनाबद्दल तीव्र स्वरूपाचे मतभेद

History ' हा ग्रथ प्रकाशित केला या ग्रथांचे महत्त्व लेखकाच्या भारतीय इतिहासाच्या दृष्टीत व अभ्यासपद्धतीत आहे

अर्थात या पद्धतीने केलेले विवेचन व काढलेले निष्कर्ष हे कित्येकाना अस्वीकार्य वाटण्याचा सभव आहे पण या पद्धतीच्या अवलबनात दिसून येणारा अवलोकनाचा वारकावा, दृष्टीची भेदकता आणि वस्तुनिष्ठता ह्या गोष्टी सशोधनाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या आहेत इतिहासाचे आदर्शीकरण करण्याच्या व आपले विचार इतिहासावर लादण्याच्या पद्धतीपेक्षा ही पद्धती शास्त्रीय पद्धतीला बरीच जवळची आहे हे मान्य करावे लागेल.

विशेषत दोन मार्क्सवादी राष्ट्रात आज जी वैचारिक तेढ निर्माण झालेली दिसत आहे तिचा परिणाम ह्या पद्धतीचा अपुरेपणा स्पष्ट होण्यात झाला आहे काही कालानतरच खऱ्या ऐतिहासिक दृष्टीतून ह्या पद्धतीकडे पाहता येईल पण या पद्धतीचे शास्त्रीय पद्धतीशी बरेच जवळचे नाते आहे, ह मान्य करावे लागते कित्येक शास्त्रात विशिष्ट मर्यादेपर्यंत तिचे अवलबन बरेच मूलगामी स्वरूपाचे निष्कर्ष उपलब्ध करून देते पुढे जसजसा विशिष्ट तत्त्वज्ञानाचा (डॉग्मा) वरचष्मा वाढू लागतो तसतशी ती अपुरी वाटू लागते ती अपुरी आहे, पूर्णतया अस्वीकार्य नाही हे लक्षात घेणे जरूर आहे तिचा अवलब करून तिच्या मर्यादा स्पष्ट झाल्यावर पलीकडे जावे लागते, सपूर्णतया तिचा त्याग करून नव्हे

## यू. एस्. ए.

रशियाकडून युनायटेड स्टेट्सकडे वळले तर वेगळेच दृश्य दिसते येथे सामाजिक सशोधन सर्वच बाबतीत प्रगत झाले आह विषयाची निवड, पद्धती इ बाबतीत अतिशय काटेकोरपणा, बारकाई, शास्त्रीय पद्धती याचा आग्रह धरला जातो पैशाचा तर प्रश्नच नाही खाजगी सघटना व शासन वाटेल तितका पैसा उपलब्ध करून देते. पण असे असताही एक वेगळाच प्रश्न या क्षेत्रात निर्माण झालेला आहे. तो एका लोकशाही देशात झालेला आहे, हे लक्षात घेतले असता, जसजशी सामाजिक क्षेत्रात अधिकाधिक प्रगती होत जाईल तसतसा अशा प्रकारचा प्रश्न जवळ जवळ सर्वच देशात निर्माण होण्याची शक्यता आहे असे दिसते हा प्रश्न म्हणजे विद्वत्क्षेत्रीय स्वातन्त्र्याचा (ॲकॅडेमिक फ्रीडम) होय सामाजिक शास्त्रीय सशोधनातून जे निष्कर्ष निघतात ते कित्येकदा ज्या सस्थेतर्फे वा सघटनेतर्फे (त्यात विद्यापीठेही आली) चालते त्या सघटनेच्या सचालकाना पसत नसतात, अनुकूल नसतात तेव्हा त्याचा परिणाम त्या सशोधकाना भोगावा लागतो अमेरिकेतील विचारवतापुढे ही मोठी समस्या निर्माण झालेली आहे 'एन्सायक्लोपीडिया ऑफ

सोशल सायन्सेस' ह्या अमेरिकेत प्रकाशित झालेल्या विश्वकोशातील लेखात ह्या प्रश्नासंबंधी वॉशिंग्टन विद्यापीठाचे प्रोफेसर एल्. एल्. बर्नार्ड हे लिहितात. 'It would be impossible to include here a list of men who have been dismissed from their academic position because of their political and economic views in last 50 years. The Association of American University *Professors* has not been able to solve the problem of academic freedom, though it has amiliorated condition.' *

या उल्लेखावरून या प्रश्नाचे गांभीर्य स्पष्ट होईल.

आपल्याकडील सामाजिक क्षेत्रातील संशोधन हे प्राथमिक अवस्थेत असल्याने व लोकशाही पद्धतीचा अवलंब केल्यामुळे अद्याप तरी अशा प्रकारचे प्रश्न इकडे निर्माण झालेले दिसत नाहीत. तरी पण ते पुढे मागे निर्माण होणारच नाहीत व एकदर सर्व ठाकठीक आहे अशातला भाग नाही. आपल्या सामाजिक संशोधनापुढे एक प्रकारचे स्पष्ट ध्येय असणे अवश्य आहे व ते जर स्थूलमानाने आपणापुढे निश्चित असेल तर ह्या व त्या प्रकारचे गंभीर प्रश्न फारसे निर्माण होऊ नयेत असे वाटते.

अगदी निराळ्या स्वरूपाची आपली सांस्कृतिक परंपरा आहे. ब्रिटिशांच्या राजवटीमुळे काही आगळाच परिणाम झाला आहे व या सर्वांच्या पलीकडे जाऊन एक वेगळ्या प्रकारचा, विकसनशील, विविध स्वातंत्र्याचा उपभोग घेऊ शकणारा, एकसंध व स्वविकासी असा नवा समाज आपणास निर्माण करावयाचा आहे व त्या ध्येयाच्या दिशेने आपले सामाजिक, वैज्ञानिक संशोधन आखले जावयास हवे. अशा प्रकारचे जर काही थोर उद्दिष्ट आपणापुढे असेल तर मार्गही सुचेल व विविध अडचणीचे निराकरणही होईल. अन्यथा हे प्रश्न निर्माण होण्याची शक्यता गृहीत धरली पाहिजे.

---

* अर्थात हे आपले अवलोकन विश्वकोशासारख्या ग्रंथात नमूद करून ठेवण्याइतपत स्वातंत्र्य अमेरिकेत आहे हे मान्यच करावयास हवे.

# ३

# साहित्यक्षेत्रीय संशोधन : व्याप्ती व मर्यादा

### संशोधन-क्षेत्रांचे वर्गीकरण

आतापर्यंत वैज्ञानिक व सामाजिक क्षेत्रातील संशोधनाचे स्वरूप पाहिले प्रज्ञा-व्यापाराचे तिसरे क्षेत्र म्हणजे साहित्य व कलाचे होय साहित्यातील संशोधनाचा कोणत्या क्षेत्रात समावेश करावयाचा ह्यासंबंधी निरनिराळी मते आहेत प्रस्तुत ग्रंथात विज्ञानशास्त्राचे क्षेत्र, सामाजिक शास्त्राचे क्षेत्र व साहित्य कलाचे क्षेत्र अशी प्रज्ञा व प्रतिभा व्यापाराची तीन प्रमुख क्षेत्रे मानली आहेत या प्रत्येक क्षेत्रात उपयुक्ततेला प्राधान्य देऊन बरेच शोधन चालते विज्ञानशास्त्रे ही बरीच प्रगत व विकसित झालेली असल्याने असल्या प्रकारच्या संशोधनाची त्यानी एक वेगळी शाखाच मानली आहे तिला तंत्रविद्या (टेक्नॉलॉजी) असे नावही प्राप्त झाले आहे ती स्वतंत्र शाखा म्हणून विकसित होत असली तरी वैज्ञानिक संशोधनाशी तिचा घनिष्ठ संबंध आहे, हे यापूर्वी पाहिलेच आहे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातही उपयुक्ततेला प्रमाण मानून चालू असलेल्या विविध उपक्रमाचेही स्वरूप पाहिले.

साहित्याचे स्थान थोडे स्वतंत्र व वेगळे आहे कारण साहित्य हे कोणत्या प्रकारचे शास्त्र मानावयाचे हा प्रश्न आहे सामाजिक शास्त्रापैकी वर्तनवादी शास्त्रास ते जवळचे आहे त्याउलट प्रतिमा व नवनिर्मितीप्रधान अशा कलाक्षेत्रास ते दुसऱ्या जवळचे आहे या वैशिष्ट्यामुळेच साहित्याच्या संशोधनाचा व संशोधन-तंत्राचा विचार स्वतंत्रपणे केलेला सहसा कोठे आढळत नाही

श्री. अ का प्रियोळकर आपल्या एका निबंधात संशोधनक्षेत्राचे वेगळेच वर्गीकरण देतात * "(१) विद्वत्संशोधन (ॲकॅडेमिक रीसर्च) [भाषा व वाङ्मय याचे संशोधन या पहिल्या प्रकारात येते याचे क्षेत्र मुख्यत ग्रथालय असते] (२) शास्त्रीय संशोधन (सायंटिफिक रीसर्च) याचे क्षेत्र प्रयोगशाळा (३) सामाजिक संशोधन (सोशल रीसर्च) लोक, जातिसंस्था याचा अभ्यास (४) कलाविज्ञान संशोधन (टेक्नॉलॉजिकल रीसर्च) व्यापार उद्योगधद्याकरता या संशोधनाचा उपयोग होतो" अशा प्रकारचे त्याचे विवेचन आहे पण हे वर्गीकरण फारसे काटेकोर आहे असे म्हणता येणार नाही भाषा, वाङ्मय, इतिहास याप्रमाणे सामाजिक शास्त्राचे संशोधन हेही विद्यापीठीयच (ॲकॅडेमिक) होय तसेच इतिहासाचे संशोधन ग्रथालयापुरते असते असे म्हणता येत नाही व सामाजिक शास्त्राच्या संशोधनास पुष्कळसे साहाय्य ग्रथालयाचेच होते, हेही लक्षात घेणे अवश्य आहे त्यानी मानलेले 'कलाविज्ञान' क्षेत्र हे आज औद्योगिक संशोधना-(इन्डस्ट्रीयल रीसर्च) मध्ये समाविष्ट होते

## प्रत्येक क्षेत्राचे वेगळेपण

वैज्ञानिक व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील संशोधनाचे स्वरूप मागील प्रकरणात पाहिल्यानतर साहित्यातील संशोधनाकडे वळणे क्रमप्राप्त होईल साहित्यक्षेत्रीय संशोधनाची मूलभूत भूमिका ही इतर क्षेत्रीय संशोधनाप्रमाणेच आहे म्हणजे कोणतातरी एखादा प्रश्न निर्माण करून त्याचे उत्तर शोधण्याचा प्रयत्न करणे ही गोष्ट सर्वच संशोधनात समान आहे तशी येथेही आहे पण प्रश्न निर्माण केल्यानतर पुढचा महत्त्वाचा भाग म्हणजे विशिष्ट माहिती (फॅक्ट्स) जमविणे विज्ञानाच्या क्षेत्रात ही माहिती म्हणजे फॅक्टस प्रयोगाच्या साहाय्याने तयार केल्या जातात तीच गोष्ट सामाजिक क्षेत्रीय संशोधनात तेथे निरनिराळ्या मार्गांनी मिळवि-लेल्या माहितीवरून निष्कर्ष काढायचे असतात ती माहिती संशोधकास स्वत. निर्माण करून घ्यावी लागते वाङ्मयीन संशोधनात माहिती मिळवायची ती ग्रथालयातील ग्रथात कोठेतरी असतेच, फक्त ती बरोबर शोधून काढून तिचा उपयोग करून घेणे हे काम महत्त्वाचे असते माहिती तयार असली तरी ती शोधून काढावी लागते यामुळे अर्थातच वाङ्मयीन संशोधनात, तसेच पुष्कळ अशी सामाजिक शास्त्रीय संशोधनात ग्रथालयाचे स्थान अत्यत मोलाचे आहे

साहित्यविषयक संशोधनात साहजिकच ग्रथशाळेचे महत्त्व अनन्य आहे एकदा विषय निवडल्यानतर आनुषगाने मिळविण्याची माहिती प्राय ग्रथाद्वारे मिळवावी

* प्रिय आणि अप्रिय पृ १५६ (संशोधनाचे संशोधन)

लागते वैज्ञानिक शास्त्राच्या सशोधनात प्रयोगशाळेला जे महत्त्व आहे ते सामाजिक शास्त्राच्या व साहित्यविषयक सशोधनाच्या क्षेत्रात ग्रथालयाना आहे [प्रयोगशाळे-पेक्षा अर्थात ग्रथालये निर्माण करणे व टिकविणे तुलनेने कमी खर्चाचे असते ] तसेच ती सर्वसामान्य विद्यार्थ्याच्या कक्षेत पण असतात इतर विषयाप्रमाणे साहित्य-विषयक सशोधनात एक प्रकारची शिस्त अपेक्षित असते तिचा विद्यार्थी-मनावर होणारा सस्कार हा त्याच्या बौद्धिक प्रगतीच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा असतो म्हणूनच अमेरिकेसारख्या प्रगत राष्ट्रात प्रथम पदवीच्या विद्यार्थ्याकडून 'सशोधन व इतिवृत्त तयार करणे' (रीसर्च व रिपोर्ट राइटिंग) ह्या विषयाची तयारी करून घेतली जाते म्हणजे तज्ज्ञाच्या मार्गदर्शनाखाली थोडे सशोधन करूनच घेतले जाते त्यामुळे त्याच्याकडे वाङ्मयीन सशोधनासबधीही अगदी वेगळी कल्पना रूढ झालेली आहे आपल्याकडल्याप्रमाणे इतिहासकालीन वाङ्मयापुरतीच ती मर्यादित नाही

### संशोधकाच्या दृष्टीने साहित्य-स्वरूप-चर्चा

साहित्यक्षेत्रीय सशोधनाचे स्वरूप पाहण्यापूर्वी साहित्याचे स्वरूप ध्यानात घेणे आवश्यक आहे साहित्य ही लेखकाच्या दृष्टीने केवळ अभिव्यक्ती व रसिकाच्या दृष्टीने जरी केवळ कला असली, त्याच्या दृष्टीने तिचा अभ्यास केवळ कला म्हणून व्हावा तसेच कलाभिव्यक्तीचे स्वरूप जाणून घेण्याच्या दृष्टीनेच साहित्यकृतीकडे पाहणे आवश्यक आहे असा कित्येकाचा आग्रह असला तरी, आणि तो एका मर्यादेपर्यंत योग्य असला तरी, साहित्य हा एक अत्यत महत्त्वाचा व विश्वसनीय असा सामाजिक दस्तऐवज (डॉक्युमेंट) आहे लेखकानी आपल्या साहित्याच्या रूपाने तो तयार केलेला आहे तो स्थलकालाची बधने बाजूला सारून आपणाप्रत आलेला असला तरी, व त्याला समाजाच्या सास्कृतिक धनात स्वतत्र असे स्थान प्राप्त झाले असले तरी त्याचा जन्म हा स्थलकाळाच्या बधनानी मर्यादित झालेल्या विशिष्ट जाणिवात आहे ह्या जाणिवात व्यक्तिगत अनुभव व सामाजिक जीवननिष्ठा इ चे एक सलग, अविभाज्य, स्वयपूर्ण दर्शन घडते त्यात खऱ्या रसिकाला विश्वाचे दर्शन घडते व त्या विश्वदर्शनातच कोठेतरी त्याला 'स्वत्व' ही गवसते हे विशिष्ट प्रकारच्या सृजनशील साहित्याविषयी म्हणता येते वाङ्मयाच्या इतर प्रकाराचे दस्तऐवजी स्वरूप सहज समजण्यासारखे असते कोणत्याही प्रकारच्या साहित्याकडे पाहण्याचा सशोधकाचा हा विशिष्ट दृष्टिकोन महत्त्वाचा आहे

### वाङ्मयकलेचे आणखी एक वैशिष्ट्य

अभ्यासकाच्या दृष्टीने वाङ्मय हे एक महत्त्वाचे दस्तऐवजी साधन (रेकॉर्ड) आहे, हे खरे आहे त्याप्रमाणेच साहित्याचे आणखी एक अत्यत लक्षणीय वैशिष्ट्य

ग्रंथसपत्ती इ. गोष्टी ह्या साहित्य-सशोधनात येतात बहुतेक प्राचीन ग्रथकार वादा विषय झालेले आहेत उदा , मुकुदराज, ज्ञानेश्वर, नामदेव, वामनपडित, मुक्तेश इ. ह्यांच्या कालासबधी, कार्यभूमीसबधी, चरित्रासबधी निरनिराळ्या प्रका वाद निर्माण झालेले आहेत सर्वच भाषाच्या वाङ्मयासबधी असे म्हणता येई कालिदास, शेक्स्पीयर ह्याच्या चरित्रासबधीही असेच विविध वादपक्ष आहेत.

हे सारे विषय वाङ्मयीन स्वरूपाचे खरे पण त्याचे सशोधन आत पाहिल्याप्रमाणे इतिहासाच्या हातात हात घालून चाललेले असते, व ते तसेच चाल अधिक उचित होय ह्या सर्व सशोधनात इतिहाससशोधनास समान असलेल पद्धतीचाच अगिकार करावा लागतो त्या पद्धतीचे विवेचन मागील प्रकरण आलेले आहे.

वाङ्मयीन विद्वत्तेचे पाठचिकित्सा हे पहिले व महत्त्वाचे क्षेत्र आहे. एखाद प्राचीन ( मुद्रित अगर अमुद्रित ) ग्रथाची प्रत अगर आवृत्ती सिद्ध करणे, ग्रथाच कर्ता कोण ते निश्चित करणे, प्रतीचे अस्सलपण अगर विश्वसनीयत्व ठरवि लेखकाचा काल, तसेच उपलब्ध प्रतीच्या स्वरूपाची चर्चा करून निरनिराळ पाठभेदाची चिकित्सक पाहणी करणे व योग्य पाठ ठरविणे, नतर ग्रथाती आशय समजण्याच्या दृष्टीने ऐतिहासिक, भाषिक, साहित्यशास्त्रीय इ. दृष्टीन त्याची पाहणी करणाऱ्या टिप्पणी ( ॲनोटेशन्स ) लिहिणे, त्याप्रमाणे, कालसगत लेखनकर्तृत्व, इ. गोष्टींची अतर्गत व बाह्य पुराव्यानी छाननी करणे इ विष ह्या सदर्भात लक्षणीय आहेत. ह्या शास्त्रास 'पाठचिकित्साशास्त्र' अश सज्ञा वर आलेलीच आहे. इग्रजीत ह्या प्रकारच्या विवेचनाला 'हाय क्रिटिसिझम' असे म्हणतात. अर्थस्पष्टक टीपाना 'टेक्स्च्युअल क्रिटिसिझम म्हणतात वाङ्मयीन सशोधनाचे हे पहिले दालन होय

## साहित्य-संशोधनाचे दुसरे क्षेत्र : भाषा

साहित्य हे खऱ्या अर्थाने 'वाङ्मय' म्हणजे भाषारूप असते. भाषा हे एक अतिशय महत्त्वाची मानवी सस्था आहे मानवी सस्कृतीच्या विकासाबरोबर ती उत्क्रान्त झालेली आहे साहित्याचे माध्यम जे ग्रथ ते भाषारूप असतात भाषा ही अति गूढ अशी मानवी निर्मिती आहे ती सामाजिक निर्मिती आहे व सामाजिक ठेव आहे. सस्कृतीचे वाहन भाषा हीच आहे ह्या भाषेचा अभ्यास, हा एक चिरतन महत्त्वाचा वाङ्मयीन सशोधनाचा विषय आहे.

वाङ्मयाच्या सशोधनात प्राचीन ग्रथाभ्यासाच्या खालोखाल भाषाभ्यासाला महत्त्व आहे. भाषाभ्यासामध्ये अनेक विषय येतात. भाषेच्या स्वरूपाविषयी

काही तात्त्विक स्वरूपाचे सशोधन हा पहिला विभाग एका वेळेला वाङ्मयीन सशोधन म्हणजे भाषिक सशोधन होते त्यानतर विशिष्ट भाषेच्या निर्मिती-सबधीचा, धारणेसबधीचा, जन्मकालासबधीचा इ अभ्यास येता अर्थात ह्या प्रकारच्या सशोधनास, या विषयाच्या व इतर सबधीविषयाच्या दीर्घकालच्या व्यासगाने प्रज्ञाही परिणत व्हावी लागते, अनक विषयाचा उपयोग करून घ्यावा लागतो * कित्येक वेळा हे सशोधन केवळ तात्त्विक दृष्टीने महत्त्वाचे असेल पण शास्त्राच्या समृद्धीकरणास त्याची विशेष मदत होते

भाषेचे दुसरे अग म्हणजे विशिष्ट ग्रथातील व विशिष्ट कालातील भाषा व तिचे स्वरूप पाहणे हे होय मराठीत या क्षेत्रात बरेच काम झालेले आहे राजवाड्यानी ज्ञानेश्वरीचे व्याकरण लिहिले तर डॉ तुळपुळे याचा यादवकालीन मराठी भाषे-सबधीचा ग्रथ प्रसिद्ध आहे तरीही भाषिक सशाधनास या दिशेने अद्यापही बराच अवसर आहे असे वाटते केवळ भाषाशास्त्रीय दृष्टी न ठेवता विशिष्ट काल-खडातील भाषा, त्याच्या सास्कृतिक जीवनाची कशी प्रतीक आहे, त्याची वैशिष्ट्ये तीतून कशी व्यक्त होतात, शब्दाचे स्वरूप, त्याचा वापर विशिष्ट कालखडात कसा होत असे, प्रतिमाची सृष्टी, निरनिराळ्या म्हणी वाक्सप्रदाय ह्यातून त्या काळाचे जीवन कसे प्रतिबिंबित होते इ प्रकारच्या विषयाकडे आमचे अद्याप लक्ष गेले आहे असे दिसत नाही भाषेतले शब्द निरनिराळ्या शास्त्रात सदर्भात कसे वापरले जातात, हाही खरे म्हटले तर एक अभ्यासाचा विषय आहे व तो बराच दुर्लक्षित झाल्यासारखा वाटतो प्रा. माटे यानी फार वर्षांपूर्वी 'भाषासमृद्धीची सामाजिक दृष्टी' हा लेख लिहिला आहे तो या सदर्भात उल्लेखनीय आहे

खरे सागावयाच तर सध्या शब्दाचा प्रश्न अतिशय ज्वलत प्रश्न आहे निर-निराळ्या सदर्भात निरनिराळ्या शब्दाचा वापर आपणास करावा लागणार आहे, लागत आहे काही शब्द तयारही करावे लागणार आहेत त्याचे स्वरूप कसे असावे, गेल्या पाव शतकात ह्या दृष्टीने जे प्रयत्न झाले त्याची फलश्रुती काय इ विषय अद्याप अस्पर्शितच आहेत साहित्याच्या सशोधनाचा तो एक महत्त्वाचा भाग आहे तिकडे दुलक्ष होत आहे अशी रुखरुख या ठिकाणी जाताजाता नमूद करून ठेवणे चूक होणार नाही

---

* भाषाशास्त्र (फायलॉलॉजी) हा शब्द १९व्या शतकात रूढ झाला त्याचा उपयोग अतिशय व्यापक अर्थाने केला जाई Historically it has been used to include not only all literary and linguistic studies but studies of all products of human mind . Wellek and Warren ('Theory of Literature' p 38)

शब्दाचे स्वरूप, त्याची सिद्धता, धारणा, तसेच त्यामागील संकेत इ. संबद्ध बाबींचा शोधदृष्टीने विचार करताना समाजशास्त्राच्या व संस्कृतिधारणेच्या मुळापर्यंत जावे लागेल. तसेच मानवी ध्येये, जाणिवा, आशा, आकांक्षा, इ. चा विचार करण्यासाठी धर्मविचार, तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र इ. शास्त्रांचा आधार घ्यावा लागेल, नव्हे तसा तो घेतल्याशिवाय ती पाहणी पूर्ण होणारच नाही. ह्या पाहणीत काटेकोरपणा व नेमकेपणा निर्माण होण्यास त्या त्या सामाजिक शास्त्रांच्या संशोधन-पद्धतीचा अवलंब करणे फारसे चूक ठरणार नाही.

भाषेबरोबर व्याकरणाचाही उल्लेख होणे अपरिहार्य आहे. अनेक वैय्याकरणांनी आजपर्यंत मराठीची व्याकरणे लिहिली आहेत. ऐतिहासिक दृष्टीतून त्या सर्वांचा अभ्यास व्हावयास हवा. अलीकडे शुद्धलेखनाच्या निमित्ताने व्याकरणाकडे लक्ष जात आहे असे दिसते. मराठीचे एक सर्वंकष व प्रमाणभूत ( स्टँडर्ड ) व्याकरण अद्याप सिद्ध व्हावयाचे आहे. त्यासाठी या क्षेत्रातील विविध प्रकारची पाहणी निश्चितपणे परिपोषक होऊ शकेल. विशिष्ट कालखंडातील, तसेच विशिष्ट बोली-भाषेचे व्याकरण इ. कडे लक्ष जावयास लागलेले आहे ते योग्य आहे; तथापि ते केवळ संकलनाच्या व पाहणीच्या स्वरूपाचे न राहता त्यात अधिक व्यापकपणा, चिकित्सकपणा व शास्त्रीयपणा यावयास हवा असे वाटते.

साहित्य हे शब्दांचे बनलेले असते, भाषाही शब्दांची बनलेली असते. त्यामुळे वाङ्मयीन संशोधनात भाषा-विषयक अभ्यासाला प्राधान्य मिळावे हे स्वाभाविक आहे. पण ह्या शब्दामागे काही तरी, विशेष सांगण्याचा, व्यक्त करण्याचा, नवनिर्मिती करण्याचा, अनुभवांना विशिष्ट घाट देण्याचा, विशेष प्रसंगी काही सामाजिक व ध्येयात्मक साक्षेपही लेखक बाळगीत असतो. तसेच साहित्याचा समाजमनावर निश्चित काही संस्कार होत असतो. साहित्याच्या संशोधनात या सर्व गोष्टींना अर्थातच अत्यंत महत्त्वाचे असे स्थान आहे. हा अभ्यास वाङ्मयीन टीकेशी पुष्कळ अशी अविभाज्यपणे निगडित होतो. हा साहित्य-संशोधनाचा दुसरा विषय गट. पहिल्या गटातील विषयांचे संशोधन. तसल्या विषयांना वाहिलेल्या संस्थांकडून प्रामुख्याने झालेले आहे तर ह्या प्रकारच्या संशोधनात विद्यापीठांचा हातभार मोठा आहे.*

* पीएच्. डी. या पदवीसाठी निरनिराळ्या विद्यापीठांत जे विषय निवडले गेले आहेत, जात आहेत त्यांच्यावरून, तसेच काही विद्यापीठांत ज्येष्ठ पदवीसाठी 'संशोधन' हा एक अवश्य अगर पर्यायी अभ्यास-विषय ( पेपर ) ठेवलेला आहे, [ उ. पुणे विद्यापीठाने एम्. ए. साठी, व अनेक विद्यापीठांनी एम्. एड्. या पदवी-साठी संशोधन हा विषय ठेविलेला आहे ] त्याच्या अभ्यासक्रमावरून आणि नियुक्त पुस्तकांवरून वाङ्मयीन संशोधनाविषयी व इतर संबद्ध क्षेत्रांतील संशोधना-संबंधी कोणत्या कल्पना आज सामान्यतः रूढ आहेत याची जाणीव होऊ शकेल.

*अवलंबन प्राधान्य व प्रयोगप्राधान्य : दोन अवस्था*

पाश्चात्य राष्ट्रात सध्या भाषाविषयाचे संशोधन वेगळ्याच पातळीवरून चालू आहे. यात विशेषत: अमेरिकेचा पुढाकार आहे. त्याच्याकडील सर्वच संशोधनाप्रमाणे हेही संशोधन विशिष्ट उपयुक्ततावादी दृष्टीने चालू आहे. अमेरिकेला जगात जे पुढारीपण लाभले आहे ते टिकविण्यासाठी जगातील निरनिराळ्या भाषांचा अभ्यास करण्याची फार मोठी आवश्यकता निर्माण झाली आहे. त्यायोगे नवीन भाषा किती सुलभ रीतीने व जलद आत्मसात करता येईल ह्या दृष्टीने तिकडे प्रयोग चालू आहेत. [ तशाच प्रकारचा प्रयत्न नुकताच डॉ. कालेलकर यांच्या नेतृत्वाने पुण्याच्या डेक्कन कॉलेज संशोधन-संस्थेतर्फे करण्यात आला, हे वृत्तपत्रातून आलेलेच आहे.] असे प्रयोग आपणाकडेही सुरू होणे जरूर आहे, हे खरे असले तरी आपली या बाबतची विशिष्ट नड व निकड लक्षात घेऊन या प्रयोगाचा अवलंब करणे जरूर आहे असे वाटते.

याबाबत आणखी एक गोष्ट लक्षात धरावयास हवी. पाश्चात्य राष्ट्रात विज्ञानाचा जो प्रसार झालेला आहे त्याचा एक परिणाम भाषेच्या क्षेत्रावर असा झालेला आहे की, भाषा-विज्ञान (लिंग्विस्टिक्स) हे शास्त्र नुसतेच सामाजिक शास्त्र वा साधनशास्त्र अगर अवलंबनशास्त्र (ॲप्लाईड सायन्स) अशा स्वरूपाचे न ठेवता, त्याचे प्रयोगशील (एक्स्पेरिमेंटल्) शास्त्रात त्यांनी रूपांतर करून घेतले आहे. मानसशास्त्राच्या बाबतही तसेच झालेले आहे; व हळूहळू सर्वच सामाजिकशास्त्रे त्या दिशेने वाटचाल करावयास लागणार हे जवळ जवळ स्पष्ट झालेले आहे. ही ( प्रयोगशील ) अवस्था प्राप्त होण्यापूर्वी भाषाशास्त्राचा एक अवलंबनशास्त्र (ॲप्लाईड सायन्स) अगर विश्लेषण शास्त्र (ॲनॅलेटिकल सायन्स) या दृष्टीने पाश्चात्यांनी खूप विकास घडवून आणला आहे. आपल्याकडे ते काम अद्याप व्हावयाचे आहे. आपले संशोधन अद्यापपावेतो प्राथमिक अगर समालोचनपर अवस्थेतच रेंगाळते आहे. वाङ्मयाच्या संशोधनामधला हा फार मोठा, आतापर्यंत बराचसा उपेक्षित राहिलेला व भविष्यकालात भरपूर वाव असणारा असा विभाग आहे. सध्या कोठे कोठे त्याची प्रायोगिक दृष्टीनेच वाढ होऊ घातली आहे, असे दिसत असले तरी मधली एक अवस्था आपल्याकडे दुर्लक्षित राहिलेली आहे. इकडे लक्ष वेधणे जरूर आहे.

ह्या ( भाषाशास्त्राच्या ) क्षेत्राचे स्वरूप पाहिले तर त्याचे संशोधन हे सामाजिक शास्त्रातील इतरत्र रूढ झालेल्या पद्धतीच्या अवलंबनानेच सिद्ध होणार आहे. ह्या ठिकाणी साहित्यसंशोधनाची कक्षा समाजशास्त्राला, इतिहासाला,

सांस्कृतिक जीवनाला एवढी छेदून जाते की त्या त्या शास्त्राच्या व वाङमयाच्या सीमारेषा ठरविणे कठिण झालेले आहे.

## इतिहासावलंबनाचे आणखी काही पैलू

साहित्याचा अभ्यास करताना अनेक शास्त्रांची मदत कशी घ्यावी लागते हे आपण पाहिले. किंबहुना त्या त्या शास्त्रात खोलवर गेल्याशिवाय तत्संबधीच्या साहित्याचा अभ्यास पुरा झाला असे मानता येत नाही. साहित्याभ्यासाला इतिहासाचे बंधन नाही. कोणत्याही कालातला ग्रंथ अथवा ग्रंथकार, अथवा भाषा, संस्कृती इ. वाङमयीन संशोधनाचे विषय होऊ शकतात. कित्येकदा एखादा कालखंड सूक्ष्म अभ्यासासाठी निवडलेला असतो. अशा वेळी ग्रंथाच्या कालाचा मोठ्या बारकाईने संशोधकास शोध घ्यावा लागतो. म्हणजे हे सर्व काम इतिहास-संशोधकाच्या भूमिकेवरून करावे लागते. उपलब्ध पुरावे, हे साहित्य-ग्रंथातून वा इतर साधनांचा उपयोग करून मिळवावे लागतात. त्या कालाशी जितके समरस होता येईल तितके व्हावे लागते म्हणजे त्या कालच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक इतिहासाचा कसोशीने अभ्यास करावा लागतो. आपण साहित्याचे अभ्यासक आहोत हे क्षणभर विसरूनच जावे लागते. ह्याचाच अर्थ ह्या सर्व गोष्टींचा अभ्यास करताना मागील प्रकरणात आलेल्या इतिहास–संशोधन–पद्धतीचाच अवलंब करावा लागतो. साहित्याचे विशेष वेगळे असे धोरण असते असे म्हणता येत नाही.

साहित्याचा इतिहासाशी आणखी दोन तीन प्रकारांनी संबंध येतो. पहिला प्रकार म्हणजे इतिहासातील किंवा पौराणिक व्यक्तींच्या जीवनातील घटना-प्रसंगावर काव्य, कथा, कादंबरी, नाटक, इ. ची उभारणी झालेली असते. साहजिकपणे त्या व्यक्ति-प्रसंगाची इतिहासातली अगर पुराणातली मूर्ती व कथाकारादी कलावंतांनी स्वत:च्या प्रतिभेतून निर्माण केलेली मूर्ती या दोहोंची तुलनात्मक पाहणी करावी लागते. येथे इतिहास–पुराणाचा तुलनेसाठी अभ्यास करावा लागतो. कित्येक वेळा लेखकही भूतकालात जमा झालेला असतो. म्हणजे लेखकाच्या वेळच्या ऐतिहासिक, सामाजिक, जीवन-विचार इ. वैशिष्ट्यांचाही मागोवा घ्यावा लागतो. हे सारे करीत असताना, आपण वाङमयीन संशोधन करतो ही जाणीव ठेवावी लागते. अशा प्रकारच्या संशोधनासाठी विश्वसनीय अशा सामाजिक–सांस्कृतिक इतिहासाची आवश्यकता असते. त्याशिवाय लेखकाच्या प्रेरणा, मनोवृत्ती, ध्येये इ. वर प्रकाश पडत नाही.

साहित्याचे क्षेत्र समावेशक आहे. हा उल्लेख यापूर्वी आलेलाच आहे. कित्येक-वेळा विशिष्ट राजकीय, सामाजिक हेतूने समकालीन गरज भागविण्याच्या प्रयत्नातून

साहित्यनिर्मिती होत असते. लो. टिळक, आगरकर, शि. म. परांजपे, न. चिं. केळकर आदी मान्यवर संपादकांनी आपापल्या वृत्तपत्रांतून लेखन केले, त्याला पुढे वाङमयीन महत्त्व प्राप्त झाले. एडमंड बर्कच्या फ्रेंच राज्यक्रांतीवरच्या चिंतनाचेही असेच आहे. तीच गोष्ट रस्किन, कार्लाईल, मेकॉले, मोर्ले इ. विचारवंताची. त्यांचे त्या वेळचे राजकीय-सामाजिक स्वरूपाचे लेखन वाङमयीन स्वरूपात आज आपणासमोर वाङमयीन अभ्यासासाठी पुढे अमू शकते. त्या लेखनाचे मर्म समजून घेण्यासाठी लेखकाच्या कालाचा अभ्यास बारकाईने करावा लागतो. साहित्याचा इतिहासाशी संबंध येण्याचा हा दुसरा प्रकार. एकंदरीने पाहता वाङमयीन अभ्यासकाला चोखंदळ ऐतिहासिक दृष्टी असावी लागते. महाराष्ट्रातले पुष्कळसे वाङमयीन संशोधन प्रा. न. र. फाटक आदी प्रज्ञावंत इतिहास-संशोधकांनी केलेले आहे, व त्यात इतिहास-संशोधन संस्थांचा फार मोठा कार्यभाग आहे, ह्याचे कारण वाङमयाच्या इतिहासाशी असणाऱ्या ह्या अतूट संबंधात आहे. साहजिकपणे ह्या ठिकाणी साधनांच्या तपासणीसाठी इतिहास-शास्त्र-संमत चिकित्सा-संकेतांचा वापर करावा लागतो. तथापि वाङमयीन स्वरूपाची चर्चा ही बरीचशी स्वतंत्र असते.

इतिहासाचा संबंध वाङमयाच्या अभ्यासात आणखी एका प्रकाराने येतो व तो वाङमयीन इतिहासाचे लेखन करण्याच्या निमित्ताने. वाङमयीन इतिहासात 'इतिहासा 'ला महत्त्व किती व वाङमयाला महत्त्व किती, त्यांचे संबंध कशा प्रकारचे असावे, वाङमयीन इतिहासात लेखकाच्या वाङमयीन गुणांची, तसेच त्याच्या मान्यवर कृतींचे समीक्षण हे इतिहासकाराच्या दृष्टीतून यावे का वाङमयीन समीक्षकाच्या दृष्टीतून यावे इ. विषय हे चर्चेला चिरंतन खाद्य पुरविणारे विषय आहेत. त्याबाबतचे निश्चित नियम सांगता येणार नाहीत. विज्ञानशास्त्राच्या मानाने सामाजिक शास्त्रे अलिकडची म्हणून त्यांचे संशोधनही अद्याप प्रयोगावस्थेत आहे असे पाश्चात्य विचारवंत मान्य करतात. यातून पुढे मागे त्या क्षेत्रातील संशोधनाला शास्त्रीयता प्राप्त होणार आहे असे तिकडे मानले जाते. वाङमयीन संशोधनाबाबतही असेच म्हणता येईल. वाङमयाच्या इतिहासाचे अनेक उपक्रम झाल्यावर मग त्यातून पुढे मागे वाङमयीन इतिहासाची प्रमुख तत्त्वे व पद्धती निर्माण होतील. ती निर्माण होण्यासाठी आपला प्रयत्न कारणीभूत होणार आहे, ही जाणीव ठेवून संशोधन झाले तरी पुरे आहे.

### *इतर संबद्ध शास्त्रे*

इतिहासाप्रमाणे तत्त्वज्ञान, धर्म, नीतिशास्त्र, अध्यात्म इ. नीतिप्रधान शास्त्रांना साहित्याच्या सीमारेषा सरळ भेदून जातात. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम, रामदास,

इ ,तसेच प्राचीन वाङमय समृद्ध करणारे विविध सप्रदाय ह्याचा अभ्यास हा साहित्याच्या कक्षेत समाविष्ट होत असतो महाभारतातील धर्म, नीती, इ बाबतच्या कल्पना ह्याचा अभ्यास वाङमयाच्या कक्षेतही जमा होईल ही सारी शास्त्रे मानवशास्त्रे (ह्युमॅनिटीज) आहेत ती अद्याप काटेकोरपणे पाहता शास्त्र या दृष्टीने प्रगत व्हावयाची आहेत साहजिकपणेच ह्या सर्व क्षेत्रात अनेक प्रकारची ग्रथनिर्मिती व सशोधन झाल्यावर मगच त्याचे निश्चित स्थान व स्वरूप स्पष्ट होणार, तोपर्यंत सीमा प्रातातच त्याचा समावेश होणार

प्राचीन वाङमयाचा तत्त्वज्ञान, धर्म, नीती, अध्यात्म याच्याशी जसा अतूट सबध आहे, तसा प्रकारची परिस्थिती आधुनिक वाङमय व राज्यशास्त्र, समाजशास्त्र, अर्थसघटना, मानसशास्त्र या शास्त्राबाबत आहे आधुनिक वाङमयातील आविष्करण ह्या सर्व शास्त्राना भेदून जाते वर उल्लेखिलेल्या प्रत्येक ज्ञानशाखेने आधुनिक वाङमयावर फार खोल असा ठसा उमटविलेला आहे, इतका की त्या शास्त्राची जाणीवपूर्वक माहिती करून घेतल्याविना आधुनिक वाङमयातील जीवन-चित्रण-विषयक साक्षेप पूर्णपणे ध्यानात येणार नाही याही बाबतीत हेच लक्षात धरावयास हवे की ही शास्त्रे विकासावस्थेत आहेत, व वाङमय हेही पण प्रयोगावस्थेत आहे त्यामुळे ह्या दोहाचे सबध कशाप्रकारचे असावेत, असतात हा वाङमयीन क्षेत्रातील एक चिरतन चर्चेचा विषय आहे कधी लवक एका बाजूस झुकतो, कधी दुसऱ्या बाजूस अशा पुष्कळ चर्चेनतर व सशोधनानतर काही कालानतर वाङमय व ही सारी शास्त्रे याच्या मर्यादा स्पष्ट होण्यास कदाचित मदत होईल

पण एका दृष्टीने हे असभाव्य दिसते कारण साहित्याचा सबध प्राय मानवी विचार व जाणिवा याच्याशी असतो आणि तो तसाच राहणार मानवी जाणिवा पूर्वी बऱ्याच स्थूल स्वरूपाच्या असत जीवनाच्या गुतागुतीबरोबर त्याचेही स्वरूप बरेच गुतागुतीचे होणे अपरिहार्य दिसते मानवी जाणिवाची सकीर्णता ही अधिकाधिक वाढत आहे त्याच्यात अधिक गढपणा व अगम्यता येत आहे मानवी जीवनाची धारणाही अशीच गुतागुतीची होत आहे आणि ही निया अशीच पुढे अखड चालू राहणार आहे असे दिसते विज्ञानाच्या क्षेत्रातील विविध शोधामुळे, अर्थशास्त्र, समाजशास्त्रातील विविध लोककल्याणप्रवण प्रवृत्तीच्या प्रभावामुळे व ऐहिकता-प्रधान मनोधारणेमुळे यापुढे मानवी जीवन अधिकाधिक सुखसमृद्धीने सपन्न होणार हे उघड झालेले आहे पण बाह्यत म्हणजेच भौतिक जीवनात सुखसमृद्धीची लयलूट झालेल्या माणसाच्या मनाची सवेदनशीलता अधिकाधिक वाढत जाणार आहे, हेही लक्षात धरणे जरूर आहे आजही प्रगत राष्ट्रात वाङमयीन क्षेत्रास सवेदनाविश्व

(वर्ल्ड ऑफ सेन्सिटिव्हिटी) असे म्हटले जाते. या संवेदनाची एक परिभाषा निर्माण झालेली दिसते व तिच्या द्वारे साहित्याचे परिशीलन होऊ लागले आहे.* कित्येकदा ते इतके सूक्ष्म व सूचक असते की, उपरीनिर्दिष्ट विविध शास्त्रातील प्रमुख तत्त्वाचा, प्रक्रियाचा वा प्रतिक्रियाचा, त्याच्या परिणामाचा अभ्यास हा वाङमयीन संशोधनास केवळ अत्यावश्यक आहे, असे वाटते

ह्या सर्व विवेचनाच्या आधारे साहित्य हे धारणेने समावेशक कसे आहे व साहित्य ही विविध प्रकारच्या ज्ञानाची व शास्त्राची उतारपेठ कशी आहे, हे स्पष्ट होईल. वाङमयाचा अभ्यासक म्हणून आपली कोणतीही मते असली तरी वाङमयाचा संशोधक म्हणून साहित्याचे हे जे स्वरूप-वैशिष्टय आहे ते तसेच्या तसेच मान्य करावयास प्रत्यवाय नाही. साहित्य हे संस्कृतीचे नुसतेच वाहन नसून ते संस्कृतीरूप असल्याने त्याच्या जडणघडणीतील ही विविधता व समावेशकता तशीच दीर्घकाल नव्हे सदैव राहणार आहे निदान आतापर्यंत निर्माण झालेल्या साहित्याची साक्ष तरी तशी आहे. पुढे मागे फरक पडला तरी वस्तुस्थिती फारशी बदलत नाही.

## साहित्यातील भावविश्वाचा परिशोध

असे असले तरी साहित्याचा संबंध प्राय. मनुष्याच्या भावविश्वाशी आहे हे जाणून घेऊन त्याचे रसग्रहण ह्या भावविश्वाचे स्वरूप नीट ओळखून घेऊन त्याच्या आधारे व्हावे ह्या प्रयत्न भरतमुनींच्या नाटयचर्चेइतका जुना आहे. पुढे अनेक समीक्षक पुढे येऊन त्यांनी नवी नवी भर घालून प्राचीन कालाला साजेसे असे साहित्यशास्त्र निर्माण केले आहे साहित्य, नाटयादी कलामधून जी भावाविष्कृती होते तिचे विवरण प्राचीन भारतीय समीक्षकांनी खूप बारकाईने तसेच अभिनवपणे केलेले आहे इतके की त्यातले काही विचार आधुनिक समीक्षाशास्त्राच्य अगदी जवळ येतात. साहित्याच्या अभ्यासात ह्या वैशिष्टयाला प्राधान्य असावे असा प्राचीनांचा आग्रह आहे मर्यादित प्रमाणात तो रास्तही आहे. ह्या प्राचीन भारतीय साहित्यशास्त्राचे अधिकाधिक बारकाईने परीक्षण होणे आवश्यक आहे तसेच त्या शास्त्रात सर्वकाली उपयोगात येतील अशी काही तत्त्वे आहेत काय, इत्यादी प्रश्न मनात बाळगून संशोधकास साजेशा निराग्रही भूमिकेवरून अधिकाधिक संशोधन होणे जरूर आहे

* कित्येक मानसशास्त्रीय, राज्यशास्त्रीय, तत्त्वज्ञानातील, किंबहुना भौतिकशास्त्रातील शब्दप्रयोग वाङमयीन विवेचनात वा टीकेत शिरलेले आहेत.

आपल्याप्रमाणे पाश्चात्यानी साहित्याच्या आकर्षणाचा परिशोध घेण्यास अगदी प्राचीन कालापासून सुरुवात केली व आधुनिक कालात त्यात नवी नवी भर घालून समीक्षाशास्त्र हे बरेच समृद्ध व अद्ययावत् केले आहे सर्जनक्षमता हे मानवी प्रतिभेचे एक अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे ह्या वैशिष्ट्याला प्राधान्य देऊन सर्जनप्रक्रियेच्या आधाराने साहित्यातील विविध गुणाची व दोषाची चर्चा करावी, साहित्यक्षेत्रीय आणि कलाक्षेत्रीय सृजनतेचे सौंदर्य हे एकमेव ध्येय मानावे, आणि त्या आधारे साहित्यकृतीचे स्वरूपवैशिष्ट्य ध्यानी आणावे, त्याची चर्चा करावी, लेखकाच्या मनोविशेषाचे, लेखनाचे परीक्षण करतानाही ह्या वैशिष्ट्यास महत्त्वाचे स्थान राहील असे साक्षेपाने पाहावे, त्या दृष्टीने त्याच्या साहित्यातर्गत आविष्काराचे दर्शन घडवावे, असा स्थूलमानाने एतद्विषयक आग्रही भूमिका धारण करणाराचा मनोदय आहे

ह्या विचाराच्या लोकानी सौदर्यशास्त्र हे साहित्याभ्यासासाठी प्रमाण मानावे, त्याची मूलतत्त्वे शोधावी, त्याचा अवलब साहित्याच्या विविधरूपी अगप्रत्यगातून कसा होतो हे दाखवून द्यावे व त्या आधारे साहित्य-सौंदर्य-समीक्षाशास्त्र विकसित करुन घ्यावे असा आग्रह धरला आहे मराठीत हा विचार मर्ढेकरानी मोठ्या आवेशाने माडलेला आहे इतर अनेक विद्यमान समीक्षकाग्राही तो अत्यत जवळचा व स्वीकार्य असा वाटत आहे साहित्याच्या सर्वसमावेशकतेला एक दाह देण्याचा व त्याचे स्वत चे असे शास्त्र निर्माण करण्याचा हा प्रयत्न आहे प्रयत्न ह्या दृष्टीने तो फार स्तुत्य आहे साहित्याचे स्वत चे शास्त्र निर्माण झाले तर ती फारच मोलाची गोष्ट होईल हेही खरे ह्या विचाराच्या तात्त्विक भूमिकेच्या चर्चेत फार खोलवर न शिरता सशोधकाच्या भूमिकेवरुन या विचाराचे बळ व मर्यादा हेरावयास हव्यात

### थोडी विचिकित्सा

ह्या विचाराचे अव्वलपण एकदम मान्य करावयास हवे साहित्याचे क्षेत्र जर स्वायत्त व स्वतत्र म्हणायचे तर इतर क्षेत्राप्रमाणे त्याला स्वत चे नियम, मर्यादा, तत्त्वे इ. असणे आवश्यक आहे, ती उपलब्ध करुन देण्याच्या इतर अनेक उपक्रमाप्रमाणे हा एक उपक्रम आहे पुढे मागे साहित्याची सर्वव्यापक अशी तत्त्वे निर्माण झाली तर ती एक अतिशय महत्त्वाची गोष्ट होईल पण ज्या विचारसरणीचा आपण विचार करीत आहोत, त्या विचारसरणीचा साहित्यासाठी स्वतत्र तत्त्वाचा आग्रह नाही ललितकलाचे परीक्षण, परिशीलन, अध्ययन ज्या गोष्टीना प्रमाण मानून होते, त्याच गोष्टी व ललितकलाचे अतिम उद्दिष्ट सौंदर्यनिर्मिती, तेच साहित्याने प्रमाण मानावे असे हा सप्रदाय म्हणतो म्हणजे निष्पर्ष काय निघतो ? साहित्याने

सामाजिक शास्त्रे, नीती इत्यादींच्या सामुरवासातून स्वतःला मुक्त करून घेऊन ललितकलांचे वर्चस्व स्वीकाराव म्हणजे साहित्याची तत्त्वे ती साहित्याची नसतीलच, तर ती ललितकलांची असतील तात्पर्य साहित्याची स्वतःची व केवळ स्वतःचीच अशी तत्त्वे निष्पन्न होण्याची मजल फार दूर दिसते, हेच खरे साहित्याला शास्त्रपण प्राप्त होण्याचे साक्षेपाने प्रयत्न व्हावयास हवे काही चालूही आहेत ते अंतिम उद्दिष्ट सफल होण्यासाठी जे काही प्रयत्न कारणीभूत होतील त्यामध्ये हा प्रयत्न सर्वांत महत्त्वाचा ठरेल संशोधकाने त्याची अस्वीकार्यता गृहीत न धरता आपल्या पद्धतीने जाऊन अशा विचाराच्या स्वीकाराची फलश्रुती पुढे मांडली पाहिजे

## अनुभववाद

अगदी अलीकडे वाङ्मयाच्या क्षेत्रात सर्वांत लोकप्रिय असा कोणता विचार असेल तर तो अनुभवाचा लेखक आपला विशिष्ट अनुभव साहित्याच्या माध्यमाद्वारे परत घेण्याचा प्रयत्न करतो ह्या अनुभवाचे अस्वलपण एकजिनसीपण, सघनता, सखोलता, ह्या गोष्टीवर साहित्याचे मोठेपण अवलंबून असते मोठ्या लेखकाच्या अनुभवाचा आवाका फार मोठा असतो लेखकाची अनुभव घेण्याची विशिष्ट पद्धती असते वाचकानाही तो अनुभव लेखकाच्या भूमिकेशी समरस होऊन घेता आला तर त्याला त्या अनुभवाने आपले जीवन समृद्ध झाले आहे असा प्रत्यय येतो ह्या अनुभवाला स्थलकालाच्या मर्यादा नसतात, म्हणून ही विशिष्ट भूमिका सर्वकालीन वाङ्मयाला लावायला हरकत नाही

साहित्याच्या मूल्य शोधनातून निघालेले हे नवनीत आहे ते बरेच स्वीकार्य आहे, यातही वाद नाही, त्याच्या अवलंबनाने मृतकालीन व विद्यमान अनेक कलाकृतींना वेगळा अर्थ प्राप्त होईल हेही खरे आहे तथापि या विचाराचा या तत्त्वज्ञानाचा साहित्यनिर्मितीवर परिणाम काय झालेला आहे हे जर लक्षात घेतले तर ह्या विचाराच्या मर्यादा स्पष्ट होतील, व अधिक बारकाईने पाहता साहित्याच्या क्षेत्रातून हळूहळू आपण भलत्याच क्षेत्राच्या दालनात प्रवेश करीत नाही ना ? अशी शंका आल्याविना राहणार नाही

साहित्यनिर्मितीवरचा पहिला परिणाम म्हणजे, अनुभवाच्या अस्वलपणाचा शोध करण्यासाठी साहित्याला मानवी मनाच्या विविध प्रकारच्या विकृतीकडे वळावे लागते आजच्या साहित्यात जे अनैतिकता प्रधान चित्रण दिसते व जो विकृती चित्रणाकडे (ॲबनॉर्मॅलिटी) लेखकांचा ओढा दिसतो त्याचे कारण हे

अनुभवाचे तत्त्वज्ञान, व त्यामुळे ह्या मार्गाने पुढे जाण्यास वाव नसलेल्या अशा एका (ब्लाइंड अॅली) आळीत गेल्याचा आपणास अनुभव येतो

दुसरा परिणाम म्हणजे या अनुभवाच्या मागोव्यात लेखक आपणास सरळ मानसशास्त्राच्या वा क्वचित् प्रसंगी मनोगाहन-शास्त्राच्या निबिड अंधकारात नेऊन सोडतो म्हणजे त्या आविष्करण-वैशिष्ट्याचे मर्म कळून घेण्यास मानसशास्त्राशी चांगलाच परिचय असावा लागतो अर्थातच साहित्यक्षेत्र संपवून मानसशास्त्राच्या प्रदेशात आपण अलगद व आपणास नकळत उतरतो ही जाणीव होऊनच की काय, काहीजण ह्या अनुभवात सौंदर्यानुभवाला महत्त्व देतात. पण त्यामुळे परिस्थिती विशेष बदलते असे नव्हे

याचाच अर्थ असा की साहित्याचे स्वतःचे क्षेत्र कोणते ह्याबाबत आपली संभ्रमितता वाढतच आहे धर्म, राजकारण, तत्त्वज्ञान, नीती ह्यांची दादागिरी साहित्याने मागे टाकली पण दुसऱ्या कोणाची स्वीकारली नाही ना ? अशी शंका येते कोणत्याही एका किंवा अनेक विचाराचे, भूमिकाचे खंडन किंवा मंडन करण्याचे ह्या ठिकाणचे धोरण नाही संशोधकाच्या चौकस दृष्टीला दिसलेले धोक्याचे कंदिल दाखविणे एवढेच ह्या ठिकाणचे उद्दिष्ट

ह्या साहित्यक्षेत्रीय उलट सुलट विचाराची पाहणी करण्यात संशोधकाला उदंड अवसर आहे साहित्याचे स्वरूप, धारणा, उद्दिष्टे, मूल्ये, जीवनाशी त्याचा असलेला घनिष्ठ संबंध, साहित्यनिर्मिती, त्याच्यापासून होणारा आनंद, अभिव्यक्ती संबधाने होत असणारे विविध प्रयोग, साहित्यातील कलात्मक निर्मिती, तिचे स्वरूप, इ इ असे कितीतरी विषय आहेत की ज्याच्यावर अभ्यासू चिकित्सक शोधकास, बराच वाव आहे कित्येकांच्या मते साहित्याच्या संशोधनाचा हाच खरा गाभा ह्या क्षेत्रातील विविध प्रश्न शोधून त्यांचा उलगडा करून घेण्यातच साहित्यक्षेत्रीय संशोधकाचा अव्वलपणा आहे एक काळ असा होता की साहित्याच्या संशोधनाचा विकास ह्याच दिशेने झाला पाहिजे, असे मानणारे बहुत होते निरनिराळे वाङ्मय-प्रकार, तसेच निरनिराळी तंत्रे व जीवनचित्रणविषयक वैशिष्ट्ये याकडे अनेकांचे लक्ष वेधले गेले, व त्या प्रमाणात साहित्य समीक्षा व संशोधन समृद्ध झाले ही आहे अद्यापही हे क्षेत्र पूर्णपणे उच्छिन्न झाल्ले आहे असे नाही

पण साहित्याच्या संशोधनाचा हा केवळ एक भाग आहे कदाचित् महत्त्वाचा म्हणता येईल, पण एक भाग आहे हे लक्षात धरणे जरूर आहे अर्थात पुढे मागे साहित्याचे स्वतंत्र निकष वा तत्त्वे निर्माण होण्यात ह्या क्षेत्रातील संशोधनाचा बराच भाग असेल हे समजण्यासारखे आहे

साहित्याच्या सर्वसमावेशकतेचे हे विवेचन वाचून कित्येकापुढे असा प्रश्न पडेल की साहित्य हे खरोखर असे परप्रत्ययनेय असेल, इतर शास्त्राची व ज्ञानाची ती केवळ उतारपेठ असेल तर त्याच्या सशोधनात व अभ्यासात महत्त्व ते कसले ? तसेच ह्या वस्तुस्थितीतून आपण कधीच बाहेर पडू शकणार नाही काय ? असे असेल तर त्या क्षेत्राला मान तो कसला प्राप्त होणार ?

## *दुसरी बाजू*

हे व अशा प्रकारचे प्रश्न सशोधकाच्या मनाला थोडा काळ दिग्मूढ करतात हे खरे आहे साहित्याचे स्वरूप पारखून घेताना न्यायनिष्ठुरपणाने त्याच्या मर्यादा पाहिल्या, पण त्याचे सामर्थ्य कशात आहे, हे लक्षात घेतले नाही तर ह्या सर्व विवेचनात एकांगीपणा राहील, अपुरेपणा राहील म्हणून साहित्याचे बळ व वैशिष्ट्य कशात आहे, व ते शेवटपर्यंत कसे टिकून राहणार आहे, सशोधकाच्या प्रयत्नाने त्यात कशी भर पडणार आहे हे लक्षात घेणे आवश्यक आहे विवेचनात पूर्णता येण्यासाठी हे सारे आवश्यक आहे असे वाटते

साहित्याचे इतर शास्त्रापासून वेगळेपण स्पष्ट करणारी अनेक वैशिष्ट्ये आपण या प्रकरणाच्या पहिल्या भागात पाहिली साहित्य-सशोधनात कितीतरी निरनिराळ्या प्रकारच्या शास्त्राच्या सरहद्दीपर्यंत आपणास जावे लागते इ गोष्टीचेही विवरण तटस्थ भूमिकेने केले त्यावरून साहित्याच्या मर्यादाची जाणीव व्यक्त झालेली असणे शक्य आहे ह्या मर्यादापलीकडे साहित्याचे मोठेपण कशात आहे हे पाहणे आवश्यक आहे

## *साहित्याचे अनन्यसाधारणत्व*

साहित्याचे अनन्यसाधारण वैशिष्ट्य म्हणजे माणसाचे सपूर्ण जीवनदर्शन मानवी जीवनाच्याच पार्श्वभूमीवर घडविणे. साहित्य मानवी जीवन व माणूस ह्याची फारकत न करता एकमेकाच्या सान्निध्यातच त्याचे चित्रण करते याच कारणाने ते अतिशय मनोज्ञ, कलापूर्ण व समीक्षासम होते विज्ञानशास्त्रे माणसाला व समाजाला जगातून काढून टाकून मानवनिरपेक्ष, मानवरहित अशा जगाचा परिशोध करतात, सामाजिक शास्त्रे विज्ञानाला व माणसाला बाहेर ठेवून मानवनिर्मित समाजाची रचना, ठेवण इ चा अभ्यास करतात, तत्त्वज्ञान हे माणसाच्या प्रज्ञेला विज्ञान, सामाजिक शास्त्रापासून व माणसापासून अलग करते व त्याच्या बुद्धीचा किंवा इतर मानसिक शक्तीचा आवाका शोधते, तर मानसशास्त्र हे माणसाचे मन जगापासून, समाजापासून वेगळे काढून त्याचे खरेखुरे व क्वचित प्रसगी उघडेनागडेपण

न्याहाळण्याचा प्रयत्न करते  याचाच अर्थ ही सारी शास्त्रे  माणसाचे, तो राहात असलेल्या विश्वाचे, त्याने निर्माण केलेल्या समाजाचे, त्याच्या मन सामर्थ्याचे व दुबळेपणाचे, पृथगात्मरीतीने दर्शन घडवितात  प्रत्येक क्षेत्र इतर सवधी घटकापासून वेगळे काढून त्याचा सत्वशोध घेते  ह्या सर्वांच्या सान्निध्यात ठेवून माणसाच्या मनाचा, जीवनाचा व तो राहात असलेल्या आणि त्याने तयार केलेल्या विश्वाचा शोध  घेणे हे साहित्याचे वैशिष्ट्य व ते साहित्यच करू शकते   हे वैशिष्ट्य लक्षात घेतले  तर इतर अनेक प्रकारची व कितीही शास्त्रे  पुढे आली तरी धावरून  जाण्याचे  कारण नाही, तसेच त्याना  टाळण्याचे  पण  कारण नाही   विज्ञानाच्या परिसरात, समाजाच्या परिवेशात, स्वत च्या  जीवनाचा वा कसल्यातरी अनामिक जाणीवानी व्याकूळ होऊन विश्वाचा—त्या मागील तत्त्वाचा—माणसाचा शोध  चालू  आहे, ह्या सर्वातले त्याचे माणूसपण शोधणे हे साहित्याच्या सशोधनामधले अंतिम उद्दिष्ट आहे  साहित्याच्या माध्यमाने माणूस हा माणसाच्या शोधात आहे, अशी आजच्या साहित्याची व्यवच्छेदक खूण सागितली जाते   तिच्यातले मर्म लक्षात  घेतले  तर साहित्यक्षेत्राच्या मर्यादाबरोबर साहित्यक्षेत्राचे सामर्थ्य पण जाणवते, गवसते

म्हणजे समाजशास्त्रे व काही प्रमाणात विज्ञानशास्त्रे,  तसेच मानवशास्त्रे ही साहित्याच्या अभ्यासाला पोषक असली तरी त्याच्या पाण्यात किती खोल जायचे ? तर जोपर्यंत माणूस स्वत च्या  पायावर उभे  असल्याचे  ती  दाखवितात  तोपर्यंत इतिहासात,  समाजशास्त्रादी  सामाजिक  शास्त्रात मानसशास्त्रादी मानवशास्त्रात कोठपर्यंत जायचे ?  माणसाचा सबध सपून त्याचा मानवनिरपेक्ष सचार सुरू झाला की परतायचे  हे लक्षात ठेवले तर साहित्यातून माणसाचा शोध  कुठपर्यंत करायचा याचा अदाजा येऊ शकेल

## ' माणसा 'चा विविधक्षेत्रीय संचार

'माणसा'च्या शोधार्थ जर साहित्याचे आलोडन करायला लागलो तर मनुष्याच्या विविध क्षेत्रीय सचाराची कल्पना येईल  ज्यावेळी  भौतिक जीवन पराकाष्ठेचे परावलबी होते त्यावेळी माणसाने  देवाचा शोध  लावला, आपल्या जीवनात राम आणला व आपल्या जीवनातली अशक्तता कमी केली  देवाच्या कृपा-साम्राज्याखाली माणसाचा ससार सुरु  झाला  त्याने राज्ये स्थापली, लढाया केल्या, शास्त्रे  निर्माण केली व हे सारे करीत असताना, हा सारा पसारा वाढवीत असताना मानवाने ह्या सर्वांपासून स्वत ला  मुक्त  करून  घेतले आणि मोक्षाची गुरुकिल्ली आत्मसात करून स्वत ला एका परीने कृतार्थ करून घेतले   परतु ऐहिकतेची महती जाणून पुढे त्याने समाजधारणेत लक्ष घातले  माणसाच्या ऐहिक जीवनात  सुखसमृद्धीबरोबर  न्याय,

समता प्रेम इ आणण्याचा प्रयत्न त्याने केला स्वत च निर्माण केलेल्या समाजाशी एक व्यक्ती म्हणून तो लढला तो दीर्घकाळ चाललेला लढा मिटविण्याची सर्वमान्य तत्त्वेही त्याने शोधून काढली हे सारे करीत असता त्याला हलके हलके उलगडू लागले की खरा लढा आपणा स्वत शीच आहे आपले मन हेच खरे कारण आहे पूर्वी एकदा त्याला मनाच्या ह्या खोडसाळपणाची जाणीव झाली होती व त्याने त्याला बंधमोक्षाचे 'कारण' ठरवून त्याच्यावर मात करण्याचा प्रयत्न केला पण ते बेटे त्यावेळी खुरमुडी घालून बसले व मोठ्या परिश्रमाने चार सुखसमृद्धीचे दिवस लाभायला लागले, तो ते मन वड करून उठले आहे मनाच्या ह्या सुप्त सामर्थ्याच्या जाणिवेने मनुष्य हा आज दिङ्मूढ झालेला आहे त्याने मनाला शास्त्राच्या कोडवाड्यात कोंडण्याचा प्रयत्न केलेला आहे पण ते महाखट मन काही अशा चमत्कारिक आविर्भावात त्याच्यापुढे उभे राहिलेले आहे की त्याचे अक्राळविक्राळ रूप पाहून तो थोडा विचलित झालेला आहे यापुढे त्याच्या जीवनाची कशी काय वाटचाल होणार आहे हे ह्याच्यापुढचे साहित्यच दर्शविणार आहे

अशा रीतीने साहित्याचे सामर्थ्य संपूर्ण माणसाचे दर्शन त्याच्या जीवनाच्या सांनिध्यातच घडविण्यात कसे आहे हे स्पष्ट होईल ह्या माणूसपणाच्या विशिष्ट पार्श्वभूमीवरून शोध करणे हे वाङ्मयीन संशोधकाचे उद्दिष्ट म्हणजे माणसाचा स्वत संबधीचा जो व्यापक शोध चालला आहे त्याला आपापल्या परीने साहाय्य करणे हेच संशोधकाचे इच्छित कार्य होय साहित्याला प्राप्त झालेले मोठेपण कोणत्याही 'दैवी' गुणामुळे नसून त्याच्या ठायीच्या 'मानवी' गुणामुळे आहे, हे जरी लक्षात आले तरी साहित्याच्या परिशोधाच्या निरनिराळ्या वाटा दिसावयाला लागतील व अंधारातही काही प्रकाशकिरण लाभल्यासारखे होईल ढगाच्या रुपेरी कडा त्या ह्याच नाही का ?

## *प्रादेशिक वैशिष्ट्यांचे संस्कार*

साहित्याच्या संशोधनाबाबतचे हे विवेचन सगळ्याच भाषांतील साहित्यसंशोधनाला पायाभूत व्हावयाला हरकत नाही असे असले तरी प्रत्येक भाषेची व प्रत्येक प्रदेशाची काही खास वैशिष्ट्ये असतात त्यानीच त्या प्रदेशातील वा भाषेतील लोकांचे जीवन व मनोधारणा बनविलेली असते त्यामुळे जसा प्रदेशवैशिष्ट्याचा परिणाम साहित्यावर होतो, त्याप्रमाणे लोकांच्या विशिष्ट स्वभावाचा परिणामसुद्धा साहित्यावर झाल्याविना राहात नाही इंग्रजी लोक हाडाचे वाङ्मयप्रेमी दिसतात शेक्सपीयरपासून तो जॉर्ज इलियटपर्यंत एवढे ग्रंथकार होऊन गेले, पण इंग्रजानी त्यांच्यावर नित्य नवे भाष्य करून सर्व मोठ्या

लेखकाना जण् जुने होऊच दिले नाही त्या त्या लेसकाच्या अगगत मोठेपणाचा हा जसा पुरावा आहे तसा लोकाच्या ठायीच्या रसिक्तेचाही आहे ह्यामुळे इग्रजी वाडमयाचा अभ्यास करताना 'वाडमयीन सशोधन' अशा स्वरूपाचा काही शोध विभाग आहे, ह्याची जाणीवही होत नाही शेक्सपीअरच्या नाटकाच्या जुन्या आवृत्ती शोधून काढन पाठचर्चाही त्यानी केलेली आहे, पण ती सारी चर्चा वाडमयीन टीकेत त्यानी समाविष्ट करून टाकली आहे महिता निश्चित करण्याच्या शास्त्राला त्यानी 'महिता टीका' (टेक्सचुअल क्रिटिसिझम) ही सज्ञा दिली आहे काहीवेळा उच्च टीका (हायर क्रिटिसिझम) हा शब्द वापरला आहे हेही आपण पाहिले. इग्रजी वाडमय व इग्रजी माणसाची विशिष्ट प्रवृत्ती याचे सबध या दृष्टीने मोठे लक्षणीय आहेत

याला एक ऐतिहासिक कारणही आहे इग्लडचा व यूरपचा गेल्या चार पाच शतकाचा इतिहास आधुनिकतेच्या अखड विकासाचा इतिहास आहे आपल्याकडे इग्रजाच्या आगमनापूर्वीचे व आगमनानतरचे असे सपूर्णतया वेगळ्या प्रवृत्तीचे वाचक असणारे असे दोन कालखड सरळ दिसतात त्यामुळे ब्रिटिशाच्या आगमना-पूर्वीच्या वाडमयातील मध्ययुगीन प्रवृत्ती ही वेगळी होऊनच पडते तसेच यूरपमध्ये जसे मध्ययुगातून सहजगत्या उत्क्रात होत होत त्यातून आधुनिक जग निर्माण झाले तसे आपल्याकडे झालेले नाही

इग्रज माणसाचा स्वभाव हा ज्ञानप्रेमी आहे त्याचा अभ्यास हा केवळ यूरोपच्या इतिहासापुरताच मर्यादित नाही भारताशी सबध आल्यानतर त्याच्याकडे 'पूर्वेकडील देशातील विद्या' (ओरिएटल लर्निग) ही ज्ञानशाखा त्यानी सुरू केली हे पूर्वी पाहिलेच आहे व त्या शास्त्रातही त्यानी केलेली प्रगती नेत्रदीपक आहे

### *साहित्यक्षेत्रीय संशोधन-पद्धतीविषयी*

साहित्यक्षेत्रीय सशोधकाची भूमिका व साहित्याच्या स्वरूप वैशिष्ट्यामुळे निर्माण झालेली सशोधन क्षेत्रे, इ गोष्टीचे विवेचन केले त्यानतर साहित्यक्षेत्रीय सशोधनात अवलबिल्या जाणाऱ्या पद्धतीमबधी थोडे स्पष्टीकरण करणे अवश्य आहे

साहित्य व त्याचा अभ्यास ह्या दोन स्वतत्र गोष्टी आहत साहित्य हे आद्य सृजनशील आहे, त्यामुळे काहीचे म्हणणे असे की त्याचे आस्वादन हच त्याच्या 'अभ्यासा'चे प्रमुख साधन त्यासाठी रसग्रहणात्मक भूमिका हीच महत्त्वाची कारण रसास्वादास तीच जवळची त्या दृष्टीने वाडमयीन टीकाक्षेत्रात 'सर्जनशील टीका' (क्रिएटिव्ह क्रिटिसिझम) हीच वाडमयाभ्यासाम पायक होय असे ह्या लोकाचे मत साहित्याच्या अभ्यासात ह्या विचारसरणीला फारच मर्यादित महत्त्व आहे

साहित्याचा अभ्यास हे काटेकोरपणे शास्त्र नसले तरी ते ज्ञानाचे विद्वत्तेचे क्षेत्र निश्चितच आहे शाहींचे म्हणणे असे की साहित्य समजायचे असेल तर ते निर्माण करायला शिकले पाहिजे [ अयशस्वी लेखक हा चागला टीकाकार होतो असा विल्यकाचा समजही आहे ] पण हेही म्हणणे मान्य करता येत नाही वाङमयाचे स्वरूप हे तर्कातीत असले तरी वाङमयाच्या अभ्यासकाला आपले वाङमयीन अनुभव हे पूर्णतया बुद्धिगम्य स्वरूपात व्यक्त करता आले पाहिजेत म्हणजे तर्कवादाचा अवलंब करून ते त्याला माडता यावयास हवेत

पुढचा प्रश्न असा की, ह्या बुद्धिगम्यतेचा अवलंब करावयाचा कसा? पहिला मार्ग म्हणजे सर्वसामान्यपणे मान्य झालेली वस्तुनिष्ठा (ऑब्जेक्टिव्हिटी), व्यक्तिनिरपेक्षता (इपर्सनॅलिटी) व निश्चितता (सर्टनटी) इ शास्त्रीय ध्येयाना प्रमाण मानणे त्याचा तटस्थ वृत्तीने अवलंब केला असता पुष्कळशी माहिती (फॅक्टस्) मिळविता येते दुसरा मार्ग म्हणजे मागील प्रकरणात आलेल्या 'शास्त्रीय पद्धतीचा' अवलंब करणे हा ह्या वैज्ञानिक शास्त्रानी सूचित केलेल्या मार्गात कार्यकारण पद्धतीवर व मूलाचा (ऑरिजिन्स) शोधण्यावर अधिक भर असतो वाङमयीन क्षेत्रात जर ह्या वैज्ञानिक कार्यकारणपद्धतीचा काटेकोरपणे अवलंब केला तर आपणास वाङमयाच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक इ क्षेत्रातील कारणापर्यंत जावे लागेल आणि त्या जाण्यात वाङमयीनपणा राहणार नाही त्याशिवाय सत्याशास्त्रीय पद्धतीचा वापर करून तिच्याशी संबद्ध अशा साधनाचा (तक्ते, नकाशे इ राल्यादर्शक गोष्टी इ ) उपयोग करण्याचा दुसरे विशेष लोक पुरस्कार करतात इतर विशेष जीवशास्त्रीय संकेताच्या आधाराने साहित्याची उत्क्रांती दाखविण्याचा प्रयत्न करतात हे सारे प्रयत्न वाङमयाच्या मर्मग्राहकतेशी घनिष्ठपणे निगडित नाहीत तथापि ते मर्यादित प्रमाणात स्वीकार्य आहेत

साहित्यातील संशोधनासाठी विज्ञानप्रणित मूल्याचा काटेकोरपणे अवलंब करता येत नाही हे आज स्पष्ट झाले आहे शास्त्रीय पद्धतीचा उपयोग अत्यंत मर्यादित प्रमाणात व मर्यादित क्षेत्रातच करता येईल उदा, पाठचिकित्सा वा छदशास्त्र इ शास्त्रीय पद्धतीचा साहित्यक्षेत्रीय अभ्यासासाठी कटाक्षाने अवलंब करावयास हवा असे म्हणणाऱ्याना आपले म्हणणे आज फार जपून माडावे लागत आहे

## *शास्त्रीय पद्धतीतील साहित्यास स्वीकार्य भाग*

असे असले तरी, शास्त्रीय पद्धतीचे महत्त्व असे सहजासहजी निकालात काढता येणार नाही तिच्यातील काही गोष्टी ह्या निश्चितपणे उपयुक्तच आहेत उदा०, विगमन, निगमन, पृथक्करण, संकलन, तुलना इ गोष्टी ह्या कोणत्याही ज्ञानप्रधान

क्षेत्रात व्यवस्थापन आणण्यासाठी अत्यत उपयुक्त अशा आहेत पण ह्याच्याशिवाय इतर पद्धतीही साहित्याभ्यासकास वर्ज्य मानण्याचे कारण नाही साहित्याभ्यासाच्या स्वत च्या अशा काही पद्धती आहत त्या शास्त्रीय पद्धतीपासून भिन्न आहेत, त्याही बुद्धिगम्य आहेत त्यानीच आतापर्यंत ही मानवशास्त्रे (ह्युमॅनिटीज) समृद्ध केली आहेत आधुनिक वैज्ञानिक शास्त्राचा उदय होण्यापूर्वीपासून तत्त्वज्ञान, इतिहास, न्याय, अध्यात्म (थिऑलॉजी), एवढेच नव्हे तर भाषाशास्त्र (फायलॉलॉजी) ह्या शास्त्रानी काही महत्त्वपूर्ण अशा ज्ञानपद्धतीचा वापर केला व त्याना दीर्घ काल मान्यताही मिळाली आज आधुनिक विज्ञानाच्या तात्त्विक व प्रात्यक्षिक यशाच्या तेजापुढे त्या पद्धती फिक्या पडल्यासारख्या वाटल्या तरीही त्याच्यात काही सुधारणा करून नव्याने त्याची पुनर्घटना करून या पद्धतीची उपयुक्तता वाढविणे शक्य आहे वैज्ञानिक शास्त्रे व मानव शास्त्रे (ह्युमॅनिटीज) ह्याची ध्येये व पद्धती ह्या भिन्न आहेत हे यापूर्वी आपण पाहिलेच आहे *

साहित्याचा विद्यार्थी हा प्रामुख्याने विशिष्ट ग्रथकार, कालखड, प्रवृत्ती इ शी सबद्ध असतो अनेक कालखडामधून शिवाजीच्या राजवटीचा काल तो अभ्यासासाठी निवडतो व त्यातही आपले लक्ष तुकारामासारख्या एखाद्या ग्रथकारावर विशेषत्वाने केंद्रित करतो म्हणजे विशिष्ट ग्रथकार, कालखड, वाङमयप्रकार, इ जे काय विचारात घेतले असेल त्याची वैशिष्ट्ये समजून घेण्याचा तो प्रयत्न करतो वैज्ञानिक शास्त्राच्या अभ्यासाचा परिणाम म्हणून कित्येक समीक्षक काही विशिष्ट सिद्धान्त वा तत्त्वे प्रतिपादण्याचा प्रयत्न करतात पण साहित्याभ्यासात तशी काही निश्चित तत्त्वे वा सिद्धान्त निघत नाहीत व काढण्याचा प्रयत्न केला तर ती अगदी वरवरची (सुपरफीशिअल) अशी असतात विशेष गभीरपणाने त्याचा विचार करता येत नाही वैज्ञानिक शास्त्राचे अत्युच्च यश एखादे सर्वसामान्य तत्त्व शोधून काढण्यात आहे साहित्याच्या अभ्यासात तसे निघू शकत नाही ओढून ताणून काढलेच तर ते साहित्याभ्यासास विशेष मदत करणारे असेलच असे नाही

साहित्याभ्यासाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे साहित्याचा अभ्यास अनेक भूमिकावरून करता येतो हे शास्त्राच्या अभ्यासाबाबत सभवत नाही ह्या भूमिकामध्ये किंवा दृष्टिकोनात कित्येकवेळा कालपरत्वे, व्यक्तिपरत्वे, अभिरुची-परत्वे बदल होतो म्हणूनच एकाच कलाकृतीवर, कलावतावर, निरनिराळ्या व्यक्तीनी निरनिराळ्या काळी लिहिलेली भाष्ये सारखीच महत्त्वाची असतात आपापल्या परीने ती कलाकृती इ चे रहस्य विशद करतात टी एस् ईलियट यानी शेक्सपीअरच्या नाट्यकृतीचे मोठेपण व्यक्त करताना जे म्हटले आहे ते

सर्व साहित्याबाबतही थोड्या फार फरकाने खरे आहे ते म्हणतात — ' For the simplest auditors there is the plot, for the more thoughtful the character and conflict of character, for the more literary the words and phrasing, for the more musically sensitive the rhythm, and for auditors of greater understanding and sensitiveness a meaning which reveals itself gradually ' ( *Use of Poetry* )

### थोडक्यात

साहित्याच्या अभ्यासाच्या वा संशोधनाच्या अशा प्रकारे दोन दिशा उपलब्ध होतात पहिली वैज्ञानिक व ऐतिहासिक शास्त्रांनी पुनीत केलेली म्हणजे शास्त्रीय वा ऐतिहासिक पद्धतीचा अवलंब करून काही विशेष निष्कर्ष वा तत्त्वे काढण्याचा प्रयत्न करणे ही होय विशिष्ट मर्यादेपर्यंत उपयुक्त ती आहे नवीन सर्वसामान्य प्रकारची माहिती जमा करण्याचे कार्य ह्या पद्धतीच्या अवलंबनाने होते सामाजिक शास्त्रापासून साहित्याने हे घेतले आहे दुसरा अगदी विरुद्ध टोकाचा मार्ग म्हणजे विशिष्ट कलाकृतीच्या, व्यक्तीच्या, वैशिष्ट्याचे मर्म उलगडून दाखविण्याचा प्रयत्न करणे साहित्य कला विषयक तात्त्विक अभ्यासाचा अविक्षेप या पद्धतीत अपेक्षित असतो व्यक्तिगत प्रतिक्रिया हीच येथे प्रमाण मानली जाते ह्यात मानसशास्त्रीय पद्धतीच्या अवलंबनाचा प्रयत्न स्पष्ट दिसतो ह्या दोन्ही भूमिका दोन टोकाच्या, अर्थात ऐकान्तिक आहेत वाङ्मयीन कलाकृतीचे वैशिष्ट्य, वेगळेपण, मोठेपण व्यक्त करतानाही वाङ्मयीन कलाकृतीच्या सर्वसामान्य लक्षणाच्या व वैशिष्ट्याच्या पार्श्वभूमीवरच हे करता येईल प्रा रने वेलक आपल्या पुस्तकात म्हणतात त्याप्रमाणे प्रत्येक कलाकृतीत व्यक्तिविशिष्टता व सार्वकालिकता यांचे मिश्रण झालेले असते ते म्हणतात

" Literary criticism and literary history both attempt to characterize the individuality of a work, of an author, of a period or of a national literature. But this characterization, can be accomplished only in universal terms, on the bases of a literary theory " (Theory of Literature Page 19 )

या सर्व विवेचनावरून साहित्यक्षेत्रीय संशोधन-पद्धतीमागील भूमिका वेगळी आहे व त्यातील समस्या इतर क्षेत्रापासून भिन्न कशा आहेत हे स्पष्ट होईल त्याच-बरोबर इतर क्षेत्रातील पद्धतीचा संपूर्ण परित्याग करण्यापेक्षा त्याचा तारतम्याने वापर करणे किंवा आवश्यकतेनुसार त्यात थोडा बदल करून घेणे योग्य होईल

## प्राच्य विद्या-क्षेत्र

या सदर्भात सस्कृत-प्राकृतसारख्या पौर्वात्य भाषामधील साहित्य व त्याचे सशोधन याबाबत कोणती भूमिका साधारणत स्वीकारली जाते, व ती एका परीने कशी अपरिहार्य आहे हे पण पाहणे आवश्यक आहे साहित्य हे सपूर्ण मानवाचे दर्शन घडविते हे यापूर्वी पाहिले म्हणजेच माणसाच्या पुढे ज्या जीवनविषयक समस्या निर्माण होतात व त्याला जे जीवनाचे अग (पॅटर्न ऑफ लाईफ) उपलब्ध असते, तसेच त्याच्यापुढे काही जीवन विषयक आदर्श (नॉर्मस्) असतात, त्याच्या आधारे त्याचे जीवनविषयक तत्त्वज्ञान तो तयार करतो व त्यालाच साहित्यरूप दिले जाते आज जीवनाची निरनिराळी अग विलग होऊन त्याचा स्वतत्ररीतीने विकास होत आहे पूर्वी जीवन एवढे बहुअगानी युक्त असे नव्हते जागतिक इतिहासाचे व निरनिराळ्या सस्कृतीचे अवलोकन करताना असे आढळून येत की पूर्वकालीन सस्कृतीनी कोणत्या तरी एका अगर दोन जीवनागात नेत्रदीपक प्रगती केली इतर अगाकडे दुर्लक्षच झाले तो कदाचित परिस्थितीचाही परिणाम असेल एकाच सस्कृतीत सुद्धा विशिष्ट बाबीचा विकास साधलेले असे विशिष्ट कालखड आहेत उदाहरणे द्यायची झाली तर अनेक देता येतील ग्रीक सस्कृतीने प्रामुख्याने बुद्धिवादी भूमिकेवरून तत्त्वज्ञानाचा विचार करण्याचा पायडा पाडला; रोमन सस्कृतीने कायद्याच्या क्षेत्रात विलक्षण प्रगती केली होती, तर मिसर सस्कृतीने स्थापत्य-शास्त्रात बरीच पारगतता मिळविली होती भारतीय सस्कृतीचे उदाहरण घेतले तरी आपणास असे आढळून येते की, उपनिषद्काली तत्त्वज्ञान विचाराचा विकास खूप झाला, तर रामायण महाभारतामध्ये नैतिक जाणिवाचे विविधस्वरूपी दर्शन घडते कित्येक कालखडात धर्मविचाराना प्राधान्य मिळालेले आहे तर काही कालखडात विशुद्ध साहित्य विचाराला जोराची चालना मिळालेली आहे सत वाङ्मयाच्या कालात भक्तिभावनेला अधिक प्राधान्य आले, उलट असे काही कालखड आहेत की त्यातील वाङ्मय-कला ही एक प्रकारच्या विकलावस्थेचा (डिकॅडन्स) द्योतक आहे

शिवाय हे सारे वाङ्मय त्याच्या विशिष्ट गुणधर्मामुळे सस्कृतीरूप झालेले आहे यामुळे त्याचा अभ्यास करण्याची विशिष्ट शाखाच निर्माण झालेली आहे तिला वर उल्लेखिलेली प्राच्यविद्या शाखा (ओरिएटल लर्निंग) म्हणतात भारतीय वैशिष्ट्यावरून कित्येक ठिकाणी भारत विद्या (इडॉलॉजी) असाही शब्दप्रयोग वापरला जातो हे सारे साहित्य आता सस्कृती-साधनरूप झाले आहे त्याच्या अभ्यासात, इतिहासात, सस्कृती, भाषा, तत्त्वज्ञान व वाङ्मय व विविध शास्त्राचा

एकसमयावच्छेदे करून उपयोग करणे अवश्य ठरते त्यामुळे विद्येचे हे स्वतंत्र क्षेत्र निर्माण झालेले आहे त्याचा उपरिनिर्दिष्ट शास्त्राशी जवळचा संबंध आहे तरीही ते केवळ वाङ्मय-संशोधनापासून तसेच केवळ इतिहास-संशोधनापासून वेगळे मानले जाते त्याचे स्वतंत्र अस्तित्वच संशोधन-क्षेत्रात मान्य झालेले आहे व तेच योग्य आहे अर्थात संशोधनविषयक भूमिकाही बऱ्याच अशी ऐतिहासिक संशोधनाला जवळची आहे, हे उघड आहे या विषयाच्या संशोधनासाठी भाषाशास्त्र (फायलॉलॉजी) हे व्यापक शास्त्र १९ शतकात निर्माण झालेले आहे, हे यापूर्वी पाहिलेच आहे

## प्राचीन वाङ्मय संस्कृतीरूप

प्राचीन भाषातील वाङ्मय हे आताच पाहिल्याप्रमाणे संस्कृतीरूप झाले असल्याने त्याचे संशोधन जरा वेगळ्या भूमिकेवरूनच होते त्याची स्वतंत्र अशा प्रकारची पद्धती निर्माण व्हावयास हवी महाराष्ट्रात संशोधनाची ही शाखा खूपच विकसित झालेली आहे व अनेक महान संशोधक—त्यात काही जागतिक कीर्तीचे आहेत—महाराष्ट्रात निर्माण झालेले आहेत शोधबुद्धीच्या निरनिराळ्या अंगाना अवसर देणारे हे क्षेत्र आहे त्यामुळे ह्या क्षेत्रातील संशोधनबुद्धीची तेजस्विता विशेष लक्षात भरते, संशोधनाच्या व्यापकतेचेही नेत्रदीपक दर्शन घडते. एका बाजूने महाभारताची अविकृत अशी संहिता सिद्ध होत आलेली आहे दुसऱ्या बाजूने डॉ काणे याचा धर्मशास्त्राचा इतिहास व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी याचा उपनिषद-काड हा चार खंडाचा कोशरूप ग्रंथ आहे प्राचीन महाराष्ट्राचा डॉ केतकरकृत इतिहास तिसऱ्या बाजूने आहे, तर चवथ्या बाजूने डॉ कत्रे याच्या संपादकत्वाखाली सिद्ध होत असलेला जागतिक महत्त्वाचा संस्कृत ऐतिहासिक महाकोश आहे

या शाखेचे वैशिष्ट्यच असे की विविध प्रवृत्तीच्या आवडीनिवडीच्या अभ्यासाच्या संशोधकांना हिच्यात अपूर्व वाव आहे वेदवेदांगाचा व महाभारत–रामायणाचा सांप्रदायिक अर्थ सांगणारे संशोधक जसे या क्षेत्रात आहेत त्याचप्रमाणे डॉ कोसंबी, कॉ डांगे, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, विठ्ठल के ल दप्तरी, डॉ आंबेडकर, डॉ दांडेकर ह्यांच्यासारखे जुन्या विद्येचे नव्या दृष्टीने परीक्षण करणारे संशोधकही आहेत प्राकृत विद्येच्या संशोधनाच्या क्षेत्रात डॉ उपाध्ये, घाटगे, यांच्यासारखे श्रेष्ठ संशोधक आहेत, तर बौद्ध ग्रंथावरील संशोधनास, धर्मानंद-कोसंबी, डॉ बापट यांच्यासारखे विद्वान लाभलेले आहेत भाषाशास्त्र हे या प्राचीन विद्येचे एक अनन्यसाधारण अंग असून ते डॉ भांडारकर, गुणे, राजवाडे इत्यादींच्या प्रतिभेने उजळून निघालेले आहे

सशोधनाची ही परपरा आजही चालू आहे ह्या परपरेमुळेच आपणाकडे सशोधनाचे क्षेत्र म्हणजे पुराविद्या किंवा प्राच्यविद्या असा सकेत सर्वत्र रूढ झालेला आहे [त्या सकेतातून आपण थोडे बाहेर पडावयास हवे हे खरे आहे ] पण दिगत कीर्ती मिळविणाऱ्या विद्वानाचे हे कार्यक्षेत्र आहे हे लक्षात घेणे जरूर आहे सशोधनात किती विविधता असू शकते, किती मौलिकता असू शकते, ह्याची जाणीव ह्या क्षेत्रातील सशोधनावर सम्यक् दृष्टी टाकली तरी येऊ शकते यापैकी बरेचसे अव्वल दर्जाचे सशोधन आधुनिकतेला जवळचे आहे

सशोधकाच्या दृष्टीने या कार्याचे महत्त्व अपरपार आहे सशोधनाच्या कोणत्याही क्षेत्रातल्या नवप्रवेशकाने या क्षेत्रातील आपल्या विषयाला जवळचा असा एखादा ग्रथ किंवा काही लेख बारकाईने वाचणे अवश्य आहे कारण या सशोधनातून आपणा भारतीयाची एक विशिष्ट दृष्टी व्यक्त होते, तिचे खास दर्शन घडते, असा विचारवताचा अभिप्राय आहे तो धागा कायम राखण्यासाठी ही अशा प्रकारची सूचना उपयुक्त ठरेल

### आधुनिक संशोधनाचा रोख

प्राचीन भाषाच्या व सस्कृतीच्या क्षेत्रातून आधुनिक भाषाच्या किंवा सस्कृतीच्या क्षेत्रात उतरलो की फरक जाणवतो आधुनिक भाषाचा अभ्यास नि सशोधन किती विविध दृष्टीने करता येणे शक्य आहे ह्याचे थोडे दिग्दर्शन ह्यापूर्वी केलेलेच आहे आधुनिक सामाजिक शास्त्राच्या सशोधनाचा कल प्रायोगिकतेकडे आहे, हे यापूर्वी निर्देशिले आहे सशोधन-दृष्टीने प्रत्येक शास्त्राच्या तीन स्थूल अवस्था कल्पिता येतात अगदी पहिल्या अवस्थेला प्राथमिक अवस्था म्हणता येईल ह्या अवस्थेतले शास्त्र हे वस्तुस्थितीदर्शक (फॅक्च्युअल) किंवा वर्णनप्रधान (डिस्क्रिप्टिव्ह) असते अभ्यासात प्रायः समालोचनात्मकतेचा अवलब होतो, पुष्कळशी सामाजिक शास्त्रे यातून बाहेर पडलेली आहेत अर्थात ही पहिली अवस्था पाहताना प्रत्येक शास्त्राची विशिष्ट प्रकृती लक्षात घ्यावी लागते विज्ञान हेही एका अवस्थेत ह्या प्रकारचे शास्त्र होते नतरची अवस्था म्हणजे त्या शास्त्रात पृथगात्मतेचा प्रवेश होतो ह्या अवस्थेत त्या शास्त्राचा अभ्यास प्राय पृथक्करणप्रधान (अॅनॅलिटिकल्) पद्धतीने होतो बहुसख्य सामाजिक शास्त्रे ह्या अवस्थेत आहेत ह्याच्या पुढच्या अवस्थेत त्या शास्त्रात प्रयोगपद्धतीचा (एक्स्पेरिमेंटेशन) अवलब केला जातो मानसशास्त्र, शिक्षणशास्त्र यासारखी सामाजिक शास्त्रे या दिशेने प्रगती करीत आहेत व साधारणत सर्व सामाजिक शास्त्राचा रोख तिकडे आहे असे दिसते ह्यात साहित्य कोठे बसते हे पाहणे आवश्यक आहे

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात सपूर्ण प्रायोगिकता एकदरीने अशक्य दिसते तथापि सख्याशास्त्रीय पद्धतीचा अवलब करून प्रायोगिकतेची पूर्वतयारी चाललेली आहे असे म्हणता येईल साहित्य हे शास्त्र या दृष्टीने अद्याप वर्णनप्रधान व पृथक्करण-प्रधान अशा दोन अवस्थाच्या साध्यावर आहे त्याचा पृथक्करणप्रधान (ॲनॅलिटिकल्) शास्त्र म्हणून अद्याप पुष्कळ विकास व्हावयाचा आह त्यासाठी विविध प्रकारच्या प्रयत्नाना भरपूर अवसर आहे आजचे पुष्कळसे सशोधन हे त्या मानाने वर्णनप्रधान अवस्थेस साजेसे आहे बहुसख्य अभ्यासकाचा रोख समालोचनप्रधान विषय घेऊन आपला कार्यमार्ग साधण्याकडे असतो पृथक्करण पद्धतीचा अवलब करून त्या शास्त्राचा अधिक विकास घडवून आणणे शक्य आहे अर्थात त्यासाठी अधिक कल्पकता व चितन आवश्यक आहे उदा०, एखाद्या लेखकाच्या साहित्यातील किंवा एखाद्या कालखडातील साहित्यातील जीवनचित्रण निरनिराळ्या पातळ्यावर कसे झालेले आहे हे पाहणे प्रथम सर्वसाधारण विवेचनाने ह्या पातळ्या ठरविणे, नतर त्यापैकी प्रत्येकीची वैशिष्ट्ये सोदाहरण स्पष्ट करणे व शेवटी त्याचे परस्पर सबध पाहणे, तसेच ह्या सर्वाचे कलादृष्टीने परीक्षण करणे, हे करीत असताना योग्य ठिकाणी सख्याशास्त्रीय मार्गाचा अवलबही तारतम्याने करता येईल या दिशेने प्रयत्न झाल्यास आज तयार झालेली कोडी फुटेल व साहित्याच्या व सशोधनाच्या विकासाचा मार्ग मोकळा होईल

### काही दिशा : तुलनात्मक अभ्यास . वाङ्मय

त्याप्रमाणे आणखीही एका दिशेने साहित्यातील सशोधनाचा विकास व्हावयास हरकत नाही हे क्षेत्र म्हणजे साहित्याच्या तुलनात्मक अभ्यासाचे चौदा राष्ट्रीय भाषा असलेल्या भारतात ह्या दृष्टीने भरपूर वाव आहे आपल्या साहित्याचा एखादा कालखड वा वाङमयप्रकार घ्यावयाचा त्याचे एखादे अग विचारात घ्यायचे. उदा०, मराठी नाटकातील किंवा कादबऱ्यातील गेल्या २०–२५ वर्षांत चर्चिले गेलेले सामाजिक प्रश्न, किंवा रचनात्मक उपक्रम, असे विषय घेतले तर त्या दृष्टीने प्रश्नाची एक व्यापक यादी तयार होईल त्यापैकी विशिष्ट घटक विचारात घेणे किंवा सर्व प्रश्न विचारात घेणे, त्याचे पृथक्करण करणे, प्रत्येक घटकाचे वैशिष्ट्य स्पष्ट होईल असे काही प्रश्न तयार करणे, व त्या प्रश्नाच्या आधाराने त्याच कालखडात किंवा त्या वाङ्मयप्रकारात इतर भाषात काय स्थिती आढळते हे पाहणे म्हणजे पृथक्करण व सख्याशास्त्रीय पाहणी पद्धतीचा अभ्यासपूर्वक अवलब करून, काही विशिष्ट उद्दिष्टे हातात धरून पाहणी करणे अर्थात याही कामासाठी प्रत्येक भारतीय भाषेत निर्माण झालेल्या [ विशिष्ट प्रकारातील किंवा सर्व ] ग्रथाची सविस्तर

कोशवजा म्हणजेच आवश्यक अशी प्राथमिक माहिती उपलब्ध हवी. "ऑक्सफर्ड कंपॅनियन टु इंग्लिश लिटरेचर" या प्रसिद्ध संदर्भकोशाचा ह्या संबंधात उल्लेख करणे योग्य होईल. यासाठी असल्या प्रकारचे काही समष्टीप्रधान प्रयत्न व्हावयास हवेत, व ते योजनाबद्ध हवेत. उदा०, निरनिराळ्या भाषांतील काही संशोधन पदवी-मार्गदर्शकांनी एकत्र येऊन या दृष्टीने एखादी योजना आखणे योग्य होईल. व तिच्या द्वारे अशी प्राथमिक माहिती जमविता येईल. उदा०, पीएच्. डी. पदवीसाठी काम करण्याची परवानगी मागणाऱ्या विद्यार्थ्यांकडून त्यांना परवानगी देण्यापूर्वी हे असे पूरक काम करवून घेता येईल. एखाद्या विषयातील पदवी-मार्गदर्शकांनी एकत्र येऊन काही योजना आखली तर काही काम या दृष्टीने अधिक भरीव स्वरूपाचे होईल व इतर शास्त्रांप्रमाणे एका संशोधनातून दुसरे संशोधन उत्पन्न होईल. अर्थात हा केवळ अंगुलिनिर्देश आहे विविध संशोधन-पद्धतींचा अधिक अभ्यास करून त्यांचे अंतरंग जाणून घेऊन विशिष्ट निश्चित स्वरूपाची उद्दिष्टे पुढे ठेवून कार्यान्वित होता येईल हिन्दी भाषेतील संशोधनात तुलनात्मक अभ्यासाच्या दिशेने नुकती सुरवात झालेली दिसत आहे उपक्रम या दृष्टीने चांगला आहे पण त्या तुलनात्मक अभ्यासातून निश्चितपणे काय निष्पन्न होते ते दोन्ही संबंधित भाषांमधून उपलब्ध होणे अवश्य आहे विषयाची निवड करताना केवळ समालोचनपर विषय न घेता अधिक चिकित्सकता, अवलोकन, पृथक्करणशीलता, सूक्ष्मता इत्यादी संशोधनाशी संबद्ध अशा गुणविशेषांचा अधिकाधिक प्रत्यय येईल असे उपक्रम होणे आवश्यक आहे आजचे आमचे केवळ भाषाशास्त्रीयच नव्हे तर सर्वच संशोधन वाजवीपेक्षा अधिक पांडित्यप्रधान (अॅकॅडेमिक) झालेले आहे ते जितक्या लवकर शोधप्रधान (सर्च ओरिएंटेड) होईल तितके बरे होईल. त्या दृष्टीने साहित्याच्या संशोधनक्षेत्रात विविध उपक्रम करता येतील.

### तुलनात्मक अभ्यास : शब्द

भाषा व वाङमयाच्या क्षेत्रातील संशोधनात आणखीही विविधता आणणे शक्य आहे शब्ददर्शनाचा उल्लेख यापूर्वी आलेला आहेच. व्यवहारात अनेक प्रकारचे शब्द वापरले जातात. त्याच्यामागील सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक संकेत, विशिष्ट कालखंडात विशिष्ट संदर्भात व विशिष्ट अर्थाने होणारा त्यांचा वापर, नव्या गरजा, कल्पना, याच्यापोटी नवे शब्द कसे निर्माण झाले; जुन्या शब्दांना नवे अर्थ कसे आले इ दृष्टीने कितीतरी प्रकारची ऐतिहासिक पाहणी करण्यास अवसर आहे. या संदर्भात तुलनात्मक संशोधनासही पुष्कळ अवसर आहे. उदाहरणार्थ, वाङमय, राज्यव्यवहार व शिक्षणशास्त्र या क्षेत्रात उपयोगात

आणले जाणारे विविध शब्द एकत्र करून ते कसे केव्हा आले ते पाहणे तसेच त्याचे अर्थ निश्चित करणे अनेक इंग्रजी शब्दाबद्दल एकच मराठी शब्द वापरला जातो, उदा०, सेक्शन, पार्ट, कपार्टमेंट, (विद्यापीठातील) डिपार्टमेंट, विशिष्ट अर्थाने डिव्हिजन (उ महाराष्ट्राचे ६ डिव्हिजन्स आहेत) इ या शब्दासाठी मराठीत विभाग हा एकच शब्द वापरला जातो भाषेचे हे वैगुण्य व अशी इतर वैगुण्ये निदर्शनास येऊन त्याच्या निराकरणाच्या दिशेने प्रयत्न व्हावयास लागतील * आज या संदर्भात आणखी एक विषय निवडण्यासारखा आहे याच क्षेत्रातील शब्दाचे इतर राज्यात वा भाषात कोणते प्रतिशब्द आहेत? चार-पाच भाषाचा गट विचारात घेतला तरी ३–४ विद्यार्थ्यांच्या प्रयत्नाने सर्व प्रादेशिक तुलनात्मक शब्द एकत्र होऊन संस्कृतप्रधान भाषात सर्व भारतात किंवा त्याच्या मोठ्या भागात राज्यव्यवहार, शिक्षण व साहित्य या क्षेत्रात समान परिभाषा निर्माण होणे शक्य आहे काय? इत्यादी प्रकारच्या विषयाला चालना मिळून भारतीय एकतेच्या दिशेने काही निश्चित पावले पडण्यास संशोधनाची मदत होईल ते शक्य न झाले तरी मार्गातील अडचणी तरी स्पष्ट होतील अशा तऱ्हेचे शब्दाचे हे जसे साहित्याचे क्षेत्र झाले, तसे शिक्षणाच्या क्षेत्रात निरनिराळ्या विद्यापीठातील, निरनिराळ्या पदवीपरीक्षाच्या (विविध विषयातील) अभ्यासक्रमाची तुलनात्मक पाहणी करता येईल हाही प्रयत्न एकात्मतेच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरेल सगळे निष्कर्ष संशोधनाधिष्ठित झाले तर त्याना एक विशिष्ट वजन प्राप्त होईल प्रत्येक क्षेत्रातील विषयाच्या व तत्त्वाच्या दृष्टीने तुलनात्मक पाहणीचा अवलंब करणे योग्य होईल तुलनात्मक पाहणीची दृष्टी आली की विषय सुचतील

## हिंदी भाषेतील वस्तुस्थिती

हिंदी भाषेतील संशोधनात काही विद्यापीठातून तुलनात्मक पाहणीस नुसती सुरुवात झालेली दिसते पण ती सुरुवातच आहे (प्रत्यक्ष निष्पन्नता पाहण्यास काळ जावयास हवा) तथापि हिंदी भाषेतील संशोधन विषयाच्या दृष्टीने भयानक रीतीने एकारलेले दिसते एकही नवा विषय शिल्लक राहिलेला नाही 'शोध प्रक्रिया'

* तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यानी हैदराबादच्या (डिसे १९६५ च्या) साहित्य संमेलनातील एका भाषणात नव्या पारिभाषिक शब्दाबाबतचे जे अतिशय नाविन्यपूर्ण विवेचन केले, त्याचा या संदर्भात उल्लेख करता येईल त्यानी शब्दक्षेत्रात एक नवेच संशोधन क्षेत्र सूचित केले आहे त्याच्या मार्गदर्शनाखाली विश्वकोशाच्या संपादकवर्गाकडून ह्या दिशेने काही भरीव स्वरूपाचे प्रयत्न चालू आहेत पण विद्यापीठातील संशोधनातही हा विषय दुर्लक्षित असण्याचे कारण नाही

या विषयावर भाषिक सशोधनाचे विवरण करणारी अनेक पुस्तके हिंदीत आहेत बहुतेकात शेवटी विद्यापीठीय (झालेल्या व होत असलेल्याही) प्रबधाची यादी दिलेली असते आतापर्यंत हिंदीत ५०० पेक्षा अधिक पीएच् डी पदवीचे प्रबध लिहिले गेले वा जात आहेत त्या शिवाय डी लिट्चे ३६ प्रबध आहेत (गेल्या २५ वर्षांत) एकेका विषयावर चार चार पाच पाच जण प्रबध सादर करताना दिसतात नवीन विद्यार्थ्यांचे काम तुलनेने सोपे एखादा विषय घ्यायचा, तयार झालेले प्रबध मिळवायचे, त्यावरून आपला प्रबध तयार करायचा यामुळे तत्क्षेत्रीय सशोधनाची पातळी खाली जात असली पाहिजे काही दिवसानी मराठीत—नव्हे सर्वच भारतीय भाषात—ही परिस्थिती निर्माण होईल की काय अशी भीती वाटते हे टाळायचे असेल तर सशोधनामागली पारपरिक भूमिका व दृष्टी बदलली पाहिजे ते अधिक जीवनान्वेषी कसे होईल, त्यात विविधता कशी येईल हे पाहणे आवश्यक आहे

## *संशोधनातील विशिष्ट कल ( ट्रेंड )*

थोडक्यात असे म्हणता येईल की, वाङमय अगर भाषा क्षेत्रातील विद्यार्थ्याने सामाजिक क्षेत्रीय सशोधनात अवलबिल्या जाणाऱ्या विविध पद्धतीचा अभ्यास करून त्या दिशेने आपला विषय व शोधपद्धती निवडावी सामाजिक शास्त्राचे सशोधन वैज्ञानिक सशोधनाला आदर्श मानून त्या दिशेने प्रवास करताना दिसत आहे वाङमयशास्त्रीय सशोधनाने आपला मार्ग आखताना अर्थातच सामाजिक शास्त्राच्या पद्धतीच्या योग्यायोग्यतेचा विचार करावा लागेल ही प्रक्रिया थोडी अपरिहार्य दिसते [ हे सारे लक्षात घेऊनच प्रस्तुत पुस्तकातील विवेचनाची माडणी विवक्षित दृष्टीने व अपेक्षेने केलेली आहे ] समाजशास्त्रीय सशोधन पद्धतीचा अधपणाने अवलब करावा, व वाङमयीन सशोधनातील, 'वाङमयीनपणा' कमी करावा असे सुतराम सुचवायचे नाही सशोधनाला जीवनाभिमुख करण्याचा प्रयत्न केला, तसेच चिकित्सकतेला कल्पकतेची व विशाल समाजहिताची किंवा ज्ञानप्रेमाची जोड दिली तर नवे मार्ग व नव्या दिशा दृग्गोचर होतील

## इंग्रजीतील *संशोधनाचा प्रश्न*

भाषा व वाङमयाच्या क्षेत्रातील सशोधनाचे विवेचन इग्रजी भाषेतील सशोधनाच्या शक्यतेचा विचार केल्याखेरीज पूर्ण होईल असे वाटत नाही इग्रजी ही इग्रजानी भारताला दिलेली ज्ञानक्षेत्रीय देणगी आहे हे विसरून चालणार नाही इग्रजीचे अध्ययन हे भारतीय विद्यापीठातून महत्त्वाचे राहणार आहे नव्हे त्यात

संशोधनाचीही सोय राहणार आहे. इंग्रजी भाषा ही जगातील प्रगत राष्ट्रांची भाषा असल्याने तिच्यात विविध दिशांनी व विविध दृष्टींनी एवढे संशोधन झालेले आहे की त्यात एखाद्या च्युत्पन्न भारतीयाला विशेष नवी भर घालता येईल असे वाटत नाही. सारे ग्रंथकार, वाङ्मयप्रकार, कालखंड, सारे महत्त्वाचे विषय. . कोणातरी प्रज्ञावंताने, प्रतिभावंताने वा संशोधकाने अगोदरच हाताळलेले आहेत अर्थात उत्तुंग प्रज्ञेच्या व्यक्तीला कोणतीही बंधने नाहीत हे खरे आहे पण हा अपवाद झाला. सर्वसामान्य अभ्यासकाच्या कक्षेपलीकडे हे क्षेत्र आहे अर्थात संशोधनाच्या नवीन कल्पनेप्रमाणे एखादा विषय घेऊन नवीन संदर्भात व नवीन दृष्टीने त्याची मांडणी करण्यास काहीच हरकत नाही. पण असे असले तरी त्याला भारतात फार मोठ्या मर्यादा आहेत हे मान्य करावयास हवे.

### आणखी काही नव्या दिशा

प्रा गोकाक यांनी आपल्या "इंग्लिश इन् इंडिया : इट्स प्रेझेंट अँड फ्यूचर" या ग्रंथातील "रीसर्च इन् इंग्लिश लँग्वेज अँड लिटरेचर इन् अवर युनिव्हर्सिटीज" या प्रकरणात या विषयासंबंधी काही वेगळ्या प्रकारचे विचार मांडलेले आहेत त्यांचा उल्लेख येथे करणे योग्य होईल श्री योगी अरविंदांच्या "फ्यूचर ऑफ् पोएट्री" या ग्रंथाचा उल्लेख करून ते म्हणतात की, या ग्रंथापासून "इंडियन स्कूल ऑफ इंग्लिश क्रिटिसिझम" निर्माण व्हावयास हरकत नाही. [जशी फ्रेंच स्कूल, जर्मन स्कूल, अमेरिकन स्कूल ही आहेत ] अर्थात हा एक सर्वांनी विचारात घेण्यासारखा मुद्दा आहे.

कित्येक भारतीयांनी इंग्रजी भाषेत उत्कृष्ट प्रकारचे लेखन केले आहे काहींना मान्यताही मिळाली आहे. [एका भारतीय विद्यार्थ्याने प्रसिद्ध लेखक आर के नारायण यांच्या वाङ्मयावर प्रबंध लिहिला व एका अमेरिकन विद्यापीठाने तो पदवीसाठी स्वीकारला आहे ] या भारतीयांच्या विविध इंग्रजी लेखनाचा अभ्यास आपण भारतीयांनी करावयास हवा. नेहरू, राधाकृष्णन्, टागोर, गांधी, सरोजिनी नायडू, ना गोखले, श्रीनिवासशास्त्री, रमेशचंद्र दत्त, मुल्कराज आनंद इत्यादींची भरीव इंग्रजी वाङ्मयसेवा विद्वन्मान्य आहे तिकडे भारतीयांनी लक्ष द्यावे

विचारासाठी विषयाचा तिसरा वर्ग त्यांनी सुचविलेला आहे आपापल्या भारतीय भाषांवर इंग्रजी विचारांचा, कल्पनांचा, वाङ्मयाचा परिणाम कसा झाला, हे पाहणे वास्तविक हे त्या त्या भाषेतील लोकांचे काम आहे पण इंग्रजीच्या अभ्यासकाने इंग्रजीतून हे काम केले तर इंग्रजी भाषेच्या ज्ञानभांडारात ही नवी भर पडेल त्यापेक्षा महत्त्वाचा विचार म्हणजे काही पौर्वात्य व पाश्चात्य विचारवंतांच्या वा

समीक्षकाच्या तुलनात्मक अभ्यासाचा. उदा ,ॲरिस्टॉटल् व भरत, कोलरिज व अभिनव गुप्त. तसेच ॲरिस्टॉटल्, डॉ. जॉनसन्, ॲर्नोल्ड, ब्रॅडले याच्या विचाराचा, व भरत, आनदवर्धन, मम्मट इत्यादी सस्कृत टीकाकाराच्या विचाराचा तुलनात्मक अभ्यास करणे योग्य होईल. इग्रजपूर्व वाङमयातील काही वाङमयप्रकाराची आणि ग्रथकाराची समान वाङमयप्रकाराशी व समान प्रवृत्तीच्या लेखकाशी तुलना करून तुलनात्मक विवेचनही करता येईल. इग्रजी शब्द भारतीय भाषात कसे रूढ झालेले आहेत, तीही एक अभ्यासाचा विषय होऊ शकतो.

इग्रजी भाषा ही भिन्न प्रातात कशी बोलली जाते (उदा०, पजाब, केरळ, गुजरात, तामीळनाड, महाराष्ट्र इत्यादी) हे पाहणे हाही एक अभ्यासाचा विषय होऊ शकतो. शेवटी काही भारतीय चागल्या ग्रथाची इग्रजीत भाषातरे व्हायला हरकत नाही. तेही मर्यादित प्रमाणात 'सशोधन' गणले जावे (काही जणाचा ह्या कल्पनेस विरोध होईल ही शकाही त्यानी व्यक्त केली आहे).

## भारतीयत्वाचा धागा महत्त्वाचा

अशा रीतीने इग्रजी भाषेच्या भारतातील सशोधनाच्या नव्या दिशाचा अभ्यासकानी सहानुभूतीने विचार करावयास हवा मुख्य आग्रह म्हणजे इग्रजी भाषा ही भारतीयाच्या जीवनाच्या पार्श्वभूमीवर अभ्यासली जावी इग्रजी भाषेचे कैवारी आतापर्यंत भारतीय भाषा, जीवन याच्याकडे एक प्रकारच्या तिरस्काराने पाहात असत. इग्रज हा देश सोडीपर्यंत ही प्रवृत्ती फारशी बदललेली नव्हती. आजही इग्रजी विषय घेताना भारतीय सस्काराचा विचार केलेला असतोच असे नाही इग्रजी भाषेचे सशोधन भारतात कशा रीतीने व्हावे हा त्या क्षेत्रातील लोकाचा प्रामुख्याने प्रश्न असला तरी स्वातत्र्याच्या काळात त्या भाषेकडे, तिच्या अभ्यासाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला पाहिजे व त्या अभ्यासाचे भारतीयीकरण झाले पाहिजे हा जो प्रा. गोकाक याच्या विचारातील धागा आहे तो अतिशय आस्थेवाईकपणे विचारात घेणे अवश्य आहे.

त्यानी शोधक्षेत्राच्या ज्या नव्या दिशा दर्शविल्या आहेत त्या धर्तीवर इतर भाषाच्या अभ्यासालासुद्धा नवी कलाटणी मिळेल.

## साहित्य-संशोधनास स्वतंत्र मान्यता हवी

भाषा व वाङमयविषयक सशोधनास आपल्या देशात फक्त तात्त्विकच स्थान आहे. आधुनिक भारतीय भाषाचा अभ्यास प्राचीन कालापुरता प्राच्य विद्याभ्यासाशी

समरूप होतो  तर आधुनिक कालात इंग्रजीच्या धर्तीवर तो होतो  इंग्रजीत वाङ्मयीन संशोधन अशी शाखा नाही  त्यांची टीकेची (क्रिटिसिझम) व्याख्या एवढी व्यापक आहे की तीत संशोधनरूप लेखन समाविष्ट होते  त्यांच्याच मते कोणतेही विचार वा विवेचन प्रधान लेखन संशोधन होय  पण याचा परिणाम आपल्या भाषासंशोधनावर चमत्कारिक झाला आहे  काही असले तरी आज मराठीतले वाङ्मयशोधन हे एक स्वतंत्र दालन आहे असे मानावयास हवे  व त्याचे स्वरूप स्वतंत्ररीतीने उलगडून दाखविण्याचे प्रयत्न व्हावयास हवे  प्रत्येक भाषेबाबत हे म्हणता येईल  त्या दृष्टीने मराठीतील शोधनप्रधान लेखन हे एक अध्ययन उपलब्ध व्हावयास हरकत नाही * प्रा ग वा सरदार यांनी संपादित केलेल्या 'महाराष्ट्र जीवन' ह्या ग्रंथातील दुसऱ्या भागात 'सृष्टिविज्ञान,' 'मानववंश समाजशास्त्रे,' 'पुराण वस्तु संशोधन आणि प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृती,' 'मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहास,' 'राज्यशास्त्र व इतिहास,' एवढ्या क्षेत्रांतील संशोधनकार्याचा आढावा घेतला आहे  पण साहित्यक्षेत्रीय संशोधनाचा नाही  याचे कारण हा विवाद्य व उपेक्षित विषय आहे  या पुस्तकातील विवेचनाद्वारे त्यातील विवाद्यता व उपेक्षा कमी व्हावयास हरकत नाही

* प्रस्तुत पुस्तकाला त्या स्वरूपाचे एक परिशिष्टही जोडण्याचे ठरविले होते, पण काही अंशी विस्तारभयास्तव ते टाळले आहे

## प्रश्नाने प्रारंभ

संशोधनाची सुरुवात कोणत्या तरी प्रश्नाने अगर प्रमेयाने होते चौरस बुद्धीला निरनिराळ्या प्रकारचे प्रश्न जाणवतात अशा प्रकारचा उत्सुकतेला आवाहन करणारा एखादा प्रश्न योग्य शब्दात मांडण्याने संशोधनाला प्रारंभ होतो

त्यानंतरचा भाग म्हणजे त्या प्रश्नाच्या संभाव्य उत्तराविषयी निरनिराळ्या प्रकारचे अंदाज करणे, आणि त्याच्या माध्यमाने उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करणे अशा रीतीने उत्तरे शोधण्याचे अनेक प्रकार आहेत (त्याचा विचार पुढे येणारच आहे) उत्तरे शोधण्यासाठी जे प्रश्न पुढे ठेवले जातात त्याच्या वैशिष्ट्यावरून संशोधनाचे उद्दिष्ट ठरते, ह्यायोगे संशोधनाच्या प्रक्रियेचे स्वरूपही निश्चित करता येते कशा करता संशोधन करणार आहोत याची सुस्पष्ट कल्पना संशोधकाला असणे जरूर आहे प्रत्येक वेळा केवळ व्यावहारिक स्वरूपाची माहितीच हवी असते. ती उपलब्ध करून घेणे हे संशोधनाचे उद्दिष्ट असते संशोधनाचा हा अगदी पहिला प्रकार झाला उदाहरणार्थ, भारतीयांची लोकसंख्याविषयक नुसती माहिती जमविणे मर्यादित स्वरूपाचे उदाहरण म्हणजे एखाद्या शहरातील विविध वसतीगृहात राहणाऱ्या विद्यार्थ्यांसबंधी निरनिराळ्या प्रकारची माहिती मिळविणे, हेही सोपे नसते त्यासाठी योग्य अशा प्रश्नावलीचा वा परिशिष्टाचा अवलंब करावा लागतो त्यानंतर दुसरी अवस्था म्हणजे मिळविलेल्या माहितीच्या आधारे विशिष्ट समस्येच्या संदर्भात कारणमीमांसा शोधणे, ह्यातून पुढे उपाययोजना सुचविण्याचा उपक्रमही उरनात होऊ शकतो

निर्माण केलेले प्रमेय विचारात घेतलेले प्रश्न किंवा समस्या प्रत्येक वेळा केवळ तात्त्विक स्वरूपाच्या असतात त्याचा उपयुक्ततेशी जवळचा संबंध नसतो हे तात्त्विक संशोधन अर्थातच सर्वश्रेष्ठ प्रकारचे गणले जाते प्रत्येक शास्त्रात ह्याचे स्वरूप वेगळे असते ह्या तात्त्विक संशोधनानेच जगाची प्रगती झालेली आहे तात्कालिक उपयोगाच्या दृष्टीने हे संशोधन कमी महत्त्वाचे वाटले तरी दूर दृष्टीने पाहता ते बरेच मौलिक ठरते ह्या मूलभूत संशोधनानेच माणसाला श्रेष्ठपणा (ग्रेटनेस) लाभलेला आहे विषय वा क्षेत्र कोणतेही असले तरी संशोधनपद्धती स्थूलमानाने समान आहे म्हणजे तीत शास्त्रीय दृष्टिकोनाचे महत्त्व अपरंपार मानले जाते अर्थात ह्या 'शास्त्रीय दृष्टी'च्या मुद्दा काही मर्यादा (काही क्षेत्राच्या बाबतीत तरी) आता स्पष्ट होत चालल्या आहेत तसेच आताच पाहिलेल्या अति प्राथमिक व उपयुक्ततावादी आणि अति उच्च अशा दोन टोकाच्या मध्ये पडणारे बहुविध प्रकारचे संशोधन आहे, आणि तेच विद्यापीठाच्या वाट्यास येते या प्रकारच्या संशोधनाचे

संस्कार झालेले तज्ज्ञ विद्यापीठातून बाहेर पडल्यानंतर निरनिराळ्या व्यवसायात शिरतात तेथे त्यांना ह्या संशोधनप्रधान भूमिकेचा विपुल उपयोग होतो

## पुढली पायरी

विद्यार्थ्यांच्या मनावर संशोधनाचे संस्कार होण्यास आणखी एका प्रकारच्या शिक्षणाची आवश्यकता असते प्रत्यक्ष प्रयोगांनी निरनिराळी माहिती मिळते ती एकत्रित केली जाते व निष्कर्ष काढलेही जातात पण खरी अडचण पुढेच येते व ती म्हणजे संशोधनवृत्त तयार करणे त्यासाठी विशिष्ट तंत्र, पद्धती, प्रक्रिया इत्यादींचा अवलंब करावा लागतो त्यादृष्टीने अनेक प्रगत राष्ट्रात हा एक विषयच अभ्यासात समाविष्ट झालेला असतो लोकशाही राज्यपद्धतीत निरनिराळ्या *सामाजिक, राजकीय, आर्थिक, तात्त्विक, सांस्कृतिक समस्यांची सोडवणूक करण्याचा* मार्ग सुचविण्यासाठी निरनिराळ्या समित्या नेमल्या जातात व ह्या समित्यांना आपले अहवाल सादर करावे लागतात ते तयार करताना संशोधनाच्या तंत्र-पद्धतीचा अवलंब केला जातो ह्यावरून लोकशाही राजवटीतही संशोधन वृत्ताचे महत्त्व मान्य करावयास हरकत नाही

ह्या संशोधन-अहवालांनी (रीसर्च रिपोर्ट) विद्यार्थ्यांचा दुहेरी फायदा होतो, पहिला म्हणजे एकाच पुस्तकाच्या वा दृष्टिकोनाच्या दडपणातून विद्यार्थ्यांची मुक्तता होते व दुसरा म्हणजे स्वतंत्रपणे अभ्यास करण्याची, शास्त्रीय दृष्टी आत्मसात करण्याची, विचारात तर्कशुद्धता आणण्याची व त्याची तात्त्विक बैठक पक्की करण्याची' अशा विविध प्रकारच्या संधी त्याला उपलब्ध करून दिल्या जातात

यादृष्टीने "एखाद्या विशिष्ट विषयासंबंधी विशिष्ट उद्देश मनात धरून आवश्यक ती माहिती मिळविण्याचा सापेक्ष व पद्धतशीर प्रयत्न म्हणजे संशोधन" अशी संशोधनाची चालचलाऊ व्याख्या तयार करता येईल

संशोधन-वृत्त लिहिण्याच्या दृष्टीने संशोधन हे मुख्यत दोन प्रकारचे असते एक शास्त्रीय व दुसरे साहित्यिक शास्त्रीय संशोधन प्रयोगप्रधान असते व त्यात घटिते (फॅक्ट्स) संशोधकाला तयार करून घ्यावी लागतात, हे आपण पूर्वी दुसऱ्या प्रकरणात पाहिलेच आहे मिळवावयाची माहिती होही घेतलेल्या प्रश्नाचे उत्तर मिळविण्याचा मार्ग वा उत्तर अदाजाने ठरवून मग त्यादृष्टीने प्रयोगाची योजना करणे जरूर असते प्रयोग करतानाही विशिष्ट तंत्र अवलंबावे लागते व सर्व माहिती हाती आल्यावर निगमन तर्कपद्धतीचा अवलंब करून निष्कर्ष काढणे आवश्यक असते

वाङमयीन संशोधन हे पृथक्करण-प्रधानतेवर (अॅनॅलिसिस) आधारलेले आहे शास्त्रीय संशोधनात जी माहिती प्रयोगाच्या साह्याने मिळविली जाते ती येथे प्राय. पुस्तकातून मिळविली जाते. प्रथम सर्व माहिती जमवून, नंतर तिचे सूक्ष्म परिशीलन करून निष्कर्ष काढले जातात म्हणजे एकंदर पद्धती तीच आहे. फरक आहे तो हा की, जी सामग्री वा ज्ञान मिळविले जाते ते प्रयोगपद्धतीने काढलेल्या माहिती-प्रमाणे निर्विवाद किंवा निरपवाद विश्वसनीय नसते; कारण आपली साधनेच तशी आहेत. शिवाय या ठिकाणी संशोधकाचा संबंध, सौंदर्यशास्त्र, नीतिशास्त्र अशा प्रकारच्या शास्त्रातील अमूर्त मूल्यांशी असतो. याचा अर्थ आपणाजवळ अव्वल दर्जाची माहिती नसते किंवा तिचा आपण कधीच उपयोग करीत नाही असा नाही. उलटपक्षी अव्वल स्वरूपाचे साहित्य हेच नेहमीच अधिक प्रमाणभूत मानले जाते, व त्यासाठी अनेक प्रयत्न केले जातात. प्राचीन ग्रंथाच्या 'संहिता' ठरविण्यास महत्त्व आले ते ह्याच गोष्टीमुळे

## *शोधनिबंध: सोद्देश लेखनाचा एक प्रकार*

संशोधनवृत्त (रीसर्च रिपोर्ट), शोध-निबंध (रीसर्च पेपर) हे शब्द ह्या संदर्भात वारंवार उपयोगात आणले जातात हे सारे लेखन विशिष्ट उद्देश पुढे ठेवून केलेले असते म्हणून त्यांना सोद्देश लेखन (राईटिंग विथ ए परपज्) असेही म्हटले जाते. ह्यात व्यावहारिक दृष्टीने तयार केलेल्या साध्या पाहणीवृत्तापासून तो पीएच् डी पदवीसाठी लिहिल्या जाणाऱ्या प्रबंधापर्यंत सारे लेखन येते. बँकांचे अहवाल, व्यापारी कंपन्यांचे विशिष्ट आढावे, कोणत्याही विशिष्ट कार्यासाठी नियुक्त केलेल्या समितीचे अहवाल हे सर्व सोद्देश लेखनाचेच विविध नमुने होत.

## *त्यांतील विविधता*

ह्या वृत्ताचे अशारीतीने निरनिराळे प्रकार पडतात. त्या प्रकारान्वये त्याची भाषा बदलते, स्वरूप पण बदलते बँका, विमाकंपन्या यांच्या वार्षिक व इतर प्रकारच्या वृत्तांत निरनिराळ्या प्रकारची कोष्टके असतात, विशिष्ट पद्धतीने ताळेबंद (बॅलन्स शीट) सादर केलेला असतो. गणितात्म्यासक आपल्या अहवालात आपली फलिते (इन्व्हेस्टिगेशन्स्) बीजगणिताच्या चिन्हांकित परिभाषेत मांडतो, तर रसायनाचा विद्यार्थी विविध प्रकारची प्रतीके व शोध-सूत्रे (फॉर्म्युले) यांच्या परिभाषेत आपले निष्कर्ष सांगतो. भाषेचा, वाङमयाचा, व तत्समान शास्त्राचा विद्यार्थी आपले दीर्घ अभ्यास सादर करताना विषयाचे चिकित्सक पृथक्करण करून आपल्या मताच्या समर्थनार्थ किंवा इतर कारणासाठी इतर ग्रंथकाराच्या ग्रंथातले

अनेक लहान मोठे उतारे देऊन आपला प्रबध सजवीत असतो शैक्षणिक व मानसशास्त्रीय अभ्यास-वृत्तात आकडेशास्त्राच्या आधाराने सिद्ध केलेली अनेक कोष्टके, तक्ते इत्यादी दिलेली असतात व त्याच्या आधाराने लेखकाने आपले निष्कर्ष पुढे केलेले असतात उलट व्यावसायिक मानसोपचारतज्ज्ञ व सामाजिक समस्याची माडणी करणारा अभ्यासक आपली अवलोकने, विशिष्ट सदर्भ माहिती (केस हिस्ट-रीज) उदाहरणानी माडीत असतो विशिष्ट भौगोलिक पाहणीच्या वृत्तातात तक्ते, कोष्टके याबरोबर नकाशाचा उपयोग केला जातो, तर उत्खननावरील लेखनात उत्खननाच्या वर्णनाबरोबर व माहितीबरोबर विशिष्ट छायाचित्रे पण छापलेली असतात

## वृत्तपत्रीय अहवाल : रचना-वैशिष्ट्य

वृत्ताताचा अगदी रोजच्या व्यवहारातील किंवा नित्य परिचयाचा नमुना म्हणजे वृत्तपत्रीय अहवाल होत विशिष्ट घटनेची अधिकृत म्हणजेच अव्वल व प्रत्यक्ष जाऊन मिळविलेली (फर्स्ट हॅंन्ड) माहिती, वस्तुस्थितीच्या वर्णनाच्या तसेच सब-धिताच्या मुलाखतीच्या आधारे लावापुढे ठेवलेली असते वृत्तपत्रात माहिती देण्याचे एक स्वयसिद्ध असे तत्र आहे प्रथम शीर्षक येते त्यात सर्व वृत्तविशेषाचे थोडक्यात दिग्दर्शन असते नतर पहिला परिच्छेद त्यात सर्वात महत्त्वाची माहिती ही थोडया विस्ताराने दिलेली असते नतरच्या परिच्छेदात कमी महत्त्वाची माहिती, त्यानतरच्या परिच्छेदात त्यापेक्षा कमी महत्त्वाची, अशा क्रमाने ते वृत्त लिहिलेले असते अशी पद्धत अवलबण्याचे दोन फायदे असतात पहिला एखाद्या वाचकास जेवढा वेळ त्या बातमीला द्यायचा असेल त्या प्रमाणात त्याला माहिती मिळते त्याला अल्पवेळ असेल तरी महत्त्वाचा भाग हा कळतोच, म्हणजे वाचकाच्या दृष्टीने ही पद्धत सोयीची आहे दुसरा फायदा सपादकाच्या दृष्टीने आहे एखादे वृत्त मोठे असेल व वृत्तपत्रात तेवढी जागा जर नसेल, तर अशा वेळी ते वृत्त उलटीकडून कमी करीत आणणे हे सोयीचे होते म्हणजे महत्त्वाचे असे काहीही गाळले जात नाही. दैनिक वा साप्ताहिक वृत्तपत्रात येणाऱ्या इतर लेखाच्या बाबतही हीच परिस्थिती असते जागेच्या उपलब्ध विस्तारापेक्षा लेख मोठा असेल तर तो कापणे अपरिहार्य ठरते आपला लेख कुठेतरी कापला जाऊ नये असे लेखकास वाटत असेल तर वृत्त-पत्रीय लेख लिहितानाच या विशिष्ट पद्धतीचा अवलब करावयास हरकत नाही

## ग्रंथ-परीक्षणे व वार्षिक वृत्तात

सप्रयोजन लेखनाचा आणखी एक प्रकार म्हणजे विविध प्रकारच्या नियत कालिकामधून येणारी पुस्तकाची परीक्षणे वा ग्रथावरील अभिप्राय याचा हाही

एक विशिष्ट सोद्देश लेखनप्रकारच आहे. या वृत्तात (परीक्षणात) ग्रंथाच्या आशयाची पृथक्करणपूर्वक पाहणी करून ग्रंथकाराच्या उद्दिष्टाची व त्याला प्राप्त झालेल्या यशापयशाची मीमांसा केलेली असते. त्याची भाषाशैली, विवेचन-पद्धती, विद्वत्ता, आग्रह, दुराग्रह, दृष्टिकोन इत्यादींचाही ऊहापोह यात येतो. लेखनाची वैशिष्ट्ये व मर्यादा यांचेपण विवेचन अपेक्षित असते. ग्रंथकाराचे विशेष गुण तसेच काही मडक दोष, याच्याकडे लक्ष वेधल्यावर शेवटचा भाग म्हणजे ग्रंथकाराच्या प्रस्तुत ग्रंथाची तुलनात्मक पाहणी. ही करताना त्या विषयावरील इतर ग्रंथांचा व त्याच ग्रंथकाराच्या इतर कृतींचा उपयोग केलेला असेल. अशा प्रकारे लिहिलेले उत्कृष्ट परीक्षण हा एक चांगला शोध-निबंधच होय.

सरकारचे विविध खात्यांचे वार्षिक वृत्तांत, विशिष्ट कारणासाठी नेमलेल्या समित्यांचे अहवाल, हा शोधवृत्तांचा शेवटचा प्रकार होय हे सगळे अहवाल अतिशय विद्वान लोकांनी लिहिलेले असतात त्यांच्यातील माहिती वा निष्कर्षांपेक्षा त्यातून प्रतीत होणारे संशोधनकौशल्य विवादातीत असते केवळ वाङ्मय या दृष्टीनेही कित्येकदा ते वाचनीय असतात काही प्रसिद्ध उदाहरणे देता येतील. मांटफर्ड कमिशनचा १९१८ च्या सुमारास प्रसिद्ध झालेला अहवाल, (रिपोर्ट) सायमन, डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या विविध समित्यांचे (कमिशन) अहवाल, तसेच राज्यपुनर्घटना समिती (१९५५) चा प्रसिद्ध अहवाल हे सारे संशोधन-वृत्तांत या दृष्टीने अतिशय वाचनीय व अभ्यसनीय आहेत.

या विवेचनावरून शोधनिबंध, शोध-वृत्त, [रीसर्च पेपर, व रीसर्च रिपोर्ट] म्हणजे काय व त्यांचे स्वरूप उद्दिष्टानुरूप कसे बदलते याची कल्पना येऊ शकेल. त्याचे स्वरूप एका बाजूने साध्या शोधवृत्तासारखे असते तर दुसऱ्या बाजूने त्याचे शोध-निबंध व प्रबंधात रुपांतर होऊ शकते ह्या दृष्टीने पाहता शोध-निबंध म्हणजे विशिष्ट लेखन कामगिरी (असाइनमेंट) विशिष्ट विषयावर चौकसबुद्धीने माहिती जमवून आपल्या निष्कर्षांची मांडणी शोध-निबंधात केलेली असते. तात्त्विक दृष्टीने पाहाता ही माहिती व्यक्तिगत अनुभवातून जमविली असेल कित्येकदा प्रयोगाच्या आधाराने ती जमविली जाते काहीवेळा एखादी प्रश्नावली (क्वेश्चनायर) तयार करून मिळविली असेल, तर कित्येकदा ग्रंथाच्या आधाराने ती दिलली असेल. निबंधासाठी यापैकी एक वा अनेक प्रकारांचा अवलंब केलेला असेल. नवशिक्याला प्रारंभी माहिती प्रायः पुस्तकांच्या द्वारे मिळविण्याचे काम सोपविले जाते. विद्यार्थ्याला एखादा विषय देऊन वा त्याला विषय निवडावयास सांगून, विविध पुस्तके, वृत्तपत्रे, नियतकालिके, अहवाल, इत्यादींतून माहिती जमवून लहान मोठे माहिती-प्रधान शोध-निबंध लिहिण्यापासून ह्यावाबतच्या त्याच्या शिक्षणास सुरुवात होते.

## काही फायदे

अशा प्रकारचे सोद्देश लेखन करावयास सांगण्याने दोन तीन उद्दिष्टे साधतात विद्यार्थ्याला ग्रंथालयाचा उपयोग करण्याची सवय लागते, तसेच सोद्देश लेखन वाचण्याची आवड त्याच्याठायी निर्माण होते, व वाचलेल्या पुस्तकाच्या टिपणी काढणे (नोट्स टेकिंग), ही कलाही त्याला आत्मसात करावी लागते त्यानंतर निबंध लिहिण्याच्या दृष्टीने त्याची विचारचक्रे हलू लागतात मिळविलेली माहिती नीट जुळविणे, मुद्दे तयार करणे व त्याच्या आधारे एक सलग एकसंध असा शोध-निबंध लिहिणे, ही सारी प्रक्रिया त्याला आत्मसात करावी लागते निबंध लिहिताना आधार देण्याचे तंत्र, तसेच साधनग्रंथाचा उपयोग करण्याचे तंत्र इत्यादी गोष्टी शिकाव्या लागतात *

## संकल्पित वाचकवर्ग

संशोधन-प्रक्रियेबाबत अधिक विवेचन करण्यापूर्वी एक दोन बाबीबाबतचे स्पष्टीकरण करणे अवश्य आहे पहिली गोष्ट म्हणजे जो शोध-निबंध अथवा प्रबंध आपण लिहिणार आहोत तो कोणाला उद्देशून, या संबंधीची स्पष्ट कल्पना प्रबंध-लेखनास प्रारंभ करण्यापूर्वी आपणास असणे अवश्य आहे लेखन ही एक सामाजिक कला आहे; सामाजिक निवेदनाचा तो एक प्रकार आहे स्वत लाच उद्देशून लिहिणे हे एककल्लीपणाचे आहे कोणालाच उद्देशून न लिहिणे हे एककल्लीपणाचे दुसरे टोक सोपा नियम म्हणजे कोणाला उद्देशून आपले लेखन चालू आहे, ह्या बाबतची सुस्पष्ट कल्पना प्रथमपासून मनात बाळगणे

शाळेतले वा कॉलेजातलेही निबंध हे प्रामुख्याने गुणासाठी परीक्षकाना उद्देशून लिहिलेले असतात तसेच निरनिराळी पत्रे ही सहानुभूती व रस घेणाऱ्या पालकाना उद्देशून लिहिलेली असतात कॉलेजमध्ये यामध्ये मित्राना उद्देशून लिहिलेल्या

---

* अशा प्रकारच्या शिकावू शोध-निबंधाचे विषय निवडताना पुढील प्रकारची दक्षता घेणे जरूर असते (१) विषय केवळ व्यक्तिगत अनुभवाच्या कथनावर आधारलेला नसावा (२) केवळ एकाच लेखातून माहिती मिळविता येईल इतका ल्हान अगर संकुचित स्वरूपाचा नसावा (३) ज्याना काही पुरावे मिळवणे कठिण आहे असे विषय टाळावेत [उदा, स्त्रिया या पुरुषापेक्षा प्रामाणिक असतात काय ?] (४) विषय हा मर्यादित स्वरूपाचा असावा फार व्यापक विषय घेतल्याने मामुली व वरवरची माहिती जमविली जाते, व शोध-निबंध लेखनाचे उद्दिष्ट सफल होत नाही

पत्राची भर पडते. या लेखनाचे स्वरूप, शैली, कथन इत्यादी ज्याना उद्देशून ती लिहिली असतात त्याच्या प्रवृत्ती, प्रकृती, आवडी-निवडीप्रमाणे बदलतात.

काही लेखन हे एकापेक्षा अनेक व्यक्तींना उद्देशून असते. काही प्रबंध हे केवळ परीक्षक पुढे ठेवून लिहिलेले असतात. यापेक्षा चांगल्या प्रकारचे प्रबंध लिहिताना परीक्षक पुढे असतातच, पण त्याहीपेक्षा हा प्रबंध प्रकाशित झाल्यावर, विद्वान, तज्ज्ञ व इतर अनेक लोक वाचक म्हणून लेखकापुढे असतात त्यांच्यापैकी काहींकडून प्रबंधाची मलावण होईल, अशी पण एक अपेक्षा असते. उच्च पदवीसाठी लिहिणारांनी परीक्षकासाठी लिहावे पण त्याच्यापेक्षा व्यापक असा वाचकवर्गही पुढे ठेवावा. परीक्षकासाठी विविध पुरावे आधार इत्यादी द्यावेत, तसेच काढलेले निष्कर्ष हे तर्कशुद्ध आहेत असेही पटवून देण्याचा प्रयत्न करणे चांगले.*

पतपेढ्या, बँका किंवा तत्सम व्यापारी संस्थांचे अहवाल लिहिणारांपुढे त्यांचा विशिष्ट चालकवर्ग असतो. त्याला पटवून देण्याच्या भूमिकेने ते लेखन झालेले असते.

शोध-निबंधासंबंधीच्या ह्या प्रास्ताविक विवेचनावरून लेखकाला शोध-निबंधाची कल्पना येऊन, त्याची भूमिका निश्चित होईल आता प्रत्यक्ष निबंधाच्या सिद्धतेसाठी कोणकोणत्या गोष्टींची तयारी करावी लागते, कोणत्या प्रक्रियेचा वा पद्धतीचा अवलंब करावा लागतो, यासंबंधी विवरण करणे अवश्य आहे. हे विवेचन सर्वच प्रकारच्या शोध-निबंधांना लागू आहे, केवळ वाङ्मयक्षेत्रीय निबंधापुरते ते मर्यादित नाही. या कारणासाठीच शोधनिबंधाच्या निरनिराळ्या प्रकारांचा व वैशिष्ट्यांचा वर उल्लेख केलेला आहे.

## *विषयाची निवड*

शोध-निबंधाच्या बाबतीत पुढली व सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे विषयाची निवड ही होय. चांगला विषय सुचण्यासाठी दीर्घकाल अवलोकन व चिंतन आवश्यक असते. विद्यापीठाच्या उच्च पदवीसाठी प्रबंध लिहू इच्छिणाऱ्या संशोधन-विद्यार्थ्यांना, तसेच व्यावसायिक (धंदेवाईक) संशोधकांना कोणी लक्ष न दिलेल्या अगर एखाद्या विषयाच्या दुर्लक्षित अशा अंगाच्या शोधात सतत राहावे लागते. विषय शोधासाठी आपल्या मनात एखादा विषय स्थूलमानाने ठरवून प्रत्यक्ष विशिष्ट घटक (टॉपिक)

*भारत व राज्यसरकारांनी ग्रंथांना निरनिराळी पारितोषिके देऊ केली असल्याने ग्रंथकारांपुढे हा अज्ञात 'परीक्षक वर्ग' ही असतोच त्याचा परिणाम त्याच्या ठायीच्या गुणांचा विकास होण्यास पोषक होण्याची शक्यता आहे, तशी तो त्याच्या विचारस्वातंत्र्याच्या आडही येण्याची शक्यता आहे.

निवडण्यासाठी उपलब्ध साधनग्रंथांचा (बिब्लिऑग्राफी) अवलंब करावा. यायोगे आपल्या विषयावर पूर्वी कोणी काम केले असल्यास त्याची आपणास कल्पना येईल.

आपणास विषय सापडत नसेल तर संबंधी प्राध्यापक अगर तत्सम तज्ज्ञांशी चर्चा करून विषय ठरवावा. एखादा विषय जरी सुचविला गेला तरी आपल्या आवडी निवडी व गरजेप्रमाणे विषय थोडा बदलून घ्यावा. आपल्याला आवड असलेली विषयाची बाजू आपण स्वीकारावी. एखादा मोठा प्राचीन ग्रंथ अभ्यासाकरता कोणी सुचविला तर त्याच्यावर त्याची संहिता निश्चित करण्याच्या दृष्टीने आपण काम करावयाचे, का लेखकाच्या वाङ्मयगुणाचा विचार करायचा, का लेखकाच्या व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूंचे दर्शन घडवायचे, का ग्रंथाचे सांस्कृतिक महत्त्व परीक्षणासाठी घ्यायचे, का ग्रंथाचा भाषाशास्त्रीय दृष्टीने अभ्यास करावयाचा ते आपण ठरविणे अवश्य असते. प्रत्येक विषयासंबंधी असा विशिष्ट पैलू नीट निरखून संशोधनासाठी घेणे आवश्यक असते.

कित्येक वेळा सुचविलेला विषय फारच व्यापक असतो. त्याचा थोडा संकोच करून तो मर्यादित केलेला विषय संशोधनासाठी घेणे आवश्यक असते. उदा., स्वातंत्र्योत्तर कालातील मराठी वाङ्मय, असा विषय सुचविला असेल तर त्याचे स्वरूप थोडे बदलून घेणे योग्य होईल. उदा., स्वातंत्र्योत्तर कालातील मराठी वाङ्मयातील विशिष्ट [ उ. सौंदर्यवादी, व्यक्तिवादी, सामाजिक इ. ] प्रवृत्ती. प्रो. कॉर्डेस्को यांनी कोणाही व्यक्तीचे संपूर्ण चरित्र संशोधनासाठी न घेण्याचा सल्ला नवप्रवेश कांना दिलेला आहे.

संशोधनात मौलिकतेचे जे अनेक प्रकारांनी दर्शन घडते त्यात विषयाची निवड हा एक भाग आहे. प्रत्यक्ष कामास सुरुवात करण्यापूर्वी योग्य विषयाच्या शोधात बराच काळ राहणे अवश्य असते. संशोधनाचे बरेचसे यशापयश हे विषयाच्या निवडीत असते हे लक्षात धरावे. त्यासाठी वेळ लागला तरी चालेल. तसेच विषय आपल्या आवडीनिवडीला जवळचा असावा. तसा असल्याशिवाय आपले व्यक्तिमत्व त्यात उतरणार नाही. संशोधन हा खेळ नव्हे. आपले मनच नव्हे तर शरीर, संसार, त्यासाठी त्या कालात बांधले जातात. त्याचा आपल्या मनावर खोल संस्कार उमटतो. साहजिकपणे विषयाची निवड ही कोणाच्या भीडमुर्वतीने झालेली नसावी. तसेच आपली कुवत लक्षात घेऊनही ती झालेली असावी. 'A great deal of patient thinking and planning becomes necessary even in the initial process of selection'— M. H. Gopal, [ 'Research Procedure in Social Sciences' page 89 ]

### विषयाचे शब्दांकन

विषय ठरल्यानतरचा अत्यत अवघड भाग म्हणजे विषय विशिष्ट समर्पक शब्दात माडणे हा विषय चागला असेल पण तो योग्य रीतीने शीर्षकात माडता आला नाही तरी सर्व काम नासेल तेव्हा विषय ठरल्यानतर अतिशय प्रयत्नपूर्वक व बारकाईने त्याचे शीर्षक ठरवावे शीर्षकानतर आपले उद्दिष्ट स्पष्ट होईल अशा रीतीने एका वाक्यात आपला विषय सागता आला पाहिजे यालाच उद्देशकथन (स्टेटमेंट ऑफ् इटेन्शन) म्हणतात त्याने विषयाची मर्यादा व्याप्ती स्पष्ट केली पाहिजे, त्यातून जे म्हणायचे ते नेमकेपणाने व थोडक्यात व्यक्त झाले पाहिजे

उद्देशकथनासबधी काही कसोटचा मनाशी बाळगाव्यात, उदा, विधानाची माडणी चर्चेला अवसर देणारी असावी उ, विशिष्ट जमातीतील व्यवसायाची पाहणी, विशिष्ट कालखडातील जीवनाचे स्वरूप पाहणे, अगर एखाद्या कालखडातील साहित्याचे स्वरुप तपासणे इ म्हणजे विधानात कोणतेही निश्चित मत (स्टेटमेंट) व्यक्त झालेले नसावे दुसरी कसोटी म्हणजे विषयाच्या अभ्यासात प्रत्यक्ष माहिती मिळविण्याला काही स्थान असावे तिसरे अग म्हणजे विषयाला अनेक (किमान दोन तरी) बाजू असाव्यात [अर्थात हे विशिष्ट प्रकारच्या विषयाना लागू पडते]. आधुनिक तर्कशास्त्राचे म्हणणे आहे की विशिष्ट प्रकारचे विधान हे पुराव्यानी खोडताही आले पाहिजे किंवा त्याचे समर्थनही करता आले पाहिजे या दोनही प्रकारची बीजे त्या विधानात असावीत शेवटची कसोटी म्हणजे आपल्या शोधविषयक उपक्रमाने एकदर ज्ञानात कोणत्यातरी प्रकारची पण निश्चित भर पडावी विषयाच्या निवडीशी व निश्चितीशी ह्यागोष्टी सबद्ध आहेत

### सामग्रीची जुळवाजुळव : ग्रंथालयाचे साहाय्य

अशा रीतीने विषयाची निश्चिती झाल्यानतरचा पुढचा टप्पा म्हणजे माहिती जमविणे, तिच्यासाठी निरनिराळचा साधनाचा अवलब करणे विज्ञानशास्त्रज्ञ प्रयोगशाळेचा आधार घेतो, तर सामाजिक शास्त्रज्ञ हा बव्हशी ग्रथालयावरच अवलबून असतो वाङमयीन सशोधनासाठी प्रामुख्याने पुस्तकावरच अवलबून राहावे लागते समाजशास्त्र, इतिहास इ सारख्या विषयाना ग्रथाशिवाय अन्य मार्गानी आपले साहित्य सिद्ध करून घ्यावे लागते त्याची चर्चा मागे एका प्रकरणात आलेली आहेच परतु मुख्य साधन म्हणजे ग्रथालयच

ग्रथालये ही ज्ञानाची सदावर्ते आहेत ग्रथालयाचे अनेक प्रकार आहेत काही ग्रथाल्ये सार्वजनिक स्वरुपाची असतात त्याच्यामध्ये पुस्तकाचा सग्रह करताना

सर्वसामान्य माणसाची आवड, निवड, गरजा, लक्षात घेतल्या असतात त्यानतर शाळामधील ग्रथालये याचे स्वरूपही फारसे सर्वसग्राहक नसते अभ्यासकाला विशेषत सशोधनाच्या विद्यार्थ्याला यातून फार कमी साहाय्य होईल त्यानतरची ग्रथालये म्हणजे महाविद्यालये व विद्यापीठे याची होत ही मात्र विशिष्ट हेतूनेच अस्तित्वात आलेली असतात ह्या ठिकाणी अभ्यासकाला बरीचशी साधनसामग्री मिळण्याची शक्यता असते पण आपणाकडे बहुसख्य महाविद्यालयीन ग्रथालयाकडे केवळ जुजबी उपयुक्ततेच्या दृष्टीनेच पाहिले जाते ग्रथालय हे नेहमी कालाबरोबर वाढत वनत असते त्यादृष्टीने एखादे कच्यापैकी ग्रथ असलेले व जुने ग्रथालय हे चागल्यापैकी नव्या ग्रथालयापेक्षा अधिक उपयुक्त असते अर्थात आर्थिक चणचणीच्या या कालात सर्वच दृष्टीनी कोणाची आवाळ होत असेल तर ती ग्रथालयाची होय विद्यापीठाची ग्रथालये ही सर्वच दृष्टीनी सर्वसग्राहक व आदर्श अशी असावयास हवीत व ती सामान्यत तशी असतात असे गृहीत धरावयास हरकत नाही ह्याशिवाय विशिष्ट विषयाना वाहिलेली अशा प्रकारची अनेक ग्रथालये असतात सशोधकाच्या दृष्टीने ही चागली आपल्या विशिष्ट विषयाला वाहिलेले अशा प्रकारचे ग्रथालय असेल तर त्याचा उपयोग अधिकाधिक होण्याची शक्यता असते पाश्चात्य देशात ग्रथालये अधिक काळजीपूर्वक उभारली व वापरली जातात

ग्रथालय हेच सशोधकाचे अभ्यासक्षेत्र त्यामुळे त्याला ग्रथालयाचा उपयोग कसा करावा ही माहिती आवश्यक असते त्या दृष्टीने तीन गोष्टी लक्षात धराव्यात पहिली कार्ड कॅटलॉग प्रत्येक पुस्तकाचे एक स्वतत्र कार्ड असते त्यात त्या पुस्तकासबधी प्रास्ताविक माहिती असते पाश्चात्य देशातील ग्रथालयात तर ग्रथकार, नाव, प्रकाशक, आवृत्ती, वर्ष, इ माहिती बरोबर पुस्तकाच्या आशयासबधीही थोडक्यात कल्पना या कार्डात दिलेली असते ही अवस्था आपणाकडे अद्याप यावयाची आहे पण कार्डस्वरूप माहिती चागल्या ग्रथालयात असते दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे निरनिराळ्या 'सूची' चे (इडेक्सेस) ज्ञान विषयसूची, ग्रथकार-नाम-सूची, ग्रथनामसूची, इ प्रकारच्या सूची आवश्यक असतात त्या अद्ययावत ठेवणे हे अतिशय अवघड व जिकीरीचे काम असते अगदी अलीकडे ग्रथनाम व ग्रथकारनाम या सूची एकत्र असतात, ही एकत्र मोठी सूची अधिक सर्वसग्राहक होऊ शकते (पण प्रत्यक्षात अनुभव असा की बऱ्याचशा ग्रथपालानाच अशा प्रकारची सूची एकत्रित असते याची जाणीव नसते!) सशोधकाने ह्या दोन गोष्टीचा चागला परिचय करून घ्यावा याशिवाय चागल्या ग्रथालयात अनेक प्रकारच्या सूची असतात, उदा , नियतकालिकाची सूची, विशिष्ट विषयाना वाहिलेल्या अभ्यास-वा सशोधन-कालिकाची (रीसर्च जर्नल्) सूची, निरनिराळ्या अहवालाची

दी इ इ या अशा सूची असावयास हव्यात चागल्या प्रकारच्या ग्रथालयात
ा असू शकतील, एवढेच लक्षात धरावे

## दर्भ-विभाग

तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे सदर्भ विभाग, हा मात्र प्रत्येक ग्रथालयात सावयास हवा व बरा वाईट असा असतोही यात निरनिराळचा प्रकारचे (देशाचे) वकोश, निरनिराळे विषयनिविष्ट असे विश्वकोश, उदा , वाङ्मय, सामाजिक ास्त्रे, वैज्ञानिक शास्त्रे, इतिहास, प्राचीन सस्कृती, तत्त्वज्ञान, उत्खनन इत्यादी ास्त्राचे स्वतत्र विश्वकोश उपलब्ध असतात मराठीतील प्रमुख विश्वकोश, सेच निदान निराळ्या प्रकारचे चरित्र विषयक कोश, वाणिज्य, अर्थशास्त्र, शेतकी, योगशास्त्र, भूगोल, सगीत, धर्म, इत्यादी अनेक विषयाचे स्वतत्र कोश किंवा ोशवजा ग्रथ असतात, त्या सर्वांचा आवश्यकतेनुसार उपयोग करावा

ह्या सदर्भ विभागात निरनिराळे शब्दकोश येतात शब्दकोश हा अभ्यासाचा ाया आह आपल्या विषयाशी सबद्ध अशा प्रकारचा एक स्वतत्र शब्दकोश तसेच क चागल्या प्रकारचा साधा इग्रजी, मराठी अगर हिंदी इत्यादी भाषापैकी एखादा सरा कोश आपल्या जवळ स्वत चा असावा त्याचा वारवार व खूप उपयोग ोतो आपणास वाटते त्यापेक्षा शब्दकोश अधिक उपयुक्त असतो

याशिवाय ह्या सदर्भ विभागात निरनिराळ्या प्रकारची वार्षिके (ईयर बुक्स व ॲन्युअल्स) असतात त्याचप्रमाणे ज्ञानसग्रहासारखे ग्रथ हेही कित्येक ठिकाणी असतात याशिवाय माहितीपुस्तके (हँडबुक्स) स्थलवर्णन कोश, (गॅझेटीअर) गौरव ग्रथ रवागी माहिती पुस्तके, परिचयग्रथ (डिरेक्टरी) दिनदर्शके, सस्थाचे वृत्तात, नियमाली इ साधने उल्लेखनीय आहेत सशोधकाला ह्या सर्वांमधून माहितीचे, ज्ञानाचे कण मेळवावे लागतात या सर्वांशी चागल्या प्रकारचा परिचय करून घ्यावा लागतो पाहावे कसे, त्याचा उपयोग कसा करावा हे थोडचा अनुभवाने चागले कळू लागते कलीकडे सशोधन कार्यासाठी ग्रथालये अत्यत महत्त्वाची आहेत ही जाणीव वाढीला ागत आहे त्यादृष्टीने विविध उपक्रम होत आहेत काही ग्रथालयात दुर्मिळ ग्रथाच्या ती असतात वाङ्मयीन व सामाजिक शास्त्राच्या सशोधनासाठी ग्रथालय हेच मुख्य महत्त्वाचे साधन आहे ही जाणीव ठेवून डॉ रगनाथन् इत्यादी लोकानी फार ागले काम केले आहे चागला ग्रथपाल शोध-विद्यार्थ्याला खूप साहाय्य करू शकतो ो त्याचा खरा मित्र होय

## शास्त्रीय पद्धती

या नंतर प्रत्यक्ष अभ्यासास सुरुवात करण्यापूर्वी विचारात घेण्यासारखा व संशोधनाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा विषय म्हणजे 'शास्त्रीय पद्धती' (सायंटिफिक मेथड) चा अभ्यास होय. शास्त्रीय पद्धती ही आज एक सर्वमान्य अशी पद्धती आहे. वैज्ञानिक ज्ञानाच्या विकासाबरोबर इतर क्षेत्रावर झालेल्या परिणामात शास्त्रीय पद्धतीचे स्थान फार मोठे आहे. तिचे स्वरूप मागील प्रकरणात निराळ्या संदर्भात पाहिले आहे. संशोधनाची ती पायाभूत भूमिका आहे. तिच्या योगानेच संशोधन (रीसर्च) व पांडित्य (स्कॉलरशिप) यामधील फरक स्पष्ट होऊ लागलेला आहे. साहजिकपणेच प्रत्येक क्षेत्रातल्या संशोधकास तिची माहिती असणे अवश्य आहे. त्याचबरोबर माहितीप्रमाणे तिच्या मर्यादांचीही जाणीव असावी.

या संबंधात असा एक महत्त्वाचा प्रश्न निर्माण होतो, की संशोधनात महत्त्व कशाला ? विशिष्ट प्रश्नाला, समस्येला (प्रॉब्लेम) की उपयोगात आणीत असलेल्या पद्धती (मेथड) ला? या प्रश्नाचे उत्तर संशोधनाच्या क्षेत्राप्रमाणे बदलू शकेल. प्रश्न (प्रॉब्लेम) हे महत्त्वाचे खरे पण त्याची सोडवणूक ज्या पद्धतीने संशोधक करू पाहतो ती पद्धतीही महत्त्वाची आहे. प्रत्यक्ष प्रश्नाच्या सोडवणुकीला पूरक म्हणून पद्धतीचे महत्त्व आहे हे खरे आहे. प्रत्येक क्षेत्रावर ते अवलंबून आहे.

इतिहास, राज्यशास्त्र, कायदा इत्यादींसारखी शास्त्रे आहेत ती साधनप्रधान (डॉक्युमेंटरी) आहेत. त्यात निष्कर्ष काढताना काही अंदाज बांधता येतात, पण समाजशास्त्र, मानसशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादींसारखी जी शास्त्रे आहेत त्यात माणसाच्या वागणुकीचा प्रतिक्रियांचा संबंध येतो. येथे प्रमुख सिद्धान्त, तत्त्वे, कल्पना यांची पूर्ण ओळख करून घेऊन सर्व काम अतिशय बारकाईने किंवा काटाकाळजीने करावे लागते. तेव्हा प्रश्न व पद्धत यात कशाला महत्त्व आहे हे प्रश्नावर, परिस्थितीवर व कित्येक वेळा स्वत: संशोधकावर अवलंबून राहील. संशोधनक्रियेत प्राथमिक व अव्वल महत्त्वाचा भाग म्हणजे विशिष्ट पद्धतीचा अवलंब हा होय.

निरनिराळ्या पद्धतींना पायाभूत असणारी पद्धती म्हणजे शास्त्रीय पद्धती होय. ही एक पद्धती आहे का वृत्ती आहे- हाही एक अतिशय महत्त्वाचा प्रश्न आहे. कारण सर्वत्र 'शास्त्रीय पद्धती' (सायंटिफिक मेथड) म्हणून प्रसिद्ध असणारी ही पद्धती एकस्वरूपी नाही. विषय, प्रश्न, संशोधनाचा अवस्थाकाल, ह्याप्रमाणे तिचे स्वरूप बदलते आहे. कित्येकांचे मते जितके प्रश्न तितक्या शास्त्रीय पद्धती. विज्ञानशास्त्राच्या बाबतीत ही पद्धती बरीच वापरली जाते. पण त्याच प्रकाराने वा त्याच स्वरूपात ती सामाजिक शास्त्रे अगर वाङ्मय यांना वापरता येणार नाही. प्रत्येक शास्त्रामधील

सत्यशोधना (अॅस्पेक्टस ऑफ रियालिटी) चे स्वरूप वेगळे असते यासाठी शास्त्रीय-पद्धतीचा अवलब वेगळेपणाने तारतम्यपूर्वक करावा लागतो प्रत्येक शास्त्राला 'शास्त्रीय पद्धती'चा आपला अर्थ व तिच्यावरचे आपले भाष्य प्रथम स्पष्ट करून मगच तिचा अवलब करणे जरूर आहे, इतकी ती पद्धती विविधताक्षम आहे शास्त्रापरत्वे तिचे स्वरूप कसे बदलते हे मागे दुसऱ्या प्रकरणात पाहिले आहे

## *काही सर्वसामान्य तत्वे*

असे असले तरी शास्त्रीय पद्धतीची काही व्यापक तत्त्वे वा वैशिष्ट्ये आज थोड्याफार प्रमाणात सर्वच क्षेत्रात मान्य झालेली आहेत तिच्या काही अवस्था (स्टेप्स) ह्याही सर्वमान्य झालेल्या आहेत

अगदी पहिले लक्षण म्हणजे प्रत्यक्ष माहिती (अॅक्चुअल फॅक्टस्) जमविण्यात सशोधक आपली व्यक्तिगत मते, आवडीनिवडी, इच्छा आकाक्षा याना स्थान देत नाही तसेच विशिष्ट उत्तर वा निष्कर्ष मनात बाळगून त्याच्या अनुषगाने सशोधन-करणे हे शास्त्रीय पद्धतीला अमान्य आहे एव प्रकारची वस्तुनिष्ठता ही सर्वप्रथम आवश्यक गोष्ट

एखाद्या प्रश्नाची जाणीव झाल्यानतर तो वेगळा काढून त्याची पाहणी सुरू होते शास्त्रीय शोधन हे एक प्रकारच्या साशकतेतून निर्माण होते, व त्या शकेचे किंवा शकाचे निराकरण झाले की हे सशोधन-कार्य तेवढ्यापुरते सपते तर्कशुद्ध आतरसगती, तसेच आपल्या भावनाना, कल्पनाना धक्का देणाऱ्या कितीही गोष्टी निदर्शनास आल्या तरी त्या जर तर्कशुद्ध असतील तर त्याचा स्वीकार करणे हे शास्त्रीय पद्धतीचे आणखी एक लक्षण कोपर्निकस, गॅलिलिओ यानी लोकसमजुतीना थारा न देता आपले निष्कर्ष धीटपणे माडले, हे त्याना या कारणामुळेच भूषणावह होय वाटेल त्या मार्गाचा अवलब करून विशिष्ट तत्त्व, नियम, इत्यादी सिद्ध करणे हे शास्त्रीय पद्धतीत बसत नाही कित्येकदा प्रत्यक्ष निष्कर्षापेक्षा किंवा निर्णया-पेक्षा ज्या पद्धतीने ते काढले गेले ती पद्धती किंवा प्रक्रिया अधिक महत्त्वाची मानली जाते प्रयत्नात काही चूक होणे शक्य आहे हे गृहितच धरले जाते अखड सावधता म्हणजेच सावधानता हे तिचे एक लक्षण होय मिळविलेली माहिती अतिशय कसोशीने पुन पुन पारखून घेणे, व सशयनिवृत्ती झाल्यावरच निर्णयाप्रत येणे, त्या अभावी निष्कर्ष पुढे ढकलणे हेही शास्त्रीय पद्धतीत बसते "The scientific method suspends judgement and its chief social condition is a widespread desire for truth" असे डॉ एम् एच् गोपाळ आपल्या 'Research Procedure in Social Sciences' या पुस्तकात म्हणतात ते खरे आहे

### शोधप्रक्रियेत अवलोकनाचे महत्त्व

संशोधनाच्या क्रियेत सर्व अवस्थात सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे अवलोकन (ऑब्झर्वेशन) ही होय शास्त्रीय संशोधनात निरीक्षक (ऑब्झर्वर) हाही फार महत्त्वाचा घटक आहे त्यामळे वित्येक विषयाच्या संशोधनात अभ्यासकाला तो योग्य 'निरीक्षक' व्हावा म्हणून विशिष्ट प्रशिक्षण दिले जाते वैज्ञानिक शोधप्रक्रियेत अवलोकनकाराच्या अवलोकनशक्ती (सेन्सेस) या यांत्रिक उपकरणाच्या वापराने परिवर्धित व प्रामाणित (स्टँडर्डाइज) केल्या जातात तरीही अवलोकनकाची चूक अगर नजरचूक शास्त्रीय संशोधनात विचारात घेतली जाते सामाजिक शास्त्राच्या अभ्यासात पुष्कळशी प्राथमिक माहिती व सामग्री जमविली जाते त्यानंतर प्रत्यक्ष प्रयोगाची आखणी सुरू होते या ठिकाणी अवलोकक हा तटस्थ असतो ज्यावेळी विशिष्ट गट हा अवलोकनासाठी घेतलेला असतो त्यावेळी प्राथमिक अवस्थेत तरी अवलोककाने वस्तुनिष्ठ वा अलिप्त राहावे लागते ती प्रास्ताविक माहिती जमविल्यानंतर संशोधकाचा दुसरा कार्यविभाग सुरु होतो या ठिकाणी तो तितका अलिप्त नसतो. पृथक्करण, जुळवाजुळव इत्यादी करताना त्याच्या अवलोकन-शक्तीची कसोटी लागते

अवलोकन हे दोन प्रकारचे असते पहिले मुक्त (अनकंट्रोल्ड) यात कोणतीही बंधने अवलोककावर नसतात शोधप्रक्रियेच्या प्राथमिक अवस्थेत हे अवलोकन महत्त्वाचे असते पण ही प्राथमिक अवस्था संपली, पृथक्करण पूर्ण झाले व वेगळ्या घटकाचा अभ्यास सुरु झाला, त्याचे परस्परसंबंध पाहणे सुरू झाले की अवलोकनाची दुसरी अवस्था सुरु होते या अवस्थेतले अवलोकन हे मुक्त नसते, तर ते नियंत्रित (कंट्रोल्ड) असते ही नियंत्रणे विशिष्ट परिस्थितीवर ताबा मिळविण्याच्या दृष्टीने आली असतील, किंवा अवलोकन क्षेत्र – विशिष्ट वर्ग (कॅटॅगरी), गट, इत्यादी जे काही असेल ते–विचारात घेऊन मर्यादित केलेले असेल प्रयोगशाळेतील प्रयोगात या नियंत्रणाचे विशेष प्रश्न निर्माण होत नाहीत सामाजिक क्षेत्रातील संशोधनात काही प्रश्न निर्माण होतात, त्याचा विचार वेळोवेळी अभ्यासकाने करावा लागतो. अवलोकनात काटेकोरपणा (प्रिसिजन) हा महत्त्वाचा आहे

अर्थात अवलोकनक्रियेतील अभ्यासकाचा अलिप्तपणा हा साधनाच्या जुळवाजुळवीपुरता व मांडणीपुरताच असतो एकदा प्राथमिक अवस्था संपली आणि संशोधन अधिकाधिक पुढे जाऊ लागले की, त्यातून संशोधकच मार्ग काढतो सारे निष्कर्ष हे त्याचेच असतात फक्त ते अधिकाधिक वस्तुनिष्ठ भूमिकेवरून काढलेले असतात हे निष्कर्ष काढण्यापूर्वी शोधकाला आणखी एका गोष्टीचा अवलंब करावा लागतो. त्यायोगेही अवलोकन अधिक नियंत्रित होते ही गोष्ट म्हणजे 'परिपाठ' शोध

## कल्पितपक्ष ( हायपॉथिसिस )*

शास्त्रीय पद्धतीत कल्पितपक्षास (हायपॉथिसिस) विशेष महत्त्वाचे स्थान आहे. विशिष्ट समस्येची जाणीव झाल्यानंतर तिच्या सोडवणुकीच्या दिशेने आपली विचारचक्रे हलू लागतात. परिस्थितीचे अवलोकन करून कल्पनाशक्तीच्या जोरावर समस्येच्या सोडवणुकीचा एखादा मार्ग सुचू लागतो. त्या दृष्टीने संशोधनास चालना मिळते व योग्य दिशा लाभते. कोणत्या गोष्टी जमवावयास हव्यात, कोणती दक्षता घ्यावयास हवी, हे समजून एकंदर पाठपुरावा (इन्व्हेस्टिगेशन) एक प्रकारची अर्थपूर्णता येते. गृहीतकृत्य किंवा कल्पितपक्ष जर प्रयोगांनी सिद्ध झाला तर त्याला सिद्धान्ताचे स्वरूप प्राप्त होते. जर पोषक पुरावे उपलब्ध झाले नाहीत तर तो कल्पितपक्ष त्याज्य मानावा लागतो. कल्पितपक्ष हा एक निश्चित उत्तर म्हणून निघालेला नसतो तर एक संभाव्य शक्यता म्हणून तो पुढे आलेला असतो. एखादे वेळी एखादा कल्पितपक्ष खोटा ठरला तरी संशोधन वाया गेले असे नव्हे. कोणत्याही क्षेत्राच्या संशोधनात असलेल्या गृहीतकृत्याचे महत्त्व अपरंपार मानावे लागते. डार्विनने प्रथम उत्क्रांतीची कल्पना एक गृहीतकृत्य म्हणून मांडली. तिचेच पुढे प्रसिद्ध सिद्धान्तात रूपांतर झाले. त्याच्या कल्पितपक्षाचे काही दुवे जुळेनात. त्यामुळे त्याला योग्य पुरावे शोधण्यास फार कष्ट पडले. गृहीतकृत्य समाजशास्त्रीय व वाङ्मयीन क्षेत्रातील संशोधनातही अत्यंत महत्त्वाचे आहे. सूक्ष्म अवलोकनाने प्रश्नाचे स्वरूप बरोबर हेरून योग्य प्रकारचे 'गृहीतकृत्य' शोधून काढणे हे संशोधनात विशेष नैपुण्य असल्याचे लक्षण आहे. शास्त्रीय पद्धतीचा तो एक अपरिहार्य भाग आहे.

'जगाचा इतिहास म्हणजे वर्गलढ्याचा इतिहास ' हे मार्क्सचे गृहीतकृत्यच होय. सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील ते असल्याने निरपवाद नाही हे खरे, पण त्याने समाजशास्त्रीय संशोधनाला नवी दिशा व गती प्राप्त करून दिलेली आहे. शास्त्राच्या अभ्यासात तर कल्पितपक्षास अतिरिक्त महत्त्व आहे. सूर्यमालेची उत्पत्ती कशी झाली हे स्पष्ट करणारे ' तेजोमेघीय गृहीत कृत्य ' (नेब्युलर हायपॉथिसिस) हे दीर्घकाल वास्तवपक्ष म्हणून गृहित धरले जात होते. भाषेच्या संशोधनात भाषा निर्माण कशी

---

*या शब्दाला अनेक मराठी प्रतिशब्द सुचविले गेले आहेत. प्रा. श्री. गो. हुल्याळकर आदी लेखक आपल्या 'वैज्ञानिकपद्धती' वरील पुस्तकात 'सिद्धान्तकल्पना' हा शब्द वापरतात. तर प्रा. श्री. ह. दीक्षित यांनी आपल्या पुस्तकात पुणे विद्यापीठाच्या परिभाषा-समितीने मान्य केलेला 'अभ्युपगम' हा शब्द त्याच्या जोडीला वापरला आहे. येथल्या विवेचनास अनुसरून गृहीतकृत्य व प्रा. बनहट्टींनी पूर्वी वापरलेला 'कल्पितपक्ष' हे शब्द योग्य वाटतात.

झाली हे सांगणाऱ्या ज्या महत्त्वाच्या उपपत्ती आहेत, त्या म्हणजे विविध कल्पितपक्षच होत रूसोचा म्हणून प्रसिद्ध असणारा 'सामाजिक करारा'चा (सोशल कॉन्ट्रॅक्ट) सिद्धान्त हा राज्यशास्त्राच्या क्षेत्रातील एक कल्पितपक्षच होय अशा रीतीने संशोधनाच्या प्रत्येक क्षेत्रात जवळ जवळ प्रत्येक अवस्थेत 'कल्पितपक्षा'ला वा हायपॉथिसिसला अतिशय महत्त्वाचे स्थान प्राप्त झालेले आहे कित्येक वेळा एका संशोधकाची कल्पना (कल्पितपक्ष) कित्येक दिवसानी निर्माण झालेला दुसरा संशोधक सिद्ध करण्याचा प्रयत्न करतो सूर्यापासून पृथ्वी निर्माण झाली असली पाहिजे ही कँट आदी तत्त्वज्ञाची कल्पना फ्रेंच शास्त्रज्ञ एम् प्लेटॉ याने प्रत्यक्ष प्रयोग करून पारखून पाहिली, तर लाप्लास या शास्त्रज्ञाने तिला गणिती पुरावे उपलब्ध करण्याचा प्रयत्न केला, आणि हर्शेलने तिला खगोलशास्त्रीय अवलोकनाची जोड दिली

कित्येक वेळा हे कल्पितपक्ष मर्यादित महत्त्वाचे असतात विशिष्ट मर्यादित एक साधन म्हणून त्याचा उपयोग केला जातो कल्पितपक्ष म्हणजे वस्तुनिष्ठतेचे करकंकण बांधलेल्या शास्त्रावर मानवी कल्पकतेने व प्रतिभेने मिळविलेला विजय होय कोणत्याही क्षेत्रातील संशोधनास अशा प्रकारचे कल्पितपक्ष हे पूरक म्हणून मान्यता पावलेले आहेत इतर प्रमाणानी व कसोट्यानी त्याचे वास्तवत्व सिद्ध झाले की तो सिद्धान्त होतो अन्यपक्षी तो तसाच राहतो खरा शोधक स्वत. सुचविलेला कल्पितपक्ष सिद्ध होईपर्यंत तो खरा आहे असे प्रतिपादण्याचा आग्रह धरीत नाही वाङमयीन संशोधनातही कित्येक वेळा कल्पितपक्ष स्वीकार्य ठरतो.

## पुनः परीक्षण ( व्हेरिफिकेशन )

शास्त्रीय कार्यपद्धतीचा तिसरा घटक म्हणजे पुन परीक्षण (व्हेरिफिकेशन) होय संशोधनाच्या सर्व अवस्थात ह्या गोष्टीचे स्थान फार मोठे आहे प्रत्येक पुरावा (एव्हिडन्स), प्रत्येक घटित (फॅक्ट), ही विलक्षण चिकित्सकतेने पुन पुन पाहून पारखून पक्की करून पुढे जावे लागते ज्या वेळी नवी माहिती उजेडात आणली जाते त्यावेळी निरनिराळ्या मार्गानी तिची विश्वसनीयता किंवा तिचा अव्वलपणा सिद्ध करणे हेच संशोधकाचे फार महत्त्वाचे कार्य असते. कित्येक रूढ कल्पनाही पुन पुन पारखून घ्याव्या लागतात संशोधनात आधाराचे जे महत्त्व आहे ते यामुळेच नवे ज्ञान निर्माण करता आले नाही तरी काही जुने गैरसमज जर निराधार ठरविता आले तरी ते काम कमी महत्त्वाचे आहे असे नव्हे. एस्. एन् स्मिथ म्हणतो —History of human thought is the record not of progress in discovery of truth, but our gradual emancipation of error " ('Present Situation in Philosophy')

व्यापक अशी माहिती जमविली जाते. तिच्या तपासणीसाठी निरनिराळी उपकरणे अस्तित्वात आली आहेत. परीक्षणाच्या निरनिराळ्या उपलब्ध पद्धतींचा अवलंब करणे हे जसे महत्त्वाचे असते, तसेच एखादा नवा मार्ग, नवे उपकरण, इत्यादी शोधून काढणेही कित्येक वेळा आवश्यक असते. उदा०, पाहणी-पद्धतीचे सर्वंकषत्व वाढविण्यासाठी गॅलप यांनी नवा पायंडा पाडून सर्वसामान्यांच्या मतांना पाहणी-पद्धतीत स्थान उपलब्ध करून दिले. ते त्यांच्याच ( गॅलप पोल ) नावाने ओळखले जाते. संशोधनाकडे वळण्यापूर्वी शास्त्रीय पद्धतीचा परिचय करून घेण्यात शिकाऊ संशोधकाने काही दिवस घालविले तर एकंदर संशोधनात बराच निश्चितपणा व पक्केपणा यावयास मदत होईल. संशोधन म्हणजे केवळ पांडित्य (स्कॉलरशिप) नव्हे, तर ती एक वृत्ती आहे, दृष्टी आहे, शिस्त आहे. तिचा आधार शास्त्रीय पद्धती हा आहे. पांडित्य हे तिला आवश्यक नसून फारतर पूरक होऊ शकेल.

## काही मर्यादा

शास्त्रीय पद्धतीचे थोडा पुनरुक्तीचा दोष पत्करूनही विस्ताराने येथे विवरण केले आहे. कारण तिचे महत्त्वच तसे आहे. पण तिच्या काही मर्यादा बहुतेक विचारवंतांनी मान्य केल्या आहेत. वाङ्मयाच्या क्षेत्रात तसेच सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात जी घटिते (फॅक्ट्स) जमा करावी लागतात त्यांच्या ठायी शास्त्राची निश्चितता नसते. त्यामुळे ही पद्धती वाङ्मयासाठी समर्याद वापरावी लागेल. तथापि वाङ्मयीन संशोधनातला पुष्कळसा भाग सामाजिक शास्त्रांना जवळचा आहे. अशा वेळी ह्या ठिकाणी या पद्धतीचा अवलंब करावा लागेल. उदा०, एखाद्या ग्रंथाची जुनी प्रत पारखून घेणे, एखाद्या लेखकाच्या कालाविषयी व चरित्राविषयी उपलब्ध माहिती तपासून घेणे इत्यादी सारख्या प्रश्नात ही पद्धती उपयोगी ठरेल. पण जेथे तत्त्वज्ञान, मानवी मूल्ये, मानवी वर्तन यांचा संबंध आहे तेथे हिच्या मर्यादा जाणवतील. तथापि 'शास्त्रीय पद्धती' ही वर म्हटल्याप्रमाणे एक पद्धती नसून वृत्तीही आहे, हे जर लक्षात घेतले तर संशोधनाच्या कोणत्याही क्षेत्रात तिचे महत्त्व अपरंपार आहे असे मानावे लागेल.

## संशोधनाचे प्रकार

शास्त्रीय पद्धतीचा परिचय करून घेतल्यानंतर संशोधनाची पुढची पायरी म्हणजे प्रत्यक्ष कामास सुरवात करणे ही होय. विषयाची निवड करतानाच संशोधनाचा प्रकार पण ठरतो. विषयाची (प्रॉब्लेम) व प्रकाराची निवड आपल्या आवडीनिवडीप्रमाणे, प्रवृत्तीप्रमाणे करावी. काहींची वृत्ती कोणत्याही संशोधनास

साजेशी असते काहींची विशिष्ट प्रकारच्या सशोधनास असते आपल्या विचाराची अभ्यासाची तयारी, कल इ लक्षात घेऊन विषय ठरवावा सशोधन सामान्यत तीन प्रकारचे असते पहिला प्रकार म्हणजे अगदी नवीन माहिती उजेडात आणणे, 'स शोध' (री सर्च) या शब्दामागील भूमिका हीच आहे इतिहासामधील एखादा नवा पुरावा, नवी माहिती, एखाद्या ग्रथाची अनुपलब्ध प्रत प्रकाशात आणणे इत्यादी उदाहरणे सामाजिक वाङमयीन क्षेत्रातील होत विज्ञानाच्या क्षेत्रातील सशोधन याच मार्गावर आधारलेले असते म्हणजे तेथे प्रयोगाच्या आधाराने नवनवीन माहिती उजेडात आणून निरनिराळया कसोट्यानी तिचा अव्वलपणा प्रतिपादिला जातो

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातही बरेच सशोधन नवीन माहिती हुडकण्यावर आधारलेले असते विशिष्ट हेतूने विशिष्ट गोष्टींची पाहणी करणे (रिव्ह्यू), तसेच प्रश्नावली, मुलाखती इत्यादी साधनाचा अवलब करून नवी माहिती उजेडात आणली जाते ही उदाहरणे ह्या प्रकाराची होत

सशोधनाचा दुसरा प्रकार म्हणजे अगोदर उपलब्ध झालेली माहिती उपयोगात आणून तिची सगती नव्याने लावणे, नवा आशय, अर्थ शोधण्याचा प्रयत्न करणे, नवे स्पष्टीकरण (इटरप्रिटेशन) नवे सबध (रिलेशनशिप) प्रस्थापित करणे इत्यादी वाङ्मयीन व सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील बरेचसे सशोधन ह्या प्रकारचे असते अशा प्रकारे आतापर्यंत उपेक्षित, दुर्लक्षित, विस्मृत, इत्यादी प्रकारच्या गोष्टींवर नवा प्रकाश पाडलेला आहे हे त्या विषयातील तोपर्यंत झालल्या सशोधनाच्या आधाराने सिद्ध करणे ही एक मोठी जबाबदारी सशोधकावर असते एखाद्याने घेतलेला विषय पुन घ्यावयाचा असेल तर ह्या दृष्टीने विचार करून विशेष तयारी करणे आवश्यक असते

सशोधनाचा तिसरा प्रकार म्हणजे कोणत्यातरी तात्त्विक प्रश्नाचे परीक्षण-छाननी, तपासणी इत्यादी करून नवा सिद्धान्त प्रस्थापित करणे हे अतिशय उच्च प्रकारचे सशोधन होय अनेक वर्षे कार्य केरयानतर चिंतनाने जी एक प्रकारची प्रगल्भता येते तिचे हे फळ होय न्यूटन, आइन्स्टाईन इत्यादींचे शोध, लो टिळकाचा आर्यांविषयीचा विशिष्ट सिद्धान्त, डार्विनचा प्रसिद्ध सिद्धान्त, तसेच मार्क्सची अनिश्चित मूल्याची उपपत्ती इत्यादी उदाहरणे या प्रकाराची होत

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रात विशिष्ट सशोधन-पद्धतीचा अवलब करून नवी माहिती जमा केलेली असते त्याला अवलबन सशोधन (अॅप्लाईड रिसर्च) असे म्हणतात सशोधनाचे हे स्थल मानाने प्रकार आहेत व ते बरेचसे तात्त्विक स्वरूपाचे आहेत सामान्यत प्रत्येक विषयात या प्रत्येक प्रकाराचा थोडा थोडा अश असतोच

पण जास्त भर कोणत्या तरी एका प्रकारावर दिलेला असतो. हे सर्व लक्षात घरून सशोधकाने आपल्या कामाची आखणी करावी.

## प्रत्यक्ष तयारीच्या दृष्टीने करावयाच्या गोष्टी

**भाग १ : साधनांचे संकलन**

(१) विषयाच्या माडणीच्या विविध पद्धती.
(२) पार्श्व-वाचन (बॅकग्राऊड रीडिंग).
(३) तात्पुरती साधनाची आखणी करणे (टेंटेटिव्ह बिब्लिऑग्रॅफी).
(४) प्राथमिक रूपरेखा ठरविणे.
(५) वाचन व टिप्पणी घेणे (नोट्स टेकिंग).
(६) टीका-टिप्पणीची जुळवाजुळव (ऑर्गनायझेशन) करणे.

**भाग २ : लेखन-प्रक्रिया**

(१) विषयाची तार्विक माडणी, युक्तिवाद.
(२) रूपरेखा निश्चित करणे.
(३) शेवटचा हात फिरविणे.
(४) अंतिम साधनग्रंथाची यादी करणे
(५) अंतिम लेखनाची पूर्वतयारी

**.भाग ३ : लेखन-सिद्धी**

(१) अनुक्रमणिका तसेच प्रत्यक्ष प्रत तयार करणे.
(२) आधार, अवतरणे, तळटीपा, साधनग्रंथ, तक्ते, नकाशे, कोष्टके इत्यादी.
(३) भाषा व शब्द-विज्ञान.
(४) कागद, लेखन सकेत.

## विवेचनाच्या भिन्न पद्धती : वर्णन-पद्धती

विषयाची निवड करताना स्वीकारावयाच्या पद्धती-विषयक धोरणाचा सबध येतो. म्हणजे विषयाचे स्वरूप निश्चित झाल्यावर मग अवलबावयाच्या पद्धतीचे स्वरूप ठरते. अगदी पहिली व काही प्रमाणात प्राथमिक स्वरूपाची पद्धती म्हणजे वर्णनपद्धती (डिस्क्रिप्टिव्ह मेथड). नैसर्गिक व विज्ञानशास्त्राच्या अभ्यासात व सशोधनात ह्या पद्धतीचा प्रामुख्याने अवलब करावा लागतो कारण जे नवे ज्ञान उजेडात आणावयाचे असते ते स्पष्ट करण्यात निरनिराळ्या अवस्थात ह्याच पद्धतीचा वापर

करावा लागतो विविध प्रकारची उपकरणी, कोणत्या कामासाठी त्याचा वापर केला व तो कसा केला, तसेच हे सर्व कसे पारखून घेतले, ह्या गोष्टी स्पष्ट करण्य प्रामुख्याने ह्याच वर्णनात्मक पद्धतीचा उपयोग होतो

विज्ञानशास्त्राकडून सामाजिक शास्त्राकडे आलो तरी या पद्धतीचा वा चुकतो असे नव्हे एखाद्या प्रश्नाची पाहणी करताना त्याच्याशी सबद्ध अशा प्रकार. माहिती जमविताना हीच पद्धती अवलबावी लागते निरनिराळ्या समाज-घटकाची पाहणी करणे इत्यादी गोष्टीत ह्याच पद्धतीचे महत्त्व मान्य करावे लागते वाङ्मयाच्या क्षेत्रातही ती अस्वीकार्य आहे असे म्हणता येत नाही विशेषत ज्या ठिकाणी वस्तुरूप साधने (फॅक्चुअल डाटा) असतील त्या ठिकाणी ह्याच पद्धतीचा अवलब करून त्याचे मूल्यमापन करावे लागते साहजिकपणेच कोणत्याही प्रकारच्या सशोधनास अत्यत उपयुक्त व प्राथमिक महत्त्वाची अशी ही पद्धती आहे आपण घेतलेला विषय (प्रॉब्लेम) सशोधनासाठी का घेतला, आतापर्यंत त्या क्षेत्रात कोणी कोणी काय व कसे कसे काम केले, आपल्या सशोधनाची दिशा कोणती हे सारे वर्णन-पद्धतीच्या अवलबनात बसते

## काही धोरणे

या पद्धतीचा अवलब करताना काही धोरणे पाळणे जरूर आहे पहिले म्हणज आपला विषय वस्तुनिष्ठ भूमिकेतून आपणास माडता आला पाहिजे त्यात अनुकूल प्रतिकूल युक्तिवादाचा (आर्ग्युमेंट) भाग नसावा, ही दक्षता घेणे जरूर आहे दुसरे, या पद्धतीचा अवलब करून जी पूर्वमाहिती द्यावयाची असेल ती अतिशय विश्वसनीय, बिनचूक, वस्तुनिष्ठ स्वरूपाची असावी आवश्यक असेल तेथे योग्य पुरावे, आधार इत्यादी देणे तिचे वस्तुनिष्ठ परीक्षण करून आपली भूमिका विशद करण्यात यावी तिसरे अग म्हणजे माहिती देताना तुलनात्मक भूमिका स्वीकारून आपली भूमिका साधकबाधक व सागोपाग विवचकाची आहे हे स्पष्ट केलेले असावे सशोधनाच्या व ज्ञानाच्या क्षेत्रात अतिम असे काहीच नसल्याने आपण आपल्या मताची माडणी करताना आपली साधने, आपले साहित्य, दृष्टिकोन याची स्पष्टता देऊन ह्रीही तपासून पाहण्यासाठी विशिष्ट पद्धतीचा उल्लेखही करावा

या पद्धतीच्या काही मर्यादा पण आहेत, त्याची जाणीव ठेवणे जरूर आहे पहिली म्हणजे या पद्धतीच्या अनिरिक्त अवलबनाने वर्णनालाच व बाह्य माहितीलाच अधिक प्राधान्य येते व दुसरे म्हणजे सर्वसामान्य स्वरूपाचे (अॅव्हरेज) निष्कर्ष काढले जातात तेव्हा ही एक पद्धती आहे, साध्य नव्हे हे लक्षात घेणे जरूर आहे

## ऐतिहासिक पद्धती

वर्णनात्मक पद्धतीइतकीच सशोधनाच्या क्षेत्रात महत्त्व पावलेली पद्धती म्हणजे ऐतिहासिक पद्धती होय कोणत्याही गोष्टीचा इतिहास पाहणे हा मानवी मनाचा एक मोठा आवडता व उपयुक्त छद आहे कोणताही विषय (प्रॉब्लेम) घेतला तरी त्याला काही ऐतिहासिक बाजू परपरा इत्यादी असते त्यामुळे सशोधनाच्या क्षेत्रात ऐतिहासिक पद्धतीला फार मोठे स्थान आहे किंबहुना सशोधन म्हणजे ऐतिहासिक सशोधन म्हणजे इतिहासकालीन चाली, परपरा, व्यक्ती, वाङमय, . इत्यादीचे सशोधन असा समज आपल्याकडे जो रूढ झालेला आहे त्याचे कारणही हेच आहे ऐतिहासिक दृष्टीमुळे विषयाला, विषय माडणीला, एक प्रकारची व्यापकता येते त्याचे एक वेगळे रूपदर्शन (पर्स्पेक्टिव्ह) घडते त्यामुळे वस्तू, व्यक्ती, घटना, सगती, इत्यादींना वेगळेच परिमाण लाभते या कारणानी सशोधन-क्षेत्रात ह्या पद्धतीला असाधारण मान आहे

असे असले तरी ह्या पद्धतीचा अवलब करणे सोपे आहे असे नव्हे ही पद्धती अवलबिणाराला काही निश्चित अशी पथ्ये पाळावी लागतात ते सर्वांनाच जमते असे नाही अनुभवानेच ते जमते साधने जमविणे, त्याचे महत्त्व ठरविणे हे कठिण असते उदा०, सामान्य सशोधकाला ऐतिहासिक कालातले जीवन हे आदर्श, सुखी, सतृप्त, असे वाटते पुष्कळ इतिहासकाराची अशी वृत्ती असते, तर सामान्याचे काय ! कित्येकदा इतिहासातील एकाच प्रकारच्या गोष्टीला महत्त्व दिले जाते दुसऱ्या गोष्टी त्या प्रमाणात उपेक्षिल्या किंवा दुर्लक्षिल्या जातात उदा०, प्राचीन मराठी सताच्या जीवनविवेचनात त्याच्या तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासच अधिक महत्त्व दिले जाते त्या तत्त्वज्ञानाशिवाय त्यानी स्वत च्या वागणुकीची काही धोरणे ठरविली होती इत्यादी गोष्टीकडे सामान्यत दुर्लक्ष होते एकागीपणाचा त्याग करणे हे पहिले पथ्य आहे

एतिहासिक दृष्टीचा स्वीकार करणाराला आणखी एक गोष्ट प्रयत्नाने साध्य करावी लागते इतिहासाच्या जजाळातून पृथक्करणात्मक भूमिकेचा अवलब करून आपणांस जी माहिती आवश्यक आहे ती बरोबर शोधून काढणे ही एक होय अशा रीतीने एखादी माहिती वेगळी काढल्यानतर पुन सकलनात्मक दृष्टीचा स्वीकार करून योग्य नव्या स्वरूपात ती साकार करावी लागते अशा प्रकार पृथक्करणात्मक (ॲनॅलिटिकल) व सश्लेषणात्मक (सिथेटिक) अशा दोन्ही प्रकारच्या मानवी शक्तीचा बरोबर उपयोग करून घेण्याचे कसब हे इतिहासनिष्ठ दृष्टीचा वा पद्धतीचा अवलब करणाराला हस्तगत करावे लागते

स्वत च्या आवडीनिवडी, मते ही बाजूला ठेवून वस्तुनिष्ठ भूमिका पत्करणे हा सगळ्याच सशोधनाप्रमाणे ह्याही पद्धतीचा गाभा आहे कित्येक नामवत इतिहासकाराना ते जमत नाही प्रचारासाठी इतिहासाकडे वळणाराची सख्या फार मोठी आहे आपणाला अनुकूल अशा प्रकारचे अर्थ हे लोक काढीत असतात उदा०, रामदासाना शिवाजीमहाराजाचा राजकीय मार्गदर्शक ठरविले जाते इतिहासातर्गत माहिती, साधने याची विश्वसनीयता कठोरपणे पारखून घ्यावी लागते स्वत च्या क्षेत्राची चागली माहिती या पद्धतीचा अवलब करणाराला असावी लागते याउलट स्वत च्या मर्यादाचीही योग्य ती जाणीव असावी लागते

पण एवढ्या दक्षता घेतल्या तर ही पद्धती कोणत्याही क्षेत्रातील सशोधनास अतिशय उपयुक्त आहे तुलनात्मक रीतीने ती सोपी वाटते म्हणून बहुसख्य अभ्यासकाचा तिच्याकडे कल असतो पण तिच्या अवलबनात परिपूर्णता यावयाची असेल तर ही पथ्ये आवश्यक आहेत

त्याचबरोबर या पद्धतीच्या काही मर्यादा पण लक्षात घेणे जरूर आहे पहिली गोष्ट म्हणजे इतिहासकालीन माहिती मिळविणे अत्यत दुघट होते, व मिळते ती अत्यत अपुरी असते उलट कित्येक वेळा मिळणारी माहिती ही इतकी विपुल व विविधस्वरूपी असते की मन दडपून जाते उदा०, निरनिराळ्या अहवालातून व नियतकालिकामधून उपलब्ध होणारी माहिती, निरनिराळ्या खात्याची सरकारी दप्तरे (रेकॉर्ड्स) इ तिची जुळणी करणे, विभागणी करणे हे काम अत्यत जिकीरीचे असते सवसामान्य सशोधकाच्या ठिकाणी एवढी सहनशीलता, एवढी चिकाटी असतेच असे नाही जदुनाथ सरकार अथवा रियासतकार सरदेसाई याचे मोठेपण या सदर्भात प्रत्ययास येते

कित्येक वेळा मिळालेली माहिती व्यक्तिगत स्वरूपाची असते ती एकाच भागावर प्रकाश पाडते तिच्या आधारे सर्व चित्र पूर्णपणे पुरे उभे करता येत नाही [उदा०, विविध प्रवाश्यानी लिहिलेले अनुभव ] या व इतर अनेक मर्यादा आहेत त्याची जाणीव असणे हे जरूर आहेच, पण ती उणीव भरून काढण्यासाठी सशोधकाजवळ उत्तुग कल्पनाशक्ती असावी लागते तिच्या आधारे एखादे सत्य प्रकाशात आणाव लागते त्याचबरोबर ह्या कल्पनाशक्तीला स्वैरही सोडता येत नाही या सर्व मर्यादा लक्षात घेऊनही ऐतिहासिक पद्धतीचे महत्त्व शिल्लक राहतेच

### विस्तरण पद्धती

ऐतिहासिक पद्धतीप्रमाणे अलीकडे विस्तरण पद्धतीचाही काही ठिकाणी स्वीकार केला जातो विविध प्रदेशात, देशात, भूभागात एखाद्या गोष्टीचे, सस्थेचे

स्वरूप कसे आहे, काम कसे चालते हे पाहणे या पद्धतीत करणे हिला विस्तरणपद्धती (स्पेसियल डेव्हलपमेंट मेथड) असे म्हटले जाते उदा०, लग्नपद्धतीत एखाद्या समाजात कसे फरक होत आलेले आहेत हा ऐतिहासिक पद्धतीच्या अवलंबनाचा भाग, तर विविध समाजात विविध प्रकारच्या विवाहपद्धती कशा अस्तित्वात आहेत हे पाहणे हा विस्तरण-पद्धतीचा (स्पेसियल मेथडचा) अवलंब म्हणता येईल कित्येकदा तुलनेसाठी ह्या पद्धतीचा अवलंब करावा लागतो

## पृथक्करण पद्धती

ह्या विविध पद्धतींना पायाभूत असणारी, संशोधनात प्रमाणभूत मानली जाणारी, शास्त्रीय दृष्टीशी एकरूप झालेली पद्धती म्हणजे पृथक्करण पद्धती (ॲनॅलिटिकल मेथड) होय संशोधनाचा पाया पृथक्करण होय संशोधन म्हणजे ह्या पृथक्करण पद्धतीच्या अवलंबनाचे मूर्त स्वरूप आहे हे पृथक्करण विविध प्रकारचे असते ते योजण्यात संशोधकाच्या विविध गुणांची कसोटी लागते अवलोकन, चिकित्सकता, सावधानता, ऐतिहासिकता, वस्तुनिष्ठता, इ. सर्व गुणांनी संस्कारित झालेली पृथक्करणात्मक पद्धती हेच संशोधनाचे मूलाधार स्वरूपी हत्यार आहे ते आत्मसात करून घेण्याचा व सदैव तयार ठेवण्याचा प्रयत्न करणे हे संशोधनातले मूळ सूत्र होय

## पार्श्व-वाचन

संशोधनासाठी उपयुक्त ठरणाऱ्या विविध पद्धतींचा व दृष्टिकोनांचा परिचय करून घेतल्यानंतरची पुढची पायरी म्हणजे प्रबंध-प्रबंधाची पूर्व सिद्धता किंवा प्राथमिक तयारी ही होय तिच्यासाठी अत्यावश्यक गोष्ट म्हणजे पार्श्ववाचन (बॅकग्राऊंड रीडिंग) संशोधनासाठी विषयाची निवड केल्यानंतर पुढच्या तयारीसाठी लागणे हे संशोधकाचे कर्तव्य ठरते विषय निवडल्यानंतर त्या क्षेत्रात आपण काही विशेष पात्रता मिळवू इच्छितो, त्या दृष्टीने पावले टाकणे आवश्यक ठरते. जर अगोदर आपली तयारी झाली असेल तर त्या विषयातील ज्या विशिष्ट भागावर अधिक लक्ष केंद्रित करणार आहो त्या तयारीला लागणे आवश्यक ठरते आपल्या अगोदरच्या व्यासंगाप्रमाणे, तयारीप्रमाणे विषयाचे व पार्श्ववाचनाचे स्वरूप ठरते उदा०, एखादा भाषाशास्त्रीय किंवा व्याकरणाचा विषय आपण घेतला तर त्या शास्त्राच्या प्राथमिक वाचनापासून आपणास सुरुवात करावी लागेल पण व्याकरण किंवा भाषाशास्त्रात अगोदरच गती प्राप्त झाली असेल तर एखादा अधिक सूक्ष्म असा विषय घेऊन वाचनास सुरुवात करता येईल जातिसंस्थेचे स्वरूप पाहणे

ह्या विषय असेल तर सुरवात कोठून करायची हे स्वतःच्या अभ्यासावर अव असणार. समाजशास्त्राचा अभ्यास असेल तर समाजशास्त्रावरील प्राथमिक पुस पासून अभ्यासास सुरुवात करावी लागेल.

कोणतीही अवस्था असो, सगळ्यात सोपा मार्ग म्हणजे सामान्यतः f ठरल्यानतर प्रमाणित अशा विश्वकोशाचा आधार घेणे. सर्वसामान्य विश्वकोश अवलंब संपल्यानतर विशिष्ट विषयाना वाहिलेले कोश असतात. उदा०, प्राथ स्वरूपाचा कोश म्हणजे 'ब्रिटानिका विश्वकोश'. त्यानतर सामाजिक श वाङ्मय, कला, तत्त्वज्ञान, वैज्ञानिक शास्त्रे, इतिहास, समाजशास्त्र इ. विषय वाहिलेले असे अनेक विश्वकोश उपलब्ध आहेत. काही साधनकोशही आहेत. त उपयोग करणे त्यामधून घेतलेल्या माहितीमुळे विषयासबधीची आपली कल वा भूमिका अधिक स्पष्ट, मूर्त होईल व त्या क्षेत्रात अगोदर झालेल्या कामाच कल्पना येईल. त्यानतर पार्श्ववाचनासाठी त्याविषयासबधी प्रामाणित अशी क पुस्तके पुन वाचावयास हरकत नाही. विद्यार्थिदशेत अभ्यासाच्या वेळी अ पाठ्यपुस्तके वाचलेली असतात पण त्यावेळी त्याचे महत्त्व वा वैशिष्ट्य ल येत नाही. पण ह्यावेळी विशिष्ट दृष्टीने पाठ्यपुस्तके वाचली असता पु फायदा होतो चागले पाठ्यपुस्तक हे एखाद्या प्रमाणभूत ग्रथाइतके महत्त्वाचे अ या दोन्ही साधनातून आपल्याला एक सदर्भग्रथाची यादी मिळू शकेल. अ प्रकारे वाचलेल्या माहित्याने आपली पार्श्वभूमी तयार होईल व विषयाबाब एक चित्र मनाने आपल्या डोक्यात तयार होईल आपण पदवीसाठी प्रबध त करणार असलो तर त्या पदवीसाठी त्या विषयावर पूर्वी लिहिलेल्या कि प्रकाशित झालेल्या पदवी–प्रबधाचाही उल्लेख या सदर्भात करणे योग्य होईल.

*प्राथमिक साधन-ग्रंथ व प्राथमिक रूपरेषा*

या सर्वामधून आपल्याला प्राथमिक महत्त्वाची अशी साधनग्रथमालि (टेंटेटिव्ह बिब्लिऑग्रॅफी) तयार करता येईल. पूर्वसिद्धतेची ही दुसरी अवस्था. साधनग्रथ यादीतील काही ग्रथाचा काही भाग वाचल्यावर विषयासबधी काय म्हणा ह्या बाबतचे विचार निश्चित व्हावयास लागतील, व यातूनच पुढचे पाऊल पडते म्हणजे प्रारभिक स्वरूपाची अशी रूपरेषा तयार करण्याच्या दिशेने. वाचलेल लेखाच्या वा ग्रथाच्या आधाराने मागे विषय-निवडीच्या सदर्भात आलेल्या उल्लेखान विषयाचे उद्दिष्ट, कागदावर माडता येईल. त्यानतर त्याच्या आधाराने पुढ मार्ग निश्चित होईल. निरनिराळ्या प्रकरणाची कल्पना स्थूल मानाने पुढे उ राहील. त्या त्या प्रकरणात कोणत्या पद्धतीचा अवलब करावयाचा, त्यासा

कोणती पुस्तके वाचावयाची इ० ठरेल व ते सारे कागदावर लिहून काढणे योग्य होईल पुष्कळ विचारानंतर आपली प्रास्ताविक रूपरेषा तयार होईल या अवस्थेत आपला मार्गदर्शक आपल्या भेटीची अपेक्षा करीत असेल त्याच्याशी चर्चा करून पुढची पावले टाकता येतील प्रबंधलेखन हा एक सोद्देश लेखनाचा प्रकार असल्याने प्रत्येक गोष्टीबाबतचे असे विशिष्ट कारण लेखकाजवळ तयार हवे उदा०, प्रास्ताविक रूपरेखा कोणत्या उद्देशाने तयार केली ? विवेचनातले प्रमुख टप्पे कोणते ? प्रत्येक अवस्थेत कोणत्या आधारग्रंथाचा उपयोग करणार ? मागे आलेल्या विवेचनानुसार प्रबंधाचे स्वरूप कशा प्रकारचे असणार ? वर्णनप्रधान ? माहितीप्रधान ? ऐतिहासिक समालोचनपर ? का पृथक्करणप्रधान ? संख्याशास्त्रीय पद्धतीचा अवलंब करणार का ? किती ? या सर्वांचे मिश्रण येणे अपरिहार्य आहे काय ? अवलंबिलेल्या पद्धतीतही आपले कोणते वैशिष्ट्य राहणार आहे ? या प्रश्नांची उत्तरे आपणाजवळ तयार हवीत आवश्यक तेथे त्याचा खुलासाही करावा

## एक सूचना

या पार्श्ववाचनात आणखी काही प्रकारच्या पुस्तकांचा उल्लेख करणे आवश्यक आहे संशोधन-पद्धतीवरील काही महत्त्वाची पुस्तके वाचून काढावीत आपल्या विषयासंबंधी अशी पुस्तके असतील तर फारच चांगले, पण तशी उपलब्ध नसतील तरी इतर विषयातील संशोधनपद्धतीवरील पुस्तके वाचावयास हरकत नाही कारण आतापर्यंतच्या विवेचनावरून हे स्पष्ट होईल की, विषय कोणताही असला तरी संशोधनाची मूलतत्त्वे सामान्यत सारखी आहेत तसेच संशोधन पद्धतीवरील पुस्तकाबरोबर वैज्ञानिक व शास्त्रीय विवेचन पद्धतीवरील काही पुस्तकांचेही वाचन उपयुक्त होते जसजसे आपण खोलात जातो तसतसे त्या विषयाचे स्वरूप व्यापक होऊ लागते आणि ही जाणीव वेगळीच प्रेरणा देते अणुविषयक (ॲटॉमिक) संशोधन हे पदार्थविज्ञान व रसायन या दोहोंत वसते, हा उल्लेख मागे या प्रबंधात एके ठिकाणी आला आहेच आज विज्ञानशास्त्रे व तत्त्वज्ञान यांच्या सीमारेषा पुसट होत आहेत उच्च संशोधनात प्रज्ञा किंवा प्रतिभा असते विषय हा नामरूप बनतो *बर्ट्रांड रसेलसारखा गणित व पदार्थविज्ञानशास्त्राचा प्राध्यापक आज एक श्रेष्ठ तत्त्वज्ञ* म्हणून ख्यात आहे त्याशिवाय शिक्षण, समाजशास्त्र, राज्यशास्त्र, इतिहास यावर तो एक अधिकारी (ॲथॉरिटी) आहे

अशा प्रकारे विषयाच्या निवडीनंतर प्राथमिक वाचनाच्या व संदर्भग्रंथाच्या यादीच्या आधारे प्राथमिक स्वरूपाची रूपरेषा तयार झाल्यानंतरचा महत्त्वाचा भाग म्हणजे निरनिराळी साधने व त्यांची पाहणी हा होय यात पहिला क्रम ग्रंथाचा

लागतो ह्या ग्रंथाच्या आधारेच आपल्या क्षेत्रात कोणी कोणी काम केलेले आहे, हे कळते. नामवंताची माहिती ही अतिशय महत्त्वाची व प्राथमिक जरुरी होय

## ग्रंथ-वाचन : काही सूचना

पुस्तकाचे वाचन कसे करायचे हे शोध-प्रबंध लिहावयास लागल्यानतरच पुष्कळांना कळते खरे विद्वान किंवा विचारवंत पुस्तके अतिशय बारकाईने वाचतात एक पुस्तक तीनदा वाचून झाल्याशिवाय ते वाचून झाले असे न्यायमूर्ती रानडे मानीत नसत आचार्य जावडेकराच्या पुस्तकावर सर्वत्र खुणा, रेघा, प्रश्नचिन्हे इतर चिन्हे व मते असत पुस्तक वाचताना प्रथम पाहावयाची गोष्ट म्हणजे ते कितपत विश्वसनीय (डिपेंडेबल) आहे हे पाहणे जर एखादी चूक किंवा विसगती आढळली तर त्या प्रमाणात विश्वसनीयता कमी होते दुसरी गोष्ट म्हणजे ग्रंथ अद्ययावत आहे की नाही हे पाहणे अर्थात हा काही पुस्तकाच्या बाबतीतला मोठा मुद्दा असू शकत नाही कित्येक ग्रंथ जुने असले तरी ते प्रमाण म्हणून मानले जातात याचे कारण त्याचे ग्रथकार मान्यवर ग्रंथकाराचे ग्रंथ अर्वाचीन अधिक विश्वसनीय होत तेही पण पाहून पारखून घ्यावे लागतात

पुस्तकाचे बारकाईने अवलोकन करावे कोणताही महत्त्वाचा भाग नजरेतून सुटू नये उदा०, पुढील व मागील मलपृष्ठावरील मजकूर हा कित्येक वेळा भडक असला तरी पुस्तकाचे वैशिष्टय कळण्यास त्याची मदत होते नतर प्रस्तावना लेखकाची अगर अन्य कोणाची असली तरी ती महत्त्वाची असते लेखकाची भूमिका, योजना, दृष्टिकोन इ ची कल्पना ह्या प्रस्तावनेवरुन येते त्यानतर पुस्तकाच्या शेवटी असणाऱ्या सूची, व परिशिष्टे यावरून नजर फिरवावी ह्याच्यावरूनही पुस्तकाचे वेगळेपण लक्षात येते तसेच तळटीपाचे पण मधून मधून अवलोकन करावे कोणते ग्रंथ कशाकरिता आधारास घेतले आहेत याची कल्पना त्यावरुन येऊ शकते साधनग्रंथाची यादी ही पण आपणास त्या पुस्तकाची वैशिष्टये सागू शकेल हे सारे पाहात असता पुढले मागले सदर्भ बारकाईने पाहून मधून मधून पडताळून पाहावे विसगती निदर्शनास आल्यास टिपून ठेवावी आपलाही ग्रंथ (पुढेमागे) इतक्या बारकाईने वाचला जाणार आहे याची जाण येऊन अचानकपणे आपल्या मनावर चागले सस्कार होतात

याशिवाय जी महत्त्वाची साधने आहेत त्याचा उल्लेख यापूर्वीच आलेला आहे, पुनरुक्तीची जरुरी नाही वृत्तपत्रे, हस्तलिखिते, इतर कागदपत्रे (नाणी, चित्रे इ) या साधनाचे परीक्षण झाल्यावरोवर आपल्या माहितीसाठी व उल्लेखासाठी त्याचे

थोडक्यात वर्णन लिहून ठेवावे. वृत्तपत्राचे वर्ष, अंक त्याप्रमाणे विविध अहवालाचे कर्ते, वर्ष प्रकाशक इ. माहिती जमवून ठेवावी.

### *विश्वसनीयतेची गमके*

माहितीची विश्वसनीयता कशी अजमावावी यासंबंधी काही संकेत आहेत. या विषयावरील पुस्तकात एक यादीच दिलेली असते * ती या दृष्टीने उपयुक्त आहे. विश्वसनीयतेचे मुख्य गमक म्हणजे साधनाच्या उत्पत्तीस्थानाला आपण जितके जवळ तितके ते साधन अधिक उपयुक्त होय. विश्वसनीयतेची प्रमुख गमके येथे दिली आहेत. त्याची विश्वसनीयता पुढील क्रमाने मानण्याची प्रथा आहे

१. प्रयोग सिद्धता (एक्स्पेरिमेंटेशन).
२. प्राथमिक पाहणी; मुलाखत वा प्रश्नावलीस उत्तर.
३. डॉक्टोरेट पदवीसाठी लिहिलेले प्रबंध, व्यावसायिक विषयाशी संबद्ध अशा नियतकालिकांमधील लेख.
४. पत्रे, डायऱ्या, आत्मवृत्ते इ.
५. कला व साहित्य या क्षेत्रातील मौलिक ग्रंथ व ललित साहित्य.
६. सरकारी अहवाल, (सरकाराचे व समित्यांचे).
७. वार्षिक वृत्तान्त, (विद्यापीठे, संशोधन-संस्था, व्यापारी संस्था, इ. चे )
८. वृत्तपत्रे.

याशिवाय दुय्यम स्वरूपाच्या साधनात क्रमिक पुस्तके, तसेच काही मान्यवर ग्रंथाच्या लोकप्रिय आवृत्त्या इ. येतात.

संशोधन हा एक अखंड सावधानतेने करावयाचा व्यवहार आहे. त्यातील प्रत्येक बाब बारकाईने परीक्षिली जावी लागते. त्या दृष्टीने प्राथमिक व सर्वच दृष्टींनी महत्त्वाचे साधन म्हणजे ग्रंथ. त्यांची विश्वसनीयता ठरविणारी गमके विदित असणे आवश्यक आहे. साहित्याच्या क्षेत्रात जुन्या वाङमयाच्या प्रतींची निश्चितता ठरविताना अशाच प्रकारे बारकाईने पाहून अनेक गोष्टी-अंगे उपांगे विचारात घ्यावी लागतात. कारण साधने हा पाया आहे. तो जितका पक्का तितके संशोधन पक्के.

### वाचनाचे प्रकार

प्राथमिक स्वरूपाची रूपरेषा तयार झाल्यानंतर वाचनास सुरवात करणे

[ * 'Research and Report Writing' : by Prof. F. Cordasco & Gatner. ]

योग्य होईल पुस्तकाच्या सूचीमधून तुमचा विषय शोधून काढणे व त्या विषया वरचा मजकूर वाचणे प्रत्येक वेळी आवश्यक ती माहिती मिळेलच असे नाही मिळाल्यास ती अतिशय सर्वसामान्य प्रकारची असेल मग त्या पुस्तकाची अनुक्रमणिका व प्रकरणाचे विषय पाहून त्या मार्गाने त्या पुस्तकाचा अभ्यास करावा प्रकरणाची कल्पना येण्यासाठी प्रकरणाचा प्रारंभ व शेवट ही दोन्ही बारकाईने वाचावी त्यायोगे विषयाची कल्पना येण्यास मदत होईल एखादेवेळी सबंध प्रकरण वाचावे लागले तरी योग्य ती माहिती तावडतोब मिळू शकेल जेव्हा संशोधनासाठी एखादे पुस्तक वाचतो तेव्हा ते प्रथमपासून शेवटपर्यंत वाचावयास हवे असे नाही आपल्या विषयाचा व संशोधनाच्या दृष्टीने पोषक असा जेवढा भाग असेल तेवढा नेमका टिपता आला पाहिजे, या दृष्टीने थोडी सवय करावी लागते

प्राथमिक स्वरूपाच्या साधनाच्या आधारे व महत्त्वाच्या पुस्तकातील विवेचनाच्या आधारे विषयाचे स्वरूप ठरते महत्त्वाची पुस्तके निश्चित झाली की वाचनास सुरवात करावी वाचन हे तीन प्रकारचे असते —(१) प्रास्ताविक-विषय प्रवेशास पोषक असे (२) सखोल व चिकित्सक स्वरूपाचे-(इंटेन्सिव्ह) प्रबंधाच्या सिद्धतेत याचे स्थान अतिशय महत्त्वाचे असते याच्यावर आपली मदार असते प्रबंधतयारीचा हा गाभाच होय (३) यानंतरचे वाचन म्हणजे पूरक (सप्लिमेंटरी) वाचन काही विषय किंवा काही संदर्भ इ अर्धवट राहिलेले असतात म्हणून मधून अधिक स्पष्टीकरण हवे असते ते करून काढण्यासाठी या वाचनाची जरूरी असते परिशिष्टे ही पूरक वाचनाच्या साहाय्यानेच तयार करावी लागतात पण ती योग्य वेळीच तयार करणे आवश्यक असते

*टिप्पणी काढणे*

प्राथमिक स्वरूपाच्या वाचनाच्या वेळी विस्तृत टिपणी काढण्याची जरूरी नसते पण जेव्हा वाचनाची दुसरी अवस्था सुरू होते तेव्हा मात्र टिपणी (नोट्स) काढणे आवश्यक असते नोटस काढण्यासाठी ४'×६" या आकाराची कार्डे करावी असा सल्ला या विषयीच्या पाश्चात्य ग्रंथात असतो अर्थात या बाबतीत निश्चित स्वरूपाची एकवाक्यता नाही पण अशा प्रकारची कार्डे वापरणे नेहमी सोयीचे होईलच असे नाही शिवाय ते खर्चाचेही होईल आपल्याकडे 'चतकोर' (८'×६½") आकाराचा नेहमीचा कागद वापरावा त्यावर प्रथम विषय, संदर्भ, ग्रंथकार, आवृत्ती वर्ष इ लिहून आपले टिपण त्याच्यावर लिहावे आवश्यकतेप्रमाणे सारांश अगर प्रत्यक्ष अवतरण स्पष्ट स्वरूपात लिहावे हे कागद सुटेच ठेवावेत व प्रकरणाप्रमाणे त्याची सगती लावावी नोटस घेताना पुढील प्रकारची दक्षता घ्यावी.

(१) प्रत्येक टिप्पणी (नोट) ही स्वतंत्र कागदावर घ्यावी
(२) आपली नोंद ही पूर्ण व बिनचूक असावी
(३) नोंद घेताना आणखी कोणती माहिती मिळविणे अवश्य आहे हे पण त्या ठिकाणी नमूद करून ठेवावे
(४) कोपऱ्यात तारीख अगर ग्रथालय इ ची माहिती असावी

स्वतंत्र कागदावर टिपणी काढण्याचा फायदा असा की, त्याची आखणी (क्रम) बदलता येते नोट्स काढत चालल्या की त्याची विषयानुरूप जुळणी करणे अवश्य असते ते स्वतंत्र कागदामुळे (कार्डामुळे) लवकर व सोयीचे होते कोणत्या आकाराचा व जाडीचा कागद घ्यावयाचा हे आपण स्वत आपल्या गरजेप्रमाणे आवडीप्रमाणे आर्थिक कुवतीप्रमाणे ठरवावे

प्रत्येक कागदावर विषयाचा उल्लेख थोडक्यात व स्पष्ट असावा अशा विषयाची एक यादी एखाद्या स्वतंत्र कागदावर आपल्या जवळ असावी त्यायोगे कोणत्या विषयावर आपल्या टिप्पणी तयार आहेत ते चटकन कळू शकेल 'आपणास किती नोट्स लागतील ?' असा प्रश्न कित्येक विद्यार्थी विचारतात पण हा प्रश्न निरर्थक आहे विषयावर व तुमच्या तयारीवर ते अवलबून आहे पण सामान्यत एका पृष्ठाच्या लेखनाला तीनचार टिपणींचा उपयोग केलेला बरा अर्थात हे तुमच्या मार्गदर्शकावरही अवलबून राहील

नोट्स काढल्यानतर एका विषयाच्या नोट्स एकत्र कराव्यात व रूपरेषेत ठरविल्याप्रमाणे वर्गीकरणास सुरवात करावी त्याच्या आधारे लेखनाचा कच्चा खर्डा तयार होईल

टिपणी काढण्याची आपण एक यांत्रिक पद्धतच ठरवून टाकावी नोट्स वा टिपणी काढण्याचे, तसेच त्याची वारवार पुन पाहणी करण्याचे काम हे किती महत्त्वाचे आहे हे विशद करताना वेब् दपती आपल्या 'मेथड्स ऑफ सोशल स्टडीज' या पुस्तकात म्हणतात —

*'The mechanical perfection of notes taking may become an instrument of actual discovery. It is difficult to convince the students, especially those with a literary rather than scientific training, that it is just by this use of a mechanical device as the shuffling of sheets of notes, and just at this stage that the process of investigation often becomes fertile in actual discoveries*

## टिप्पणीचे पुनर्व्यवस्थापन

टिपणीचे वारवार पुनर्व्यवस्थापन करणे जरूर असते वर्गीकरणास ते सोपे असते प्रत्येक टिपण इ मागे म्हटल्याप्रमाणे एका स्वतत्र कागदावर व मबद्ध माहिती पूर्णपणे लिहिलेले असे असावे कागदाला मोठा (एकतृतीयाश) समास सोडावा, म्हणजे नव्या नोंदी करणे सोयीचे जाईल तसेच नव्या कल्पनाचे पण नोंदीकरण होत राहील

पुस्तकाच्या बरोबरीने नियतकालिकातून मिळविलेल्या माहितीचे महत्त्व असते नवनवी माहिती नेहमी त्यातूनच मिळते कित्येक उपक्रमाची माहिती वृत्तपत्रातून येते म्हणून आपल्या विषयावरची ताजी वृत्तपत्रे वाचावीत, त्यातील महत्त्वाच्या कात्रणाचा सग्रह जवळ बाळगावा त्याशिवाय काही महत्त्वाच्या नियतकालिकाचे जुने अक अत्यत उपयुक्त ठरतात

अशा रीतीने विविध प्रकारची माहिती जमल्यानतर विषयवार तिची व्यवस्था करणे टिप्पणी वरचेवर चाळून त्याची जुळणी बदलावी असे करण्याने कित्येकदा नवे मुद्दे सुचतात आपल्यापुढे स्थूलमानाने तयार केलेली रूपरेषा असतेच तिच्या आधाराने त्याची माडणी करावी नतर ह्या सुटया सुटया टिपणीचे तार्किक सगतीला प्राधान्य देऊन पुनर्घटन करावे हे सर्व झाले की अगदी प्राथमिक स्वरूपाची पहिली प्रत तयार होईल नतर तिचा स्थूल आराखडा एका कागदावर लिहावा

## आधार, अवतरणे व तळटापा

सशोधनात आधाराचे महत्त्व अनन्य आहे आपले समर्थन अगर खडन साधार असणे हे अतिशय आवश्यक असते त्यामुळेच आता पाहिल्याप्रमाणे आधार महत्त्वाचे असतात आपले म्हणणे काढलेल्या टिपणाचा उपयोग करून सोल्लेख माडलेले असते हे आधार विविध प्रकाराती वापरले जातात उदा —

(१) प्रत्यक्ष अवतरण उद्‌धृत करणे
(२) एखादी आकृती अगर कोष्टक या तक्ता तसाच घेणे
(३) लेखकाचा मथितार्थ आपल्या शब्दात देणे
(४) एखाद्या आकृतीवरून स्वत ची वेगळी आकृती तयार करणे
(५) एखाद्या मताचा आपण स्वत अनुवाद (पॅरॅफ्रेज) करणे
(६) सर्वसामान्य माणसाला माहीत नसेल असा एखादा पुरावा सादर करणे

प्रबध-लेखनात आधार विविध कारणासाठी येतात अगदी पहिला प्रकार म्हणजे विशिष्ट विधानाला पूरक असा आधार किंवा श्रेष्ठ ग्रथकाराची साक्ष देणे ( टू राइट अँथॉरिटी ) आधाराचा दुसरा प्रकार म्हणजे विशिष्ट विधाने या

मधे दिलेला संदर्भ वरच्याच ठिकाणी देण्याची जागा. किंवा प्रकार म्हणजे [illegible] अगोदरच्या संदर्भातीलच पूर्वी आलेल्या ग्रंथाचा निर्देश करणे, त्यास पूर्वोक्त संदर्भ (आयबिड रेफरन्स) असे म्हटले जाते. सध्या यासुद्धा म्हणजे काही विशेष स्वरूपाची नोंद नमूद करण्यासाठी वेगळेपणे महत्त्व.

तळटीपांच्या संदर्भात आणखी काही गोष्टी लक्षात घ्याव्या लागतात. उदा., तळटीपा देताना संदर्भ-शब्दावर १ २ ३ असे (अंक) अथवा * असे तारांकित चिन्ह (खूण) देणे, व ते ते संदर्भ त्या त्या पृष्ठावर तळाशी देणे, अथवा सर्व एकत्र प्रकरणाच्या शेवटी अनुक्रमाने संदर्भ देणे, अथवा ग्रंथाचे शेवटी एकत्रितपणे व अनुक्रमाने संदर्भ देणे. या विविध पद्धतींपैकी आपणास योग्य त्या प्रकारच्या पद्धतीचा अवलंब करावा पण एकदा ठरविल्यानंतर मात्र त्या प्रकारची ती पद्धत सातत्याने व काटेकोरपणे अवलंबावी. संदर्भांक देताना '१अ' असे अंक देण्याची प्रथा नाही. असे संदर्भ देणे हे गैरशिस्तपणाचे मानले जाते.

तळटीप देताना ती परिपूर्ण असावी; तिच्यात संदिग्धपणा नसावा. त्याचप्रमाणे ती अन्वर्थक असावी; उगाच पांडित्यप्रदर्शनाकरिता ती लिहिली नसावी: प्रतिपाद्याशी बरोबर ती पूरक असावी.

तळटीपेत लेखक, संपादक इ. च्या नावांची आद्याक्षरे प्रथम व आडनाव शेवटी देण्याची प्रथा आहे. उदा., शि. का. शत. ह्यांचा उल्लेख ग्रंथसूचीच्या यादीत मात्र वेगळा होतो. म्हणजे तेथे आडनाव अगोदर येते व आद्याक्षरे नंतर येतात हे सर्वमान्य असे संकेत रूढ झालेले आहेत. त्याचप्रमाणे तळटीपेत किंवा ग्रंथसूचीच्या यादीत लेखक संपादकाच्या नावाचा उल्लेख करताना 'डॉक्टर', 'प्रिन्सिपॉल', 'प्रोफेसर', 'रेव्हरंड', 'बॅरिस्टर' किंवा श्री. इ. त्यांच्या उपाधी असतील त्या गाळण्याचा संकेत इंग्रजीत सर्वत्र रूढ झालेला आहे. तथापि तो आपणाकडेही रूढ व्हायला हरकत नाही. अर्थात एखाद्या विशिष्ट संदर्भात त्या उपाधीला काही विशेष स्थान असेल तर ती त्या ठिकाणी राहावयास हरकत नाही. ग्रंथाचे नाव संदर्भयादीत देताना इंग्रजीत एक संकेत पाळला जातो, तो म्हणजे ग्रंथनामात प्रारंभी जी उपपदे (ए, ॲन्, दी इ.) आलेली असतात ती गाळली जातात म्हणजे "ॲन् इंट्रोडक्शन टु लिटरेचर" असे नाव असेल तर संदर्भ देताना त्यातील "ॲन्" हे उपपद गाळले जाते मराठीत उपपदाची भानगड नसल्याने हा संकेत माहितीसाठी लक्षात घेणे अवश्य आहे. एखाद्या इंग्रजी सूचीतून ग्रंथनाम शोधून काढण्यासाठी त्याचा उपयोग होईल.

पृष्ठांक देताना इंग्रजीत आणखी एक संकेत पाळला जातो. पुस्तकाची प्रत्यक्ष संहिता (टेक्स्ट) सुरू होण्यापूर्वी जी पृष्ठे (मुख्य पृष्ठ, प्रस्तावना, निवेदन, अनु-

अमणिका, अर्पणपत्रिका, इ ) येतात त्याच्यावरील पृष्ठाक रोमन लिपीत लिहिले जातात (उ i, iv, l,) महितेत प्रत्यक्ष ग्रथात, [ १, २, ३ ] हे आकडे येतात*

हे रोमन अक फक्त प्रारभीच्या पृष्ठासाठी असतात ग्रथाच्या शेवटी येणाऱ्या परिशिष्टे, सूची, सदर्भग्रथ, इ गोष्टीसाठी ग्रथाचीच पृष्ठे पुढे चालू ठेवण्याची प्रथा आहे म्हणजे तेथे दुसरी अकपद्धती वापरली जात नाही आधार देताना अगर उल्लेख करताना पुस्तकाच्या नावासाठी इग्रजी भाषेत सर्वत्र तिरपी (इटॅलिक)अक्षरे वापरली जातात मराठीत ती प्रथा रूढ नाही सामान्यत पुस्तकाची वा वत्तपत्राची नावे अवतरणात दिली जातात अलीकडे काही नियतकालिकानी अवतरणे न वापरता ग्रथनाम देताना दोन अक्षराच्या दरम्यान थोडी जागा(स्पेस) सोडण्याची प्रथा अवलबिली उदा, 'शाकुतल' असे हे अवतरणात न देता शा कु त ल असे प्रत्येक दोन अक्षरात थोडी जागा सोडून छापले जाते हा एक प्रयोग आहे मराठीत त्याबाबत निश्चित सकेत अद्याप निर्माण व्हावयाचे आहेत

### साधनग्रथांची यादी

शोध-लेखनाशी साधनग्रथ सबद्ध आहेत ग्रथाच्या शेवटी त्याची एक यादी द्यावी लागते साधनग्रथाच्या यादीत पुस्तकाचा उल्लेख करताना पुढील सकेत लक्षात ठेवावेत प्रमुख सकेत असे आहेत प्रथम ग्रथकाराचे नाव येते (आडनाव प्रथम) आद्याक्षराबाबतचे सकेत पुष्कळाना माहीत नसतील इग्लिशमध्ये या सबधात दोन सकेत रूढ आहेत ( १ ) आडनावानतर पहिले नाव पूर्ण येते व दुसऱ्या नावाचे नुसते आद्याक्षर येते उदा, शॉ, जॉर्ज बी (हा सकेत अमेरिकेत सर्रास रूढ आहे (२) आडनाव पूर्ण व नतर लेखकाच्या स्वत च्या व वडिलांच्या नावाची आद्याक्षरे देणे हा ब्रिटिश सकेत आहे तो आपण घेतलेला आहे आडनावानतर स्वल्पविराम, अमेरिकन पद्धतीप्रमाणे पहिले नाव पूर्ण द्यायचे असेल तर ते द्यावे, आद्याक्षरे द्यायची असतील तर पूर्णविराम देण्याची प्रथा आहे, पण अलीकडे हे पूर्णविराम न देता नुसती जागा सोडलेली असते ग्रथकाराच्या नावा नतर थोडी जागा पुढे अवतरणात अगर दोन अक्षरात सुटी जागा ठेवून ग्रथाचे

*मराठीत अशा प्रकारची दुय्यम अकपद्धती नाही प्रस्तुत लेखकाने सत्तावीस वर्षापूर्वी अशा प्रकारची एक अकपद्धती सुचविलेली होती काही ग्रथात ती वापरण्याचा प्रयत्न लेखकाने केला इग्रजीतच अशी पद्धती मागे पडत असल्यासारखे काही काळ दिसले पण प्रारभीची ही पाने ग्रथाचे मुद्रण झाल्यावर छापावयाची असतात, त्यामुळे दुसऱ्या प्रकारच्या अकाची जरुरी भासते म्हणून या पुस्तकाच्या परिशिष्टात ती दिली आहे

नाव, नतर जागा, नंतर प्रकाशनाच्या गावाचे नाव, पुढे प्रकाशन, पुन: थोडी जागा, नतर वर्ष, नतर खड, आवृत्ती इ हा क्रम व हे सकेत लक्षात धरून त्याचा काटेकोरपणे वापर करावा साधनग्रथ लेखकाच्या नावाप्रमाणे अकारविल्हे यावे.

अलीकडे बऱ्याच ग्रथात प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी त्या प्रकरणाला साह्यभूत झालेल्या ग्रंथाची यादी दिलेली असते. सदर्भात नेमकेपणा येण्याच्या दृष्टीने हे ठीक आहे आधार देताना वापरण्यात येणाऱ्या सकेताचा व काही सक्षिप्त रूपाचा अभ्यास करावा व ते सकेत समजून वापरावेत. ग्रथकार, सपादक, आवृत्ती खड, वर्ष, ग्रथनाम, प्रकाशक, पृष्ठ, परिच्छेद इ. माहिती बिनचूक असावी उल्लेख पुन्हा करताना सक्षिप्त रूपाचा वापर करावा. विशेष प्रबधाच्या प्रारभी अशी सक्षिप्त रूपे स्वतत्ररीत्या दिलेली असतात. सक्षिप्त रूपे बरीच असतील तर ह्या पद्धतीचा अवलब करावयास हरकत नाही. एकच ग्रथ पुन तावडतोब उल्लेखावयाचा असेल तर मराठी 'कित्ता' अगर इग्रजीमध्ये 'इबिड' असे साकेतिक शब्द वापरले जातात. एखाद्या ग्रथाचे अनेक लेखक अगर सपादक असतील तर प्रथम असणाराचे नाव देऊन 'आणि इतर' असा उल्लेख असावा

विशेष व्यावसायिक अहवालात आकडेशास्त्राच्या आधाराने मिळविलेली माहिती तक्त्याच्या इ. स्वरूपात दिलेली असते. ती देताना ती कोठून मिळविली ते सागून मथळ्यात तिचे स्वरूप स्पष्ट करणे अवश्य असते. नकाशात जेव्हा प्रमाण (स्केल) द्यावयाचे असेल तेव्हा ते बिनचूक द्यावे सगळे पुरावे घोटाळा होणार नाही अशा रीतीने वेगवेगळ्या पानावर व स्पष्टपणे उद्धृत करावे. तसेच उताऱ्यातील काही भाग गाळला असेल तर... अशा टिबाकित रेषेने ते दर्शवावे. काही शब्द वेगळ्या ठशात घेतले असतील तर तोही उल्लेख कसात स्पष्टपणे करावा.

## सूची व साधन-ग्रंथ-यादी यांसंबधी थोडेसे अधिक

आधारानतर महत्त्वाचा भाग म्हणजे "सूची" हा होय. ग्रथाचा वा प्रबधाचा लेखकाच्या दृष्टीने दुय्यम महत्त्वाचा पण वाचक व अभ्यासक याच्या दृष्टीने अत्यत महत्त्वाचा भाग म्हणजे सूची होय. सूचीचे अनेक प्रकार असतात. उदा०, सर्वसामान्य सूची, विषयसूची, ग्रथनाम सूची, ग्रथकारनामसूची, इ. कोणती सूची द्यायची ते प्रथम ठरवावे, व त्याप्रमाणे ती तयार करावी. इग्रजी मापेत अक्षरे सव्वीसच असल्याने आणि त्याचा क्रम सर्वच दृष्टीनी अविवाद्य असल्याने तेथे मतभेदास स्थानच राहात नाही व सूची तयार करणे तुलनात्मक रीतीने पुष्कळच सोपे आहे. मराठीत वर्णमालेची अक्षरे व त्याचा क्रम याबाबत बरीच अनिश्चितता आहे त्यामुळे सूची तयार करताना मोठे प्रश्न उभे राहतात उदा०, शब्दावर येणाऱ्या अनुस्वारामुळे शब्दाचे स्थान

कोणते ठेवावयाचे, बाराखडीत शेवटी 'अ' येतो पण मग इ उ,..याचे स्थान कोणते ठरवावयाचे, 'क्ष' व 'ज्ञ' तसेच 'ळ' चे स्थान कोणते मानावयाचे; इग्रजीच्या सपर्काने मराठीत आलेले 'अॅ,' 'ऑ' या वर्णाचा समावेश कोठे करावयाचा, तसेच वर्णमालेचा अनुक्रम कोणता मानायचा, यावावत अद्याप मराठीच्या वावतीत तरी एकवाक्यता नाही त्यामुळे लेखकाचीही मोठी पचाईत होते व ग्रथाच्या मौलिकतेचे स्वरूप लक्षात न घेणारा एखादा समीक्षक 'सूची' मधील चुकाचीच चिकित्सा करतो शोधप्रधान लेखनाच्या बावतीत त्याने तसे दोपदिग्दर्शन केले तर त्याला फारसा दोप देता येत नाही तेव्हा शोधलेखकाने या बावतीतही विशेष दक्षता घेणे जरूर आहे रा श्री. जोग ह्याचा "मराठी वर्णमालेतील आनुपूर्वी" (म सा पत्रिका अ १२२, जुलै ऑग सप्टे १९५७, पृ १९) हा लेख या सदर्भात अभ्यासावा व त्यातील सूचनाचा अवलब करावा. हेही एक किरकोळ दिसणारे व बारकाळजीने करण्यासारखे काम आहे त्याच्यावर शोधसस्काराची दृढता अवलबून असते अनुसरलेल्या अनुक्रमात झालेले दोप विवाद्य प्रश्नावावत असतील तर गोष्ट वेगळी (तरी त्या बावतही लेखकाचे स्वत चे धोरण स्पष्ट हवे.) पण इतर प्रकारच्या ढोवळ चुका असू नयेत

काय घडते, एका मोठ्या कागदावर आपण सूची तयार करण्याचा प्रयत्न करतो प्रत्येक अक्षरासाठी विशिष्ट जागा अदाजाने सोडतो काही वेळाने ती जागा भरते व नवे शब्द येतात व मग क्रम बदलतो ते मागेपुढे लिहिले जातात यासाठी सूची अगर साधनग्रथाची यादी करताना प्रत्येक बाब (एट्री) ही एका स्वतत्र छोट्या कागदावर (स्लिप) लिहावी शेवटचा खर्डा तयार करताना सगळ्या याद्या पूर्ण झाल्या आहेत याची खात्री करून घेऊन त्या ठरविलेल्या क्रमाने लावाव्या अगर कच्चा खर्डा तयार करताना सरळ एका मोठ्या (ठरविलेल्या आकाराच्या) कागदावर चिकटवाव्यात क्रम बिनचूक राहील याची दक्षता घ्यावी, व त्या खर्ड्यावरून शेवटची सूचीची प्रत सिद्ध करावी.

## युक्तिवाद व भाषा

वाचनाची सिद्धता झाल्यावर व टिपणी तयार केल्यानतरचा अत्यत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे युक्तिवादा (आर्ग्युमेंट) सबधीचा होय अगदी पहिली पायरी म्हणजे जो विपय निवडला असेल त्याचे शब्दाकन करणे चागल्या समस्यारूप विधानाची चार लक्षणे आहेत पहिले म्हणजे विधान ह चर्चेचा विपय होऊ शकणारे हवे ( It must be debatable ) कारण त्या शिवाय पाहणी कशी करणार? यासाठी विपयाची माडणी कित्येक जण प्रश्नार्थक करतात उदा, साहित्य आणि

संस्कृती यांचा संबंध कोणता? पण असे प्रश्नात्मक वाक्य हवेच असा नियम नाही. दुसरे लक्षण म्हणजे प्रश्न असा असावा की त्याच्यापासून चर्चेनंतर कोणता तरी निष्कर्ष निघावा. माहिती मिळवून तिची पुनर्घटना करून काही निश्चित स्वरूपाचा निर्णय निघाला पाहिजे. उदा०, लेखणी श्रेष्ठ की तलवार? अशा प्रश्नावर विस्तृत चर्चा करूनही निष्कर्ष निघत नाही. तिसरे लक्षण तो एकांगीपणाने मांडलेला नसावा, त्यात शोधाला अवसर असावा. आणि चवथे लक्षण म्हणजे त्याला विरोधी अशी बाजू विधानातच अस्तित्वात असावी. आधुनिक तर्कशास्त्राप्रमाणे ह्या चार प्रमुख कसोट्या होत.

प्रमुख विधानाची निश्चिती झाल्यावर दुसरा महत्त्वाचा भाग म्हणजे मूळ समस्येशी संबद्ध असे कोणते पैलू आहेत की ज्याबाबत अनेक मतभेद आहेत. त्या मतभेदाचे स्वरूप स्पष्ट करावे. नंतरचा प्रश्न पुराव्यांसबंधीचा. आपला युक्तिवाद योग्य पुराव्यांनी मांडावा. केवळ ठासून सांगणे (अॅसर्शन) म्हणजे युक्तिवाद नव्हे. पूरक पुराव्यांची छाननी व्हावी. तसेच ते आधार दक्षतापूर्वक स्वीकारणे अवश्य आहे. वस्तुनिष्ठ पुरावा (फॅक्च्युअल एव्हिडन्स) देताना योग्य ती दक्षता घेणे अवश्य आहे.

त्या नंतरचा महत्त्वाचा प्रश्न तर्कनिष्ठते (रीझनिंग) चा.

मिळविलेल्या माहितीच्या आधारे काही अर्थपूर्ण अशी विचारमालिका निर्माण करणे हे तर्कवादाचे (रीझनिंग) प्रमुख कार्य. तर्कवाद हा किती पक्का (साऊंड) आहे हे पाहावयाचे कसे हे खालील आकृतीवरून स्पष्ट होईल.



तर्कवाद जर पक्का असेल तर या चौकोनाच्या चारी बाजू पूर्ण केल्या जातात जर बांधलेला अदाज चुकला तर त्या बाजूत दोष आहे व तो दोष अवलोकनातील उणीवामुळे उत्पन्न झालेला असेल किंवा अयोग्य गृहीतपक्षामुळे झालेला असेल, किंवा आपले अदाज चुकले असतील किंवा पुनर्तपासणीत काही दोष राहिला असेल

तर्कवाद तीन प्रकारचा असतो (१) विगमनात्मक (डिडक्टिव्ह) (२) निगमनात्मक (इडक्टिव्ह) (३) ह्या दोहोंचा एकत्रित रीतीने उपयोग करता येतो शास्त्रीय चर्चेत दुसरा युक्तिवाद महत्त्वाचा असतो अनेक पुरावे विचारात घेऊन एखादा निष्कर्ष काढलेला असतो गणितात पहिल्या प्रकारचा युक्तिवाद महत्त्वाचा असतो, म्हणजे तत्त्व विचारात घेऊन त्याचा तपशील वा त्याचे अवलंबन शोधले जाते प्रसिद्ध ज्योतिर्विद हर्शल याने (ज्या ग्रहाला त्याचेच नाव दिले त्या) ग्रहाचे स्थान प्रथम गणिताच्या साहाय्याने निश्चित केले व मग दुर्बिणीच्या साहाय्याने तो प्रत्यक्षात शोधून काढला तर्कवादाचा तिसरा प्रकार म्हणजे समालोचनात्मक (जनरलायझेशन) हे समालोचन तीन प्रकारचे असते (१) सर्वसाधारण पर्यालोचन, (२) कार्यकारण संबंध दाखविणारे, (३) रूपकाचा वा दृष्टांताचा अवलंब करून केलेले

युक्तिवाद तीन अवस्थांतून उत्क्रांत होत जातो (१) समस्येचे पूर्ण आकलन होणे [रिकग्निशन ऑफ् द इशू] (२), घटिताची (फॅक्टस्) मांडणी करणे व (३) तर्कशुद्ध निष्कर्ष मांडणे

तीनही अवस्थांचे महत्त्व सारखेच आहे कोणत्याही एकीचे महत्त्व इतरांपेक्षा कमी किंवा अधिक मानता येत नाही समस्येचे दक्षतापूर्वक पृथक्करण केल्याशिवाय समस्येतले मर्म लक्षात येणार नाही आणि त्या अभावी सर्व युक्तिवाद हा केवळ पोकळ किंवा गैरलागू होईल योग्य अशा प्रकारच्या पुराव्याच्या अभावी सर्व चर्चा ही केवळ वायफळ होईल पुराव्याशिवाय ठासून केलेली विधाने म्हणजे लहान मुलाच्या भांडणातील "हो असच आहे," किंवा "छे! असल नाहीच मुळी" अशा प्रकारचे पोरकट वाद होत अतिशय दक्षतेने केलेल्या तर्कवादात परीक्षणाच्या अभावी दिलेले दाखले वा सादर केलेले पुरावे हे निरुपयोगी होत या तिन्ही प्रकारच्या शिस्तीचा जेव्हा यशस्वी समन्वय होतो, तेव्हा त्या युक्तिवादाला निष्कर्षाप्रत येणाऱ्या विचारमालिकेचे मोल लाभते

योग्य प्रकारच्या युक्तिवादाची खात्री पटविणारे लेखन करणे हे सोपे नाही या सर्वांच्यापेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे शोधकाजवळ एक प्रकारची प्रज्ञा असावी लागते प्रखर युक्तिवादाने परिष्कृत असा शोधनिबंध लिहिण्यास आपणांपुढील उद्दिष्टाची स्पष्ट कल्पना असावी लागते, विचारावरील पकड पक्की असावी लागते

व साच्या स्पष्टीकरणात्मक निबंधापेक्षा शब्दाच्या अर्थाचे वारखावे लक्षात घेऊन शब्द वापरणे आवश्यक असते.

युक्तिवाद हा शोधनिबंधाचा गाभा होय. त्याविना निबंध म्हणजे मूर्तीविना मंदिर. म्हणून विवेचन थोड्या विस्ताराने केले.

## शब्द-संकेत

युक्तिवादाबरोबर प्रबंध-लेखनातील आणखी एका महत्त्वाच्या बाबीचा विचार करावयास हवा व तो म्हणजे शब्दांच्या वापराबाबतचे संकेत प्रत्येक शास्त्रात निरनिराळ्या विषयाशी संबद्ध असे काही शब्द असतात ते शब्द रोजच्या व्यवहारात इतरत्रही वारंवार वापरले जातात. त्यामुळे त्यांच्या मागचे विशिष्ट अर्थ व संकेत पार अस्पष्ट झालेले असतात उदा 'समाजवादी पद्धतीची समाज-रचना,' 'आधुनिक समाज,' 'राष्ट्रीयीकरण,' 'लोकशाही' ... इ ह्यांचा वापर करावयाचा असेल तर तो निश्चित संदर्भात व निश्चित अर्थानेच व्हावा. केवळ लोकप्रिय शब्दप्रयोग आहेत म्हणून त्यांच्या मागे जाणे योग्य नाही. प्रत्येक क्षेत्रात असे शब्द असतात वाङ्मय, साहित्य, इ शब्द हे साहित्यातले उदाहरण

शास्त्रज्ञ जेव्हा एखादा रोजच्या व्यवहारातला शब्द वापरतो तेव्हा त्याला विशेष अर्थ अभिप्रेत असतो आपल्या क्षेत्रात कोणते शब्द कोणत्या अर्थाने वापरले जातात हे अभ्यासकाने प्रथम जाणून घेतले पाहिजे त्या त्या शास्त्राच्या परिभाषेचा वापर त्याला करता आला पाहिजे संदिग्धता टाळून निश्चित अर्थाने शब्द वापरण्याचे कौशल्य हस्तगत केले पाहिजे त्या दृष्टीने खालील गोष्टी उपयुक्त आहेत ·

काही लेखक काही शब्द विशेष साक्षेपाने वापरतात कित्येक वेळा ते तयार करूनही घेतलेले असतात "अस्पृष्टाचा प्रश्न" या ग्रंथात श्री माटे यांनी 'अस्पृष्ट' हा शब्द तयार करून तो अधिक अर्थवाही शब्द म्हणून वापरला 'महाराष्ट्र सारस्वत', 'सारस्वत समीक्षा' ह्या ग्रंथात 'सारस्वत' हा शब्द 'अक्षर वाङ्मय' या अर्थाने वापरला आहे श्री जोग 'साहित्य' हा शब्द प्रामुख्याने 'ललित वाङ्मय' याच अर्थाने वापरतात 'वाङ्मयीन महात्मता' या पुस्तकात मर्ढेकरानी 'महात्मता' हा शब्द प्राय विशिष्ट अर्थाचा ( सिन्सिरिटी ) वाचक म्हणून वापरला आहे

**भाषावापर : काही संकेत**

शब्दाच्या वापराचा विचार केल्यानंतरचा मुद्दा भाषेच्या वापराबाबतचा शोध-निबंधाची भाषा साधी, सरळ, स्पष्ट असावी विषयानुरूप शब्दयोजना असावी अलंकारात्मक दृष्टान्तपूर्ण भाषा प्रबंधाला योग्य नव्हे उपमा–रूपकाचा वापर विरळत्वाने व्हावा तसेच शब्दावरील कोट्या वा तिरकस पद्धती, उपरोधपूर्ण तसेच सहजासहजी लक्षात न येणारे उल्लेख वा संकेत ह्याचा त्याग करणे योग्य होईल पारिभाषिक शब्द वापरताना ते निश्चित अर्थाने वापरावेत विषयाला अनुरूप अशी शब्दयोजना असावी केवळ संस्कृतनिष्ठ शब्दाचा वापर म्हणजे भाषाशैली नव्हे व्याकरणशुद्धता, शब्दाचा विनचूक उपयोग या गोष्टी भाषा-वापरात महत्त्वाच्या आहेत

भाषाविषयक काही लेखन-संकेताची माहिती असावी प्रबंध लेखनात स्वत चा उल्लेख प्रथम पुरुषात न करता सामान्यत तृतीय पुरुषाचा वापर करण्याची पद्धती आहे ता एक अनामिक संकेतच आहे म्हणजे 'माझे असे मत आहे' असे न म्हणता 'प्रस्तुत लेखकाचे असे मत आहे' असे लिहिण्याची पद्धती आहे कित्येक शोध लेखक नियतकालिकाच्या संपादकाप्रमाणे 'आम्ही' ह्या प्रथमपुरुषी अनेकवचनी रूपाचा अवलंब करतात उलट अगदी अलीकडे कित्येक लेखक प्रथमपुरुषी 'मी' ह्या सर्वनामाचा पण वापर करतात पण ते फारसे रूढ नाही प्रबंधलेखनामागील वस्तुनिष्ठ भूमिकेशी ते सुसंगतही नाही अर्थात कोणत्या पद्धतीचा वापर करा-वयाचा ते अभ्यासकाने ठरवावे व तिचा अवलंब करावा हे लेखन विषयक संकेत इंग्रजीमधून आल्यासारखे दिसतात पण ते मान्य झालेले आहेत

मराठी भाषा बोलताना व लिहिताना वेगळ्या प्रकाराने वापरली जाते सामान्यत लेखनात व्याकरणशुद्ध रूपे वापरली जातात तृतीयेचा 'ने' हा प्रत्यय बोलताना न' होतो नपुसकलिंगी अकारान्त नावे लिहिताना अनेकवचनात एकारान्त होतात उदा फळ–फुले, रूप–रूपे बोलताना मात्र रूप, फुल, असे प्रयोग

होतात सिद्ध 'करावयाचे' चे बोलताना 'करायच' असे होते पूर्वी बोलायला जायला वुठ, इथ, माग, पुढ इ शब्द शारदस्त लेखनात वापरू नयेत, असा एक सर्वमान्य सकेत होता त्याऐवजी, जावयाला, कोठे, येथे, मागे, पुढे, ही रूपे रूढ होती आज तो जात चालला आहे आपल्या हाताला ज्या प्रकारची रूपे लिहावयाचे वळण लागले त्या प्रकारची रूपे वापरावी पण त्यात कोणती तरी एक पद्धत असावी आपली भूमिका निश्चित व स्पष्ट असावी लहरीपणा नसावा लिहिण्याची व बोलण्याची भाषा यात एक प्रकारचा समन्वय असावा एफ् एल् ल्युकस, आपल्या 'स्टाईल' या पुस्तकात "I have suggested that, in general, prose style should be neither too unlike talk, nor yet too like it " हा सोपा मार्ग सागतात, तो लक्षात ठेवणे योग्य होईल मराठी भाषेत इग्रजी भाषेइतका मोकळेपणा (फॅक्नेस) नाही, हे खरे आहे तो आणण्यासाठी काही लेखक प्रयत्न करीत आहेत [ त्यामुळे वादही निर्माण होत आहेत ] असा प्रयत्न प्रबध-लेखकाने सहसा टाळावा

वाचकाच्या गळी आपला आशय उतरविण्याच्या दृष्टीने लेखनात एक प्रकारचा स्पष्टपणा (क्लॅरिटी) आवश्यक असते परतु 'One should not aim at being possible to understand but, at being impossible to misunderstand'— हा नियम लक्षात धरणे जरूर आहे दुसरे म्हणजे लेखनात पुनरक्ती व पाल्हाळ गाळणे अवश्य असते अर्थात काही ठिकाणी एक उल्लेख वा मुद्दा निरनिराळ्या सदर्भात पुन पुन येतो, त्यावेळी तसा उल्लेख करणे जरूर आहे नागरीपणा व साधेपणा हही गुण लेखकास भूषणभूत होतात

भाषेच्या उपयोगाबाबत आणखी एक विचार प्रा मेस यानी आपल्या "सॉयकॉलॉजी ऑफ स्टडी" या पुस्तकात माडला आहे विज्ञानविषयक व सामाजिक शास्त्राच्याही सशोधनात विशिष्ट प्रकारच्या शास्त्रीय परिभाषेचा अवलब केलेला असतो ते अवश्यही असते पण सर्वसामान्य माणसाला आपले म्हणणे कळावे म्हणून शोधकाने आपल्या शोध निबधाची एक जादा प्रत व्यवहारातील, साध्या, सोप्या अपारिभाषिक शब्दाचा वापर करून तयार करावी पारिभाषिक शब्द वापरावयाचे असतील तर त्याचे अर्थ प्रारभीच स्पष्ट करावेत लोकाना समजण्यासाठी असलेल्या लिखाणात कमीतकमी पारिभाषिक शब्द वापरावेत आपल्या सारख्या विकासाभिमुख देशास ही सूचना फार उपयुक्त ठरेल

शैली हा एक व्यक्तिमत्वाचा आविष्कार आहे व्यक्तिमत्व हे लेखनात विरून गेलेले असते पण सोद्देश लेखनातील शैली वेगळी व ललित वाङ्मयातील

शैली वेगळी विचार-प्रधान वाङ्मयाला सुद्धा स्वत ची एक शैली असतेच बर्ट्रंड रसेलचे तसेच विचारप्रवर्तक लेखन करणाऱ्या अनेक लेखकाची उदाहरणे त्या दृष्टीने अनुकरणीय आहेत प्रवध-शैलीत शब्दलाघवापेक्षा अलकारप्राचुर्यापेक्षा विचार ह फार महत्त्वाचे आहेत शब्द हे केवळ विचाराची बाह्य कवचे (शेल्स्) होत ही गोष्ट दृष्टीआड होऊ देणे बरोबर होणार नाही

## शुद्धलेखन

शेवटी लेखनातील एका दिसायला किरकोळ पण विशिष्ट दृष्टीने महत्त्वाच्या विषयाकडे लक्ष वेधणे अवश्य आहे तो म्हणजे शुद्धलेखनाबाबतचा मराठी शुद्धलेखन हा एक विवाद्य प्रश्न असला (आता तो तसा राहिला नाही ही गोष्ट वेगळी,) तरी शोधलेखकाच्या दृष्टीने हा विवाद्य प्रश्न नव्हे रूढ शुद्धलेखन स्वीकारून नियमाचा अवलब काटेकोरपणे करावा सशोधन-विषयक शिस्तीचा हा अगदी प्राथमिक सस्कार आहे, हे लक्षात घेऊन त्याबद्दल अतिशय दक्ष राहावे इतकी किरकोळ सूचना येथे का आली, असा प्रश्न काहीच्या पुढे उभा राहील त्याच्यासाठी एवढेच सागणे अवश्य आहे की, विद्यापीठाची मराठीची पीएच् डी पदवी मिळालेल्या व मुद्रित झालेल्या काही प्रबधात साध्या शुद्धलेखनाच्या व वाक्यरचनेच्या एवढया भयानक चुका आढळलेल्या आहेत, की त्याच्या लेखनावर शोध-क्रियेचे काय सस्कार झालेत हा सभ्रम पडावा म्हणून बाह्यत किरकोळ वाटणाऱ्या पण अत्यत महत्त्वाच्या अशा या गोष्टीकडे लक्ष वेधले आहे शिवाय शुद्धलेखन हा एक सस्कृतीचा भाग आहे, त्याचा अभाव हा गलथानपणा आहे ह्या दृष्टीने त्याच्याकडे पाहावे

## कामासाठी योजना आखा

शोध-प्रवध म्हणजे धीमेपणाने, पण सातत्याने तसेच बिनचूकपणा राहण्यासाठी अतिशय दक्षता घेतलेल्या, विगमनात्मक (इडक्टिव्ह) कामाची परिणती होय या कष्टात प्रेरणेचा किंवा अत स्फूर्तीचा अश कोठे असेल तर अर्थात् तो त्यातील अतिशय महत्त्वाच्या घटनेशी निगडित झालेला आहे, व ती गोष्ट म्हणजे शोधनकार्यासाठी योग्य अशा प्रकारचे क्षेत्र किंवा विषय निवडणे ही होय

जेव्हा आपणापुढे सशोधनाची कालव्याप्ती ठरविण्याचा प्रश्न उभा राहतो, म्हणजे, हातात घेतलेले सशोधन आपण किती दिवस करीत राहाणार आहोत हे ठरविण्याची पाळी येते, त्यावेळी एक गोष्ट ध्यानात धरावी व ती म्हणजे आपण ठरविणार असणारा कालखड हा निवडलेल्या विषयाच्या अभ्यासाला पुरेसा असावा म्हणजे वर्षानुवर्षे काम चालतच राहील असा विषय नसावा, तसा ते काम

लवकर संपणाराही नसावा दुसरी गोष्ट म्हणजे अभ्यास करीत असताना आपले लक्ष त्यात गुतून राहावे फार मोठा व गहन विषय घेतला तर आपणासच त्याचा कटाळा येतो लहान घ्यावा तर लवकर संपतो

विषय निवडल्यावर एक चालचलाऊ पण निश्चित स्वरूपाची योजना करावी अर्थात् तास मिनिटे ठरवून त्याप्रमाणे व घड्याळाप्रमाणे काम करण्याचे हे क्षेत्र नव्हे पण काही तरी वेळापत्रक हे हवेच (ही जाणीव नसल्याने पीएच् डी साठी नाव नादविल्यानतर काही न करता पुष्कळ जण बेफिकीर असतात ) यासाठी कामाचे टप्पे ठरवावेत कोणत्या अवस्थेत कोणते व किती काम करायचे याचा अदाज बाधावा व त्या अंदाज्यानुरूप काम नेटाने करावे

दीर्घकाल काहीतरी छोटेसे का होईना पण योजनापूर्वक पण सतत काम करीत राहाण्याचे महत्त्व अपरपार आहे थेंबे थेंबे तळे साचे, ही तुकोक्ती या संदर्भात फार महत्त्वाची आहे हलके हलके पण सतत केलेल्या कामाच्या छिनीने महान् कार्याचे मोठे मोठे खडक फोडता येतात विमान पक्षी रोज अर्धा एक तास तरी या कामासाठी नियमितपणे द्यावा. म्हणजे त्याचे महत्त्व आपोआपच कळून येईल

साधारणमानाने स्वीकार्य सूचना अशी की, ठरविलेल्या कालाचे तीन भाग करावे अदाजे दोन तृतीयांश काल केवळ तयारी करण्यात घालवावा व एक तृतीयांश काल प्रबंध-लेखनासाठी ठेवावा अर्थात तारतम्य पाहून ह्या विभागणीत कमीजास्त करणे अवश्य आहे हा नियम नव्हे ही एक कामचलाऊ अशी सूचना आहे

## शेवटचा हात फिरवा

टिप्पणी काढून झाल्यावर व प्राथमिक स्वरूपाच्या रूपरेषेनुसार त्याची मांडणी केल्यानतर स्थूलमानाने रूपरेषा तयार होईल तिच्या आधारे अंतिमस्वरूपाची रूपरेषा तयार करावी ती अधिक स्पष्ट व सविस्तर असावी प्रत्येक प्रकरणात येणाऱ्या विषयाची पण नोंद करावी काही परिशिष्टे द्यायची असल्यास त्याचाही निर्देश या निश्चित स्वरूपाच्या रूपरेषेत असावा काही संदर्भ हवे असतील तर तसा उल्लेख समासात अगर योग्य ठिकाणी तेथेच करावा

अशा रीतीने काढलेल्या टिपणीच्या आधाराने अंतिम स्वरूपाची रूपरेषा तयार झाली की, पुढची महत्त्वाची अवस्था म्हणजे लेखन-मुद्दे व टिप्पणी याच्या आधारे लेखनास प्रारंभ करावा एखादा मुद्दा लिहून झाल्यावर त्याचे पुनर्वाचन करावे काही संदिग्धता राहिली काय, आपल्याला म्हणायचे ते नेमकेपणाने व्यक्त झाले आहे काय ? इ प्रश्न स्वतःलाच विचारून लेखन सुधारून घ्यावे आधार तावडतोब व जेथे द्यावयाचे ठरविले असेल तेथे द्यावेत

एकेक प्रकरण हातावेगळे करावे सगळीच प्रकरणे अर्धवट अर्धवट तयार करू नयेत अगर लिहू नयेत लिहिता लिहिता एखादा विचार असा सुचतो की तो पुढच्या प्रकरणास उपयुक्त असतो त्याची एका कागदावर नोंद करून त्या प्रकरणाच्या कागदात योग्य ठिकाणी तो ठेवावा थोडक्यात खडर्याचे सपादन बारकाईने करावे

अशा रीतीने सर्व प्रकरणे लिहून झाल्यावर ग्रथाच्या शेवटी द्यांवयाची साधन-ग्रथाची यादी तयार करावी साधनग्रथाचा उल्लेख कोठे केला ते प्रबधात स्पष्टपणे आले नसेल तर आपल्याजवळ त्याची नाद असावी उल्लेख आला नसेल तर ते पुस्तक यादीत घालण्याचे कारण नाही साधनग्रथाची यादी तयार करण्याबाबतच्या सूचना यापूर्वी आलेल्या आहेतच तक्ते, नकाशे, कोष्टके इत्यादी असतील तर ते सर्व साहित्य नीट पाहावे

अशाप्रकारे तयार झालेली पहिली प्रत एकदा बारकाईने वाचावी काही दुरुस्त्या हव्या असल्यास त्या कराव्यात पुनरक्ती असल्यास व ती अस्थानी असल्यास ती गाळून टाकावी सदिग्धता निदर्शनास आल्यास ती काढावी नीट माडणी करावी व मग शेवटच्या प्रतीच्या लेखनास लागावे

## लेखन-सुधारणा व पुनर्लेखन

लेखनाच्या दृष्टीने पुढला सर्वांत महत्त्वाचा भाग म्हणजे सुधारणा (रिव्हा-यझिंग) व पुनर्लेखन हा होय काळजीपूर्वक केलेली सुधारणा अतिशय मोलाची असते तिच्यामुळे सामान्य माहितीचे एकदम सुवर्णात रूपातर होते या कामात बराच वेळ जातो प्रयक्ष लेखन म्हणजे लिहून काढणे हे त्या मानाने सोपे असते हे काम जास्त वेळ खाणारे व किचकट असते पुनरुक्ती फार झालेल असते ती काढणे अवघड असते

लेखन परिणामकारक व्हावे असे वाटत असेल तर त्यासाठी थोडया अलिप्ततेने त्याचे वाचन करणे आवश्यक आहे आपण हे काही लिहिलेच नाही, दुसऱ्या कोणी तरी हे लिहिले आहे व आपणाकडे वाचनासाठी आणि सूचना करण्यासाठी दिलेले आहे, अशा भूमिकेने लिहिलेला मजकूर वाचावा त्यासाठी लेखनकाम पूर्ण झाल्यावर काही दिवस जाऊ द्यावे लिहिले आहे त्याचा थोडेदिवस विसर पडू द्यावा जर हे काम घाईघाईने व तावडतोब केले तर नकळत आपणाकडून चुका होतात म्हणजे पुष्कळशा गोष्टी सदिग्धच राहतात, अपुऱ्या राहातात आपणास मात्र वाटत असते की सगळे अगदी मनाप्रमाणे जमले आहे विचाराचा डोक्यात कल्लोळ उडाल्याने खरी दुरुस्ती अशक्य होते त्यासाठी थोडा काळ जाणे अवश्य असते

## वाचकाची आठवण ठेवा

विषयाची आपली तयारी चांगली असल्याने आपणाकडून लेखन भरभर होते, पण त्या भरात आपण वाचकाची आठवण विसरतोच आपले ज्ञान हेच ह्या अवस्थेत आपल्या प्रतिपादनात सुगमता आणण्यात मोठा अडथळा करते तेव्हा सामान्य वाचकाच्या भूमिकेत शिरणे अवश्य असते त्याच्या दृष्टीतून लेखनाकडे पाहावे आपलीच संदिग्ध स्थळे आपल्या दृष्टोत्पत्तीस येतील काही गोष्टी राहूनच गेल्या आहेत असे आढळून येईल मोठ्या काटाकाळजीने त्या उणीवा घालवण्याचा प्रयत्न करणे अवश्य असते एकदा लिहिण्याची सवय झाली म्हणजे सामान्य माणसाच्या अडचणी तावडतोब कळतात व लेखन बरेच सुगम, सरळ, प्रवाही व बिनचूक होत जाते पण त्यासाठी प्रथम प्रयत्नपूर्वक काही गुण अंगिकारावे लागतात

## तर्कशुद्धता व सुसंगती

विवेचन हे तर्कदृष्ट्या बरोबर आहे की नाही हे बारकाईने पाहणे जरूर असते त्याप्रमाणे सादर केलेल्या लेखनात एक प्रकारचा एकमयपणा व सुसंगती हे गुण आलेले आहेत का हे पाहावे सबंध विवेचन हे अतिशय पक्के (फर्म), युक्तिवाद हा बिनतोड आहे व लेखनाला सुंदर स्थापत्यकृतीचा डौल आला आहे का ? की एखाद्या जुन्या मेंगाळलेल्या व खिळखिळ्या झालेल्या चंद्रमौळी घरासारखे आपले लेखन झाले आहे ? हे लक्षात घेऊन सुधारणा करणे आवश्यक आहे

एका मुद्द्यातून दुसरा मुद्दा स्वाभाविकरीतीने निघतो का, तसेच आपली विशिष्ट भूमिका ही प्रमाणशीर प्रमाणात विशद झाली का हे पाहा अंतर्बाह्य संगती आहे का हे काळजीपूर्वक बघावे विसंगती असेल तर ती प्रयत्नांनी काढून टाका अतिशय महत्त्वाची गोष्ट म्हणजे भाषा शब्दयोग्य आहेत की नाही ते पाहा शब्दाच्या आहारी जाणे बरोबर नव्हे एखादे वेळी एखादा शब्द फार आवडतो, त्याचा अर्थ माहीत नसतो पण तो उपयोगात आणला जातो आणि गैरसमजाना कारण होतो रियासतकार सरदेसायांनी एका पत्रात इतिहासकाराबद्दल अतिशय चुकीचा शब्द वापरला प्रकरण हातघाईवर आले शेवटी इतिहासकारांनी आपल्या गुरुजवळ–जदुनाथ सरकाराजवळ–ज्या शब्दावरून एवढे वादळ निघाले त्याचा खरा अर्थ आपणास माहीत नव्हता, अशी कबुली दिली असे पुष्कळ वेळा घडते त्याचप्रमाणे चुकीचे शब्दप्रयोग, वाक्प्रचार वापरले जातात पण कोणी चूक दाखवली की, आपला अभिमान जागृत होतो व मग आपण काहीतरी समर्थन करतो हे सर्व लक्षात घरून सर्व दृष्टींनी आपले लेखन पाहिल्यावर आपल्याला समाधान वाटले की शेवटची प्रत लिहावयास घ्यावी

प्रकरणाच्या शेवटी सबध प्रकरणाचा साराश थोडक्यात देणे चागले पुढचा मुद्दा कोणता येणे शक्य आहे त्याप्रमाणे काही गोष्टी अद्याप उजेडात यावयाच्या आहेत इ बद्दल यावेळी उल्लेख करता येतो कित्येकाची अशी समजत आहे की शोधक्रियेमागे आधार इ चे एवढे लोढणे लावले जाते की, त्यायोगे लेखनात जोरच येत नाही सगळे लेखन 'त्वयार्धं मयार्धं' स्वरूपाचे होते हे म्हणणे तितकेसे बरोबर नाही असे होणे शक्य आहे हे खरे आहे ते घालविण्यासाठी रसेल इ सारखे लेखक किती तर्कशुद्ध पण प्रभावी युक्तिवाद करतात ते पाहाण्यासारखे असते अशा काही युक्तिवादप्रवीणाचे लेखन काळजीपूर्वक वाचावे हे सारे केले तर आपल्या पदरात काही निश्चित पडेल असे वाटेल

शेवटची (फायनल) प्रत सिद्ध करताना विशेष दक्षता घेणे विद्यापीठासाठी प्रबध तयार करावयाचा असेल तर कागदाचा आकार, टकलेखना (टायपिंग) बाबतच्या सूचना इ विद्यापीठाने निश्चित केलेल्या असतात, त्या मानाव्या लागतात त्याचा अवलब तारतम्याने इतरत्रही करावयास हरकत नाही विद्यापीठाच्या नियमान्वये सामान्यत दोन शीर्षके लागतात पहिले अगदी सुटसुटित पण अन्वर्थक, व दुसरे विषयाची कल्पना अधिक स्पष्टतेने विशद करणारे ही दोन्ही विचार पूर्वक ठरवा काही विद्यापीठाकडून आणखी एक गोष्ट अपेक्षित असते या दोन शीर्षकाशिवाय लेखकाने प्रबधासाठी निवडलेले एखादे बोधवचन आवश्यक असते त्याचाही विचार अगोदर करून ठेवावा लागतो

यापुढची महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रबधातील विषय, विवेचनपद्धती, निष्कर्ष, कार्यपद्धती, इ, बाबीबाबतची लेखकाची भूमिका व्यक्त करणारे असे एक साराश-दर्शक विवेचन (सिनॉप्सिस) तयार करणे, ही होय (अर्थात प्रबधाच्या प्रारभी ते असावयास हवे असे नाही)

हे सारे नियम असले तरी त्यानी एक प्रकारचे प्रशिक्षण होईल अशी अपेक्षा असल्याने ते अनिवार्य आहेत त्यामागील भूमिका लक्षात घ्यावी साराश देताना किंवा भूमिका विशद करताना विषयावरील इतरानी केलेल्या विवेचनाचा साधार उल्लेख करून लेखकाने कोणत्या प्रकारची भर घातली आहे व ती कशी नवीन प्रकारची आहे, हे स्पष्ट करणे अवश्य असते

विद्यापीठाकडे प्रबध पाठवावयाचा नसेल तरी या नियमाचे अवलबन तारतम्याने करावे कारण नियम नसले तरी अपेक्षित सस्करण हे स्पष्ट व्हावे लागते सर्व लेखन अगदी बारकाईने पुन पुन वाचून त्यातील त्रुटी काढून टाकण्याच्या दृष्टीने सपूर्णपणे ते सपादित करावे उणीवा दूर कराव्या चुकाची दुरुस्ती करावी

एवढे झाल्यावर आपल्या लिखिताचा क्रम पुढीलप्रमाणे लावावा

भाग १ : प्रास्ताविक निर्देश

(१) मुखपृष्ठ : त्यात पुढील गोष्टी असाव्यात. मथळा (शीर्षक), उपशीर्षक, विद्यार्थ्याचे नाव, दिनांक, व अन्य महत्त्वाची माहिती [विद्यार्थ्याच्या पदव्या, विद्यापीठ, ठिकाण, इ.]

(२) प्रस्तावना (प्रास्ताविक निवेदन), भूमिका, उद्देश, पद्धती, आभारनिर्देश, इ.

(३) विषयानुक्रमणिका (प्रकरणश: सविस्तर असावी)

(४) उपयोगात आणलेले तक्ते, कोष्टके, नकाशे इ.

(५) आकृत्यांचा उल्लेख

(६) विशिष्ट प्रकारची संक्षिप्त रूपे वापरली असतील तर ती स्पष्ट करावी.

[ ह्या पृष्ठावर वेगळे पृष्ठांक येतात. ]

भाग २ : मुख्य ग्रंथ, उर्फ ग्रंथ संहिता ( टेक्स्ट )

शक्य तो प्रत्येक पृष्ठाच्या वरच्या बाजूस पुस्तकाचे नाव असावे. विभागणी प्रकरणश: असतेच. नवे प्रकरण नव्या पानावर सुरू करावे. प्रकरण सुरू होण्यापूर्वी एक पान कोरे सोडून त्यावर प्रकरणाचे शीर्षक लिहावे. याला अर्धमुख-पृष्ठ (हाफ् टायटल् पेज) असे म्हणतात.

नित्येक लेखक आपली भूमिका, उद्देश, पद्धती, इ. स्पष्ट करणारे विवेचन या भागात प्रारंभी घालतात. योग्य वाटेल तसे करणे इष्ट. निश्चित नियम नाहीत.

भाग ३ : संदर्भ-साहाय्य

(१) परिशिष्टे : काटेकोरपणे ग्रंथाचा भाग नव्हे, पण ग्रंथवाचनाच्या संदर्भात ती उपयुक्त ठरण्यासारखी असावी. पूरक तक्ते, कोष्टके, नकाशे, याद्या इ. यात येतात.

(२) सूची : पूर्वी सूचना आलेल्या आहेतच, त्याप्रमाणे तयार करावी.

बळकट अशा कव्हरमध्ये ही प्रत बांधावी. त्यावर विद्यार्थी, विषय, परीक्षा, तारीख इ. चा उल्लेख असावा.

ह्या दिसावयास अतिशय सामान्य गोष्टी आहेत. पण त्यांचा अवलंब, त्यांचे महत्त्व पटल्याशिवाय वा मुद्दाम लक्ष दिल्याविना होत नाही. संशोधन ही पूर्वी उल्लेखिलेल्या प्रमाणे एकप्रकारची शिस्त आहे. ती जशी विषय-मांडणी, विचार, आशय इ. त प्रकट होते तशी ग्रंथ सादर करण्याच्या पद्धतीतही दिसून येते. त्यायोगे एकप्रकारचा व्यवस्थितपणा, नेटकेपणा येतो, तोही संशोधनाचा एक उपांग स्वरूपाचा भाग आहे हे लक्षात घेतल्यास ह्या विवरणाचे महत्त्व पटेल.

# ५

# शोधक्रियेचे अंतरंग—

*प्रास्ताविक :*

संशोधनाच्या क्षेत्रात महत्त्वाच्या मानल्या गेलेल्या अनेकविध गोष्टींचे स्वरूप आतापर्यंत आपण परिचित करून घेतले विविध क्षेत्रात संशोधनासाठी निरनिराळ्या पद्धतींचा व भूमिकांचा अवलंब कसा करावा लागतो, हेही आतापर्यंत पाहण्याचा प्रयत्न केला. संशोधनाच्या व एकंदर बौद्धिक व्यापाराशी संबद्ध असलेल्या एका महत्त्वाच्या गुणाचा ऊहापोह ह्या प्रकरणात करावयाचा आहे. संशोधनाचे या कोणत्याही बौद्धिक व्यवहाराचे अव्वलपण ह्या गुणावर अवलंबून असते. प्रतिभावंतांचा, म्हणजे कवी, कलावंत इत्यादींचा ह्या गुणावर विशेष हक्क मान्य केला गेला आहे. एका साध्या शालेय निबंधापासून तो महाकाव्य प्रबंधापर्यंत पसरलेल्या विशाल साहित्यात, किंबहुना प्रत्येक वाङ्मयीन उपक्रमाच्या तसेच संशोधकाच्या अंतरंगाशी घनिष्टपणे निगडित झालेला व त्याचबरोबर चर्चेत सहसा न सापडणारा महत्त्वाचा गुण म्हणजे "मौलिकता" (ओरिजिनॅलिटी) हा होय. इतर प्रतिशब्दांपेक्षा येथील विवेचनाच्या दृष्टीने हा शब्द योग्य वाटला.

काव्यनाटकादी रचनाप्रधान वाङ्मयप्रकारात मौलिकता ही सृजनव्यापाराच्या रूपाने दृगोचर होते असे मानले जाते, पण निबंध-प्रबंधासारख्या हेतू-पूर्ण लिखाणात तिचे स्वरूप कसे प्रगट होते हे पाहण्यासारखे आहे. संशोधनावरील ग्रंथांत मौलिकतेची चर्चा आढळली नाही. पण संशोधनाशी एका परीने मौलिकता अत्यंत घनिष्टपणे संलग्न झाली आहे मौलिकता ही एका वेळेला प्रतिभेचे अपत्य असे मानले जात

असे ज्याच्या ठिकाणी मौलिकता असते, त्याला निरनिराळ्या कठिण समस्या सोडवण्यात तरबेज असे मन लाभलेले असते, असे विश्वासपूर्वक गृहीत धरले जात असे पण आजच्या ह्या लोकशाहीच्या व मानसशास्त्राचा विकास झाला आहे अशा युगात मौलिकता (ओरिजिनॅलिटी) ही विशेष गूढ अशी शक्ती राहिलेली नाही सर्वसामान्य अभ्यासकाला थोड्या-फार प्रयत्नांनी ती काही प्रमाणात आत्मसात करता येते प्रबंधासारख्या प्रयोजनप्रधान लेखनात ती कशी आणता येणे शक्य आहे, निदान प्रसिद्ध निबंध ग्रंथात तिचे दर्शन कसे घडते हे पाहणे अभ्यासकाच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे

## संशोधनाकूल मनाचे प्रकार

संशोधनासाठी विशिष्ट प्रकारचे मन किंवा मनाची विशिष्ट ठेवण अवश्य असते पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ प्रो गिल्मन यांनी संशोधनानुकूल मनाचे (रीसर्च माइण्ड) काही प्रकार कल्पिलेले आहेत त्यांचा उल्लेख याठिकाणी करणे योग्य होईल "सम इम्प्लिकेशन्स ऑफ रीसर्च" या पुस्तकात त्यांनी विवेचन केले आहे अगदी पहिल्या प्रकारचे मन मनोरथ मन (प्रॉमीथियन माइंड) हे कोणत्या तरी प्रकारच्या असामान्यतेकडे झेप घेत असते सर्वत्र लागू पडणारे असे एखादे तत्त्व किंवा सिद्धान्त अशा महामनाकडून शोधिले जातात आइन्स्टाइनसारखे, कीन्ससारखे, महान् संशोधक ह्या श्रेणीतले होत दुसऱ्या प्रकारच्या मनाचा धर्म म्हणजे अतिशय चिकित्सकता (हायली क्रिटिकल) व पृथक्करण-क्षमता (अॅनॅलिटिकल सेन्स) हे मन कोणतीही गोष्ट गृहीत धरावयास तयारच नसते अखंड प्रश्नांकितता हे याचे प्रमुख लक्षण याच्या विशिष्ट गुणधर्मामुळे अतिशय गुंतागुंतीच्या परिस्थितीतून किंवा विषयातून हे मन बरोबर मार्ग काढू शकते मनाचा तिसरा प्रकार म्हणजे संग्रहवादी व विगमनशील (क्युमिलेटिव्ह व इंडक्टिव्ह) प्रवृत्तीच्या मनाचा. वाङ्मयाभ्यासानुकूल अशी या मनाची प्रवृत्ती असते स्थानिक परिस्थितीचे निदान करण्यात हे मन तरबेज असते आणखी एक प्रकार म्हणजे संग्रहवादी व वर्णनप्रेमी (क्युमिलेटिव्ह व डिस्क्रिप्टिव्ह) मनाचा पाहिलेली गोष्ट वा परिस्थिती तिच्या बारकाव्यासह वर्णन सांगण्याची हातोटी, हे मन असणाऱ्या लोकांना लाभलेली असते पाहिलेले काही विसरायला हे लोक तयार नसतात कष्टाळू मन हा मनाचा पुढचा पुढचा प्रकार कोणत्याही प्रकारची हयगय न करता बिनचूकपणा, खुलासेवार (डिटेल्स) विशिष्ट आग्रह व बारकावा, व्यापक अशा समालोचना (जनरलायझेशन)-पेक्षा विशिष्ट पद्धतीकडे या लोकांचा अधिक कल असतो त्यासाठी अमाप श्रम करण्याची अशा लोकांची तयारी असते म्हणून अशा मनाला कष्टाळू (मेटिक्युलस)

मन अशी संज्ञा यथार्थतेने देणे योग्य ठरते. शेवटी नेहमीच्या परिचयाचे म्हणजे घडपडे मन. रूढ अर्थाने उद्योगी, ठरीव मार्गांनी जाऊन प्रश्नाचा अभ्यास करणारे, असे मन.

## आपल्या मनाची ठेवण ओळखणे जरूर

मनाची ही विभागणी अर्थातच काटेकोरपणाने घ्यायची नाही. परंतु सकलित रीतीने पाहता संशोधनानुकूल मनाची लक्षणे, गुणधर्म, वैशिष्ट्ये कोणती याची या पृथक्करणावरून स्थूल कल्पना येण्यास मदत होईल. आपल्या मनाची धारणा लक्षात घेऊन आपला विषय निवडणे योग्य होईल. उदाहरणार्थ, आपले मन जर विशेष विचिकित्सक नसेल तर तात्त्विक स्वरूपाचे विषय टाळणे योग्य होईल. काही लोकांना तत्त्वापेक्षा तपशीलाचे महत्त्व वा आकर्षण अधिक वाटते, अशांनी आपला संशोधन विषय निवडताना ज्यात तपशिलाला भरपूर अवसर आहे, अशा प्रकारचा विषय घ्यावा. उलट ज्यांच्या मनाला तत्त्वशोधकपणाची आवड आहे व तपशिलाचा त्या प्रमाणात कंटाळा आहे, अशा लोकांनी तसा विषय निवडावा.

## संशोधकास आवश्यक गुण

असे असले तरी संशोधकाला मानसिक पात्रतेच्या दृष्टीने चार गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे. पहिली अपार कष्ट करण्याची प्रवृत्ती. मोठमोठ्या संशोधकांनी किती अनंत कष्ट उपसलेले आहेत याची कल्पना त्यांच्या चरित्रावरून येऊ शकते. महानुभावांची गुप्त लिपी शोधण्यासाठी इतिहासाचार्य राजवाड्यांनी आपणाला चवदा दिवस कोंडून घेतले होते. कोणत्याही संशोधनात कष्ट हे अतिशय प्राथमिक स्वरूपाचे व आवश्यक असे द्रव्य आहे. नंतरचा गुण म्हणजे विशेष प्रकारची चिकित्सकता व पृथक्करणक्षमता, संशोधनाच्या मौलिकतेचा गाभा म्हणजे हे गुण होत. कोणताही विषय असो त्याचा खडक या गुणाच्या छिन्नीने फोडून काढता येतो. पुढचा अवश्य असा गुण म्हणजे अवलोकनातील बारकावा. कित्येकांच्या ठिकाणी ही शक्ती जबरदस्त असते. संशोधनात अवलोकनाला विशेष स्थान आहे. हे अवलोकन नेहमीप्रमाणे भाबडे नसते. ते कवीआदी कलावंतांच्याप्रमाणे सौंदर्याधिष्ठित नसते, तर ते कार्यकारणसंबंधावर (कॉजल-रिलेशन्स) आधारलेले असते. कार्यकारण संबंधाची पाहणी हा संशोधनाचा डोळा आहे. याशिवाय तत्त्वशोधकता ही महत्त्वाची असते. कारण तीशिवाय संशोधनापासून निष्कर्ष काढणे अशक्य होईल. ह्या गुणांपैकी काही उपजत असतील तर फारच चांगले. पण तसे नसतील तरी संशोधनासाठी ह्या गुणांची जोपासना करणे योग्य होईल. संशोधन हा कष्टाचा मार्ग आहे. ते

संपल्यावरही त्याचा व्रण (स्कार) मनावर दीर्घकाल टिकून राहतो. रॉबर्ट लिंड यांनी मिडल्टाउन या गावात राहून त्याची पाहणी केली, व 'मिडलटाउन इन ट्रान्झिशन' असे पुस्तक लिहिले. त्याच्या प्रस्तावनेत ते म्हणतात :

"Every extended piece of painstaking research leaves a kind of emotional scar tissue in the investigator. In the case of Middletown it was three years and half in a mood alternating between enthusiasm and weary disgust as the job worms its exhausting course through rough draft, revision, checking and cross-checking and compression for publication." या वरून संशोधकाच्या कामातील कष्टाची कल्पना येईल.

## इतर काही मते

संशोधनात मौलिकता आणण्यात संशोधकाच्या ठायीच्या अनेक गुणांचा उपयोग होतो. अनेक लेखकांनी निरनिराळ्या गुणांकडे लक्ष वेधले आहे. प्रोफेसर यूल्फ यांच्या मते मौलिकता शास्त्रीय वृत्तीत आहे. ही शास्त्रीय वृत्ती काय आहे ? ते म्हणतात —

Scientific attitude rests upon one and only one fundamental article of faith—faith in the universality of cause and effect."

प्रा. ई. डब्ल्यू. ॲलॅन यांच्या मते, संशोधन विद्यार्थ्याने स्वतंत्रपणे काम करण्याचे कौशल्य आत्मसात करावयास हवे. इतर विरयेकांनी विद्यार्थ्यांच्या स्वतःच्या विषयातल्या पारंगततेवर भर दिलेला आहे. दुसऱ्या इतरांनी विषयाचे भेदक पृथक्करण करण्यास जसे विद्यार्थ्याने शिकले पाहिजे तसेच पुढल्या अवस्थेमध्ये त्याने विषयाची नावीन्यपूर्ण नवरचना (सिंथेसिस) ही करणे जरूर आहे, ह्या गोष्टीवर भर दिलेला आहे.

बऱ्याच जणांचा आग्रह अर्थातच व्यक्तिगत गुणसमुच्चयावर आहे. पहिली गोष्ट म्हणजे मिळविलेल्या साधनांचे (डाटा) योग्यायोग्यत्व, लागेंरलागपण इ. प्रकारचे महत्त्व चटकन ओळखता आले पाहिजे. निर्णय घेणे, निष्कर्ष काढणे (जजमेंट) हे अतिशय महत्त्वाचे असते. हे गुण काही उपजत असतील तर काही प्रयत्नांनी मिळवावे लागतील. डॉ. एम्. एच्. गोपाळ यांनी आपल्या पुस्तकात एक प्रकारची समतोलपणा व शिस्त, या गुणाबरोबर अन्य गुणांची एक यादी त्याच्या प्रमाणासह दिलेली आहे. ती येथे उद्धृत करणे योग्य होईल.

सेंद्रिय एकात्मता, संघटनात्मक सौष्ठव, ही सारी कलाकृतीची वैशिष्टये संशोधन-लेखनासही पूर्णपणे लागू पडतात एवढेच नव्हे तर संशोधनात्मक लेखनाला स्वत चा एक घाट (फॉर्म) आहे असेही म्हणणे वस्तुस्थितीस धरुन होईल याचा अर्थ संशोधन प्रबंधात किंवा शोध-निबंधात या निरनिराळ्या अंगोपांगात एक प्रकारचे सोद्देश्यत्व वा साभिप्रायत्व आणण्याचा प्रयत्न केला तर संशोधनात मौलिकतेस (ऑरिजिनॅलिटी) भरपूर अवसर आहे मानसशास्त्रीय भूमिकेवरुन पाहू गेले तर सृजनाधिष्ठित चिंतन (क्रिएटिव थिंकिंग) व एखाद्या प्रश्नाची मोडवणूक करण्यासाठी केलेले चिंतन (ॲनॅलिटिकल थिंकिंग) यात फारसा फरक नाही संश्लेषण व विश्लेषण या दोन्ही क्रियांचा उपयोग दोहोंत सामान्य आहे त्याच्या अवलंबनाचे स्वरुप वेगळे आहे एवढेच मौलिकतेचे स्वरुप स्पष्ट होण्यासाठी विचारक्रिया चालू असतानाच्या मानसिक घडामोडीची कल्पना असणे अवश्य आहे

### थोडी विचार-चिकित्सा

मनुष्याच्या विचारप्रक्रियेत विविध प्रकारच्या संबद्ध गोष्टींना (ॲसोसिएशन्स) विशेष महत्त्व आहे एखाद्या व्यक्तीला एखादा शब्द उच्चारल्याबरोबर त्याच्या मनात झटकन येणारा कोणताही शब्द उच्चारावयास सांगितले, त्याच्यावर कोणत्याही प्रकारचे बन्धन घातले नाही, म्हणजे मुक्तसंबंधाचे (फ्री असोसिएशन) स्वरुप पाहण्याचा प्रयत्न केला, तरी आपणास मानसशास्त्रात संबंध-मुक्तता (फ्री ॲसोसिएशन) नाही असे आढळून येईल उदा , 'टेबल' हा शब्द उच्चारल्याबरोबर काहींना 'खुर्ची' 'मेज' 'शाळा' सभा इ शब्द सुचतील, तर कित्येकांना रुमाल, पठार, मीठ असे शब्द सुचतील याउलट काहींची प्रतिक्रिया झाड, कुत्रा, स्त्री, अमेरिका इ शब्दांनीही व्यक्त होईल बाह्यत 'मुक्त' (फ्री) असणाऱ्या या संबंधामागे कोणत्यातरी प्रकारचे साहचर्य आहे, असे आढळून येईल जेव्हा आपण काही आठवणी आठवतो, एखादे दिवास्वप्न पाहतो तेव्हाही अशाच अनेक संबद्ध गोष्टी मनात येतात या संबंधाचा अभ्यास करुन बाह्यत परिपूर्णतया मुक्त असणाऱ्या स्वप्नानुभवासारख्या गोष्टींतील सुसंबद्धता शोधून काढण्याचा प्रयत्न फ्रॉईडने केलेला आहे या सर्वांवरुन आपणास एक प्रकारचा निष्कर्ष काढता येतो की, अशा प्रकारचे काही कार्यकारणभाव (कॉजल लॉज) किंवा तत्त्वे (प्रिन्सिपल्स) आहेत की जे एका विचारापासून दुसरा विचार कसा निघतो ते स्पष्ट करतात या संबंध-नियमांमुळे (लॉज ऑफ ॲसोसिएशन) एका विचारापासून दुसरा विचार कसा निर्माण होतो एवढेच कळते पण तो तसा का निर्माण होतो हे कळण्यास आणखी खोलात जावे लागते

## विविध नियंत्रणे (कंट्रोल्स)

एका विचारापासून दुसरा विचार का व कसा निर्माण होतो किंवा एका कल्पनेमधून दुसरी कल्पना का व कशी उद्‌भवते हे जर पाहावयाचे असेल तर आपणास मनावरील विविध प्रकारच्या नियंत्रणा (कंट्रोल्स) कडे वळावे लागते ही नियंत्रणे दोन प्रकारची असतात बाह्य व आतर उदा०, एखादी सख्या मनात धरा, असे एखाद्यास सांगितल्यानंतर त्याच्या मानसिक विचार-क्रियेस सुरुवात होते आता ती दुप्पट करा, तीत अमुक आकडा मिळवा. इ प्रकारच्या सूचनांनी आपण त्याच्यावर एक प्रकारचे बाह्य नियंत्रण (एक्स्टर्नल कंट्रोल) निर्माण करतो

उलट एखादी सख्या मनात आणा, असे सांगितल्यावर जो आकडा येतो तोही एका प्रकारच्या नियंत्रणातूनच निर्माण झालेला असेल म्हणजे तो त्याचा घर-नंबर, परीक्षा-नंबर अगर तत्सवधी आवडा असेल, तो आठविण्यात त्या व्यक्तीने एक प्रकारचे नियंत्रणच वापरलेले असते फक्त त्याचे स्वरूप वरच्या उदाहरणाप्रमाणे बाह्य नसून त्याची कारणे अतरगात कोठेतरी खोल दडलेली असतात हे आतर-नियंत्रण (इन्टर्नल कंट्रोल) होय

ही अतर्गत नियंत्रणे (इंटर्नल कंट्रोल) कसे कार्य करतात, हे पाहू गेले असता असे आढळून येते की, मनात निर्माण होणाऱ्या विचारांची, कल्पनांची सगळी मालिका ही एक प्रकारच्या हेतुगर्भ नियंत्रणांनी (मोटिव्हेशनल कंटोल्स) कार्यवाही झालेली असते ह्या हेतुगर्भतेमुळे सगळ्या विचारांचा, कल्पनांचा रोख ह्या कोणत्यातरी ध्येयाच्या वा उद्देशाच्या प्राप्तीच्या दिशेकडे असतो ही ध्येयप्राप्तीच्या दिशेने होणारी वाटचाल जाणीवपूर्वक केली असेल, किंवा नेणीवेतून (अन्‌कॉन्शस) ही तिचा उगम झालेला असेल व्यक्तीच्या मनोधारणेला कारणीभूत होणारी ध्येये, उद्दिष्टे वा आकर्षणे (आयडियल्स, इटेन्शन्स व इटरेस्टस) इ याच्या योगाने त्या नियंत्रणाचे स्वरूप निश्चित होते

## ही नियंत्रणे कशी कार्यवाही होतात

अशा रीतीने व्यक्तीच्या विचाराच्या धारणेत निरनिराळी सबद्ध ज्ञाने (असोसिएशन्स) व प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष नियंत्रणे (कंट्रोल्स) यांचा वाटा फार मोठा असतो त्याचबरोबर विचारधारणेत व्यक्तीच्या ठायीच्या ध्येय-उद्दिष्टादी विविध संस्कारांना फार मोठे स्थान असते ही जी नियंत्रणे असतात ती विविध प्रकारची असतात [ह्या प्रकारांना सेट (सेट) असे मानसशास्त्रीय परिभाषेत म्हणतात] उदाहरणार्थ, एखाद्याला ३ व ५ हे आकडे उच्चारल्यावरोबर त्याच्या मनात येणारा

पुढला आकडा मागावयास सांगितला तर तो, ७, १५ अगर ८ असे उत्तर सामान्यतः देईल. ९ हा सहसा आकडा सांगणार नाही. कारण या दोन आकड्यावरून काही तरी अदाज बाधून पुढचा आकडा तो सांगेल विविध 'गटा'(सेट)चे हे अगदी पहिले व मोघे उदाहरण. या तीन आकड्यावरून असे दिसेल की, विशिष्ट व्यक्ती ही बेरीज वा गुणाकार याच्या आधारे कोणत्या तरी व्यवस्थेच्या (सीक्वेन्स) शोधात होती.

हे अशा प्रकारचे सच अगदी तात्पुरते व चालचलाऊ होत. काही विशिष्ट सचाचा परिणाम वर्षानुवर्षे टिकतो, व विचाराना विशिष्ट घाट प्राप्त करून देतो. ह्याना विचार-सवयी (हॅबिट्स् ऑफ थॉट) असेही म्हणतात ह्या इतर सवयी-प्रमाणे व्यक्तिमत्वाचा अविभाज्य भाग होऊन बसतात शास्त्रज्ञाच्या ठायीची विशिष्ट चौकस प्रवृत्ती हे या प्रकारचे उदाहरण निरनिराळ्या प्रकारच्या आवडी-निवडी, तसेच पुराणप्रियता, नावीन्याची ओढ, बुद्धिनिष्ठता (रॅडिकॅलिझम) आशावाद, निराशावाद, प्रयत्नवाद, इत्यादी प्रवृत्तीही या प्रकारच्या विविध गटाची (सेट्स) उदाहरणे होत

यापैकी काही सच (सेट) हे व्यक्तीच्या प्रयत्नानी बुद्धिपुरस्सर तयार केलेले असतात, व विचार करणारा त्याबाबत जागृत असतो. उलट इतर काही विशिष्ट सच हे भावनाच्या, विचाराच्या विशिष्ट प्रकारच्या दडपणाने, वागणुकीबाबतच्या सकेतानी तयार झालेले असतात पण त्याचे नियत्रण विचारप्रक्रियेवर चालते, व म्हणून ते निरनिराळे नियत्रणाचे प्रकार मानावे लागतात.

## 'नावीन्या'चा उदय

या नियत्रणाचे कार्य कसे चालते हे काही मनोव्यापाराच्या पाहणीवरून स्पष्ट होईल उदाहरणार्थ, एखादी गोष्ट आपण जेव्हा आठवतो, किंवा विशिष्ट प्रकारच्या आठवणीवरून जेव्हा एखादे दिवास्वप्न पाहतो, तेव्हा आठवण्याच्या क्रियेला मूर्त स्वरूप देतो म्हणजे आपल्या मानसिक नियत्रणाचा वापर करून काही निवड करतो, व अशी निवडक प्रसग, घटना व कल्पना याची मालिका दृष्टीपुढे आणतो.

'स्मृती' (मेमरी)चे मुख्य काम म्हणजे नेहमी सेवेसाठी तिने तयार राहणे हे होय ज्याची स्मृती चागली असते त्याला योग्य गोष्टी, सदर्भ, इत्यादी वेळीच आठवतात असे आपण म्हणतो बारकाईने पाहिले तर हाही मनाला लावलेल्या विशिष्ट वळणाचा व त्यावर प्रस्थापित केलेल्या प्रभुत्वाचा भाग आहे. नियत्रणाचा योग्य प्रकारे वापर करून स्मृतीला तत्पर ठेविलेले असते एवढेच आपल्या उद्दिष्टाचा, तसेच विशिष्ट आकर्षणाचा (इटरेस्ट) वाटा त्यात फार मोठा असतो म्हणूनच अशा ठिकाणी नियत्रणाची घडतना (ऑर्गनायझेशन ऑफ कट्रोल्स) सुदृढ झालेली असते.

विचाराचे नावीन्य ही एका प्राथमिक व सार्वत्रिक अशा मनोधर्माची विशिष्ट प्रकारची फलश्रुती होय नावीन्य म्हणजे उपलब्ध अशा विशिष्ट प्रकारच्या कच्च्या मालासारख्या कशापासून तरी विधायक कृतिशीलतेचा (सिन्थेसिस) अवलब करून काही वेगळे निर्माण करण्याचे सामर्थ्य. या नावीन्याचे अनत प्रकार सभवतात कविलेखकादी विधायक विचार करणाऱ्याच्या ठिकाणी हे सामर्थ्य बरेच प्रगत झालेले असते, व त्याचे प्रगल्भ स्वरूप त्याच्या कृतीतून पाहावयास सापडते नावीन्य म्हणजे उपलब्ध अशा साहित्याची नवरचना शोभादर्शकामध्ये (कॅलिडियास्कोप) ज्याप्रमाणे प्रत्येक प्रयत्नाच्या वेळी आतील काचमण्यादी वस्तूची व्यवस्था बदलते व विविध नवनवीन आकृती निर्माण होतात, तसे नावीन्याचे आहे काव्यातील उदाहरण द्यायचे झाले तर मर्ढेकराच्या प्रसिद्ध ओळीचे देता येईल ही ओळ "घनश्याम सुदरा, श्रीधरा, गिरणोदय झाला ! उठि लौकरि दिनपाळी " अशी आहे किती थोडा बदल करून नवीनता आणता येते याचे हे एक सहज आठवलेले उदाहरण पण त्याचबरोबर त्या मागील मानसिक नियत्रणाची पकड किती पक्की असावी लागते, हे पण प्रतीत होईल

ह्या विवेचनावरून मनुष्याच्या विचारप्रक्रियेचे स्वरूप कसे चालू असते ते स्पष्ट होईल विचाराची पुनर्संघटना होत असते, तिला काहीतरी प्रबलतर असे उद्देश लागतात पोकळीत विचारक्रिया घडू शकत नाही जेव्हा एखाद्या विशिष्ट दिशेने मनबुद्धीचा एकत्रित असा परिशोध सुरू होतो, तेव्हाच विधायक विचारशीलता साकार होते एखाद्या प्रश्नाची जेव्हा एखाद्या दिशेने सोडवणूक करावयाची असते, तेव्हा तिला विशेष तेज येते मागील प्रकरणात शास्त्रीय पद्धतीचे विवेचन करताना ज्या विविध पायऱ्याचा उल्लेख केला आहे त्याची आठवण करून देणे या ठिकाणी योग्य होईल.

या शोधक्रियेचे अनेक पर्याय सभवतात पण त्यामागील अवलोकनादी गृहीतकृत्ये समान आहेत शास्त्रीय सशोधनात प्रयोगाना महत्त्व प्राप्त होते, तर वाङ्मयादी इतर क्षेत्रात निरनिराळ्या क्रिया ह्या डोक्यातच चालू असतात अर्थात पुस्तकादी साहित्याचा वारवार उपयोग करणे चालूच असते, हा भाग वेगळा

*शोध-क्रियेचा शोध*

सशोधन-प्रयत्नामागे एक विवक्षित प्रक्रिया अनुस्यूत घरलेली आहे म्हणजे विशिष्ट समस्या-पाहणीसाठी (इन्व्हेस्टिगेशन) पुढे घेऊन तिची सोडवणूक करणे ही क्रिया कशा प्रकारची असते, हे दोन-तीन प्रकारच्या उदाहरणानी स्पष्ट होईल अगदी पहिले उदाहरण म्हणजे प्लायवूडचे विविध चित्रविचित्र आकाराचे तुकडे एकत्र

*जोडून एक सलग अशी आकृती तयार करण्याच्या खेळण्याचे होय* *यात खेळणाराला* अदाजाने आकाराचा वारकावा ट्रेस्न, खोचा-खोवणी ओळखून तुकडे एकमेकास जोडण्याचे काम करावे लागते मग च मच जोडला गेला की हे काम मपते तुकड्याच्या आकाराच्या चित्रविचित्रपणामुळे एक तुकडा जमला नाही तर दुसरा, अशा पद्धतीने सर्व उत्तर मिळेपर्यंत—म्हणजे सलग आकृती तयार होईपर्यंत—विविध उपक्रम करीत राहावे लागते ही क्रिया पुष्कळशी शास्त्रीय पद्धतीशी जुळणारी आहे दुसरे उदाहरण शब्दकोडी सोडविण्याच्या पद्धतीचे देण्यात येते उदा०, एक सहा अक्षरी शब्द प्रसिद्ध व्यक्तीचे नाव आहे पहिले अक्षर 'ज' आहे शेवटचे 'ल' आहे चवथे 'र' आहे अशा प्रकारच्या सूचना (क्ल्यू) दिल्यामुळे विचारक्रिया आपोआप *बंदिस्त होते अनेक संभाव्य उत्तरे ऊर्फ मार्ग सुचतात, पण दिलेल्या सूचनाद्वारे त्यांची* परीक्षा करुन योग्य ती उत्तरे घेऊन बाकीची गाळावी लागतात 'ज' ने सुरु होणारी अनेक नावे पुढे येतील, पण सहा अक्षराच्या सख्येमुळे व शेवटचे अक्षर 'ल' आहे या सूचनेमुळे आपली निवड आपोआप बंदिस्त होते चवथे अक्षर 'र' पर्यंत आपला शोध चालू राहातो जवाहरलाल ह्या शब्दासारखा शब्द सापडल्यावर सगळ्या अटी पूर्ण होतात व प्रश्नाचे उत्तर सापडते तिसरे उदाहरण एका कुलुपासाठी अनेक किल्ल्यामधून योग्य किल्ली शोधून काढण्याच्या क्रियेचे

या तीनही उदाहरणात कोणते तरी निश्चित उत्तर तयार आहे व बरोबर तर्क लढवून, प्रयत्न करुन ते शोधून काढणे, एवढेच काम अभ्यासकाला, प्रयत्नकाला करावयाचे असते पण *प्रत्यक्ष शोधक्रियेत अशी उत्तरे तयार नसतात आणि अशी नीट* तयार केलेली साधनेपण नसतात, निरनिराळे नियमही नसतात ह्या साऱ्या गोष्टी संशोधकाला प्रयत्नानी शोधून काढाव्या लागतात, सिद्ध करून घ्याव्या लागतात आणि मनबुद्धीवर विविध प्रकारची नियंत्रणे ठेवून 'शोध' ऊर्फ संशोधन करावे लागते

## मनाला शिस्त लावण्याचे विविध प्रयत्न

अशा रीतीने शोधक्रियेत विविध प्रकारची 'नियंत्रणे' ही स्वत च निर्माण करुन त्याची बंधने पाळावी लागतात मनाला या नियंत्रणाचे शिक्षण कसे द्यायचे हा प्रश्न पूर्वी निर्माण झाला, तेव्हा मनाला एक प्रकारची प्राथमिक शिस्त (फॉर्मल डिसिप्लीन) लावायला हवी, अशी जरुरी भासली त्या गरजेतून असा एक विचार पुष्कळ काळ रूढ होता की, गणिताच्या अभ्यासाने मनाला ही शिस्त लागते अर्थात अलीकडील मानसशास्त्रीय पाहणीतून ह्या कल्पनेच्या मर्यादा स्पष्ट झालेल्या आहेत म्हणजे ही शिस्त लागते, पण तिचा उपयोग काही मर्यादित क्षेत्रातच होतो पूर्वी कल्पिल्याप्रमाणे सर्व क्षेत्रात त्या शिस्तीचे रुपांतर होत नाही अलीकडे या शिस्तीसाठी

सत्याशास्त्राचे प्राथमिक तात्त्विक ज्ञान आवश्यक आहे, असा एक विचार रूढ होऊ पाहात आहे निदान उपयुक्ततावादी शास्त्रांना तरी ते ज्ञान उपयुक्त होईल काही लोकांनी या दृष्टीने तर्कशास्त्राचीही बाजू अशीच पुढे मांडली आहे निरनिराळी विधाने, त्यांचे प्रकार, विविध पुरावे, इत्यादी गोष्टींच्या माहितीमुळे मनावर योग्य संस्कार झाले व ते मनावर चांगले बिंबले तर विचारपद्धती निश्चितपणे सुधारते पुष्कळसे प्रश्न हे विगमनात्मक वा निगमनात्मक पद्धतींच्या (इंडक्शन व डिडक्शन) अवलंबनाने सोडवले जातात विविध प्रकारचे निगमनात्मक (डिडक्टिव्ह) आधार वा पुरावे शोधणे हे तत्त्वजिगीषु मनाचे (फिलॉसॉफिकल कास्ट ऑफ् माइंड) लक्षण आहे; उलट, अनेक प्रकारच्या पुराव्यांच्या आधारे विशिष्ट निष्कर्ष वा तत्त्व शोधून काढणे, हे शास्त्रीय प्रवृत्ती प्रबळ असलेल्या मनाचे (सायंटिफिक बेंड ऑफ् माइंड) लक्षण आहे

अशा प्रकारची ही स्वाभाविक नियंत्रणे (फॉर्मल कंट्रोल्स) केवळ शास्त्राच्या या तात्त्विक अभ्यासातच महत्त्वाची आहेत असे नाही. एखादा श्रेष्ठ प्रकारचा निबंधकार (मराठीतील उदाहरण द्यायचे झाले, तर विनोबा भावे यांच्या लेखनाचे देता येईल) आपला आशय विलक्षण तर्कशुद्ध रीतीने मांडण्यात वा गळी उतरविण्यात अतिशय तरबेज झालेला असतो एखादा युक्तिवाद प्रभावी रीतीने मांडण्याची एखाद्या लेखकाची वा विचारवंताची विशिष्ट लकब पाहून त्याला हे कौशल्य उपजत लाभलेले असावे असे वाटते. पण तसे नाही हे त्या लोकांनी प्रयत्नांनी मिळविलेले यश होय. त्या लकबा म्हणजे त्यांच्या मनाच्या वर आलेल्या सवयीच होत.

## स्फूर्ती म्हणजे अंतरमनाच्या परिशोधाला गवसलेले उत्तर

अशा प्रकारे एका विशिष्ट समस्येची जाणीव झाल्यावर व तिच्या सोडवणुकीचे वेध मनाला लागल्यानंतर मनाचा त्या दिशेने परिशोध (इन्व्हेस्टिगेशन, सर्च) सुरू होतो अनेक उपाय वा मार्ग सुचतात, त्यांचे परीक्षण मनाला प्राप्त झालेल्या नियंत्रणाद्वारे सुरू असते काही मार्ग वा उपाय सोडून द्यावे लागतात, काही बदलून परिष्कृत करून घ्यावे, लागतात, पुन ते नियंत्रणाच्या कसोटीवर घासले जातात, अशी प्रक्रिया सतत चालू असता, कधी कधी एकाएकी अंतिम संयोजन (फायनल सिंथेसिस) साधते, शोधकाला अतिशय आनंद होतो त्याच्या तत्त्वजिगीषुतेचा तो विजय असतो पण यात एक प्रकारच्या सुदैवाचा वा योगायोगाचा भाग बराच असतो, हे नाकारता येत नाही हे ज्यावेळी घडते त्यावेळी शोधकाला तत्त्वस्फूर्ती झाल्याचा भास होतो [ त्या जाणिवेने आर्किमिडीज आपल्या स्नानगृहाबाहेर वस्त्रावरणाची शुद्धबुद्ध हरपून बाहेर येतो ] ही अंतिम शोध-साफल्याची क्रिया घडेलच किंवा केव्हा घडेल हेही सांगता येत नाही सफरचंद झाडावरून खाली पडलेले पाहून न्यूटनला गुरुत्वाकर्षणाच्या तत्त्वाचा साक्षात्कार

झाला त्या क्षणी त्याला स्फूर्ती झाली असे म्हणतात, पण खरे तसे नसून विशिष्ट प्रकारच्या शोधात असलेल्या मनाला सापडलेल्या योग्य उत्तराचा तो क्षण होय जेवढा तो अनपेक्षित, अगम्य, वा दैवी वाटतो तसा तो नाही आधुनिक मानसशास्त्राने या घटनेवर पुष्कळ प्रकाश पाडलेला आहे

- योग्य दिशेने केलेला (केल डायरेक्टेड) अदाज (गेस) हा काही कसोटचावर उतरला की त्याचे ' उत्स्फूर्त साक्षात्कारा 'त रूपातर होते तो कसोटयावर उतरणे अगर न उतरणे फारसे महत्त्वाचे नाही कारण त्यात बराच योगायोगाचा भाग आहे पण खरे महत्त्व आहे ते अदाज योग्य दिशेने होत आहे ह्या गोष्टीचे शोधक-प्रवृत्तीला अतिम शोध-माफल्याचा (फायनल सिंथेसिस) आनद लाभणारही नाही पण खरे महत्त्व अतिम शोधाचे नाही तर, त्यामागील सघटित अशा प्रकारच्या विविध नियत्रणाचे होय

## *शास्त्रीय पद्धतीचे मानसिक अधिष्ठान*

विधायक नियत्रणामुळे विचाराना एक प्रकारची प्रेरणा मिळते, तसेच ते विकासक्षम होतात शब्दकोड्याच्या उदाहरणात शब्दाची निवड स्वत च्या आठवणीतून शब्द काढून किंवा शब्दकोशातून काढून केली जाते शास्त्रीय सशोधनात नवीन चौकशीवर बराच भर असतो स्वत ची माहिती त्या मानाने बरीच अल्प असते, त्यायोगे गुतागुतीची सशोधन-यत्रणा सिद्ध झालेली आहे या ठिकाणी ही गोष्ट लक्षात ठेवावयास हवी की, विचारापासून अवलोकन व अवलोकनाची पद्धती या दोन्ही गोष्टी उत्पन्न होतात अवलोकन हे बिनचूक व योग्य दिशेने असण्यासाठी दोन गोष्टीची अत्यत आवश्यकता असते त्या गोष्टी म्हणजे निवड (सिलेक्शन), तसेच प्रश्न व उपप्रश्न निर्माण करण्याची प्रवृत्ती (इटरॉगेशन) ह्या होत

विचार-क्रियेवरील नियत्रणाना शास्त्रीय पद्धतीच्या अवलबनात वेगळेच स्वरूप प्राप्त होते नुसते अदाज हे या पद्धतीत गृहीतपक्ष (हायपॉथेसिस) होतात त्याचेही परत परीक्षण करावे लागते अशा रीतीने विचारामधील मानसिक घटनाना शास्त्रीय पद्धतीत थोडचा फार फरकाने, विशिष्ट सिद्धान्ताचे स्वरूप प्राप्त होते

*विचाराच्या मानसिक प्रक्रियेसबधीची एवढी पाहणी* केल्यावर पुढील प्रश्नाची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करणे योग्य होईल

(१) विचाराची कार्यक्षमता (एफिशीएन्सी) कोणत्या कारणावर अवलबून असते ?

(२) एखादी समस्या कोणत्या परिस्थितीत सोडविली जाते व

(३) आपणास मौलिक कल्पना कशा सुचतात ?

विचाराच्या कार्यक्षमतेविषयी असे म्हणता येईल की ती दोन तीन बाबीवर अवलंबून आहे. पहिली म्हणजे विशिष्ट उद्दिष्ट (मोटिव्हेशन), दुसरी मनाला लागलेली शिस्त व मनावरील नियंत्रण ही होय. आपणास विशिष्ट अडचण सोडवावयाचीच आहे, अशी तीव्र जाणीव हीच अडचणीवर मात करण्याची पूर्वतयारी होय. इच्छाशक्ती म्हणजे केवळ भावनात्मक तीव्रता नसून तीत सहनशीलतेचा कष्टाचा वाटा फार मोठा असतो. कारण कित्येकदा एखाद्या समस्येची उकल करण्यासाठी फार मोठ्या व दीर्घकाल चालू राहणाऱ्या सतत प्रयत्नाची आवश्यकता असते

विशिष्ट समस्येची जाणीव झाल्यानंतर तिची पाहणी वा उकल करण्यात मिळणारे यश हे बऱ्हंशी ती समस्या ज्या पद्धतीने व ज्या स्वरूपात मांडली असेल तिच्यावर अवलंबून असते. मनापुढे प्रश्न कोणत्या रीतीने सादर केला आहे हे महत्त्वाचे असते. डेकार्टचा नियम या बाबतीत उल्लेखनीय आहे. तो म्हणतो —

" Method consists entirely in the order and disposition of the objects to which our mental visions must be directed if we would find out any truth. We shall comply with it exactly if we reduce involved and obscure propositions step by step to those that are simpler." (Rule V of Rules for the Direction of the Mind)

कोणत्या प्रश्नाचे आपणास उत्तर हवे आहे, हे नेमके माहीत असल्यावर त्या प्रश्नाच्या सोडवणुकीची कार्यक्षमता अवलंबून असते, याचे कारण प्रश्नाबरोबरच विशिष्ट अशी नियंत्रणे (कंट्रोल्स) कार्यवाही होतात, आणि त्याच्या आधाराने समस्या उकलली जाण्याचा मार्ग सुकर होतो.

## मौलिकता व नावीन्य

शेवटचा प्रश्न मौलिकतेचा. मौलिकता म्हणजे नावीन्याच्या दिशेने होणारा प्रयत्न. तथापि शास्त्रीय संशोधनात नावीन्याला फारसे स्थान नाही. इतर सर्व क्षेत्राप्रमाणे शास्त्रातही एक प्रकारची पारंपारिकता किंवा बदलविरोधीवृत्ती (रेझिस्टन्स टु चेंज) प्रबळ असते. विविध प्रकारच्या नियंत्रणाच्या स्वरूपात ही काम करीत असते. नवीन माहिती शोधून काढणारा शास्त्रज्ञ हा प्रस्थापित सिद्धांतातील ढवळाढवळ ही कमीतकमी कशी असेल ते पाहण्याचा कसोशीने प्रयत्न करतो

काही अतिशय भव्य, उदात्त अतिशय महत्त्वाच्या, अशा तत्त्वाच्या वा श्रेयाच्या शोधाचा प्रयत्न करणे व त्यात यशस्वी होणे ह्यात एक प्रकारच्या अलौकिकतेचे दर्शन

घडते जे लोक सातत्याने कशाचा तरी शोध करतात, त्याचे मन मौलिकता-गुणानी सपन्न असते ( ओरिजिनल माइड ) व त्याच्या मनाला निरनिराळ्या समस्याची सोडवणूक करण्याची एवढी सवय झालेली असते की, त्याचे मन ही समस्या सोडणारी सघटना ( प्रॉब्लेम सॉल्व्हिग माइड ) झालेली असते अर्थात् असे महामनस लोक एकदरीने फार विरळ असतात सामान्याच्या कक्षेपलीकडील हे क्षेत्र आहे

## मौलिकता, व्यक्तिमत्त्वाशी अविभाज्य

तथापि सर्वसामान्यानी निराश होण्याचे कारण नाही त्याच्यासाठीही काही गुण उपलब्ध आहेत त्यापैकी सर्वात मोठा गुण म्हणजे व्यक्तिमत्वाचा होय सामान्यत बऱ्यापैकी व्यक्तित्व हा दैवी भाग नव्हे, तर मनोविकासाच्या कोणत्याही अवस्थेत प्रयत्नपूर्वक साध्य करून घेता येण्यासारखी ती गोष्ट आहे प्रत्येक व्यक्तित्वाचे वेगळे असे सौष्ठव असते व्यक्तित्व ही काही सचित साध्य गोष्ट नव्हे पुष्कळ अशी ती मानसिक ठेवणीवर अवलबून असली, तरी योग्य प्रकारच्या प्रयत्नानी ते आत्मसात करता येते हे सर्व योग्य अभ्यास-पद्धतीचा अवलब, आणि नियत्रणावरचे प्रभुत्व, यावर प्रामुख्याने आधारलेले असते

व्यक्तिमत्व हे पोकळीत साकार होऊ शकत नाही मानवी निर्मिती म्हणजे शून्यातून निर्मिती नव्हे मोठ्या माणसाना मान्यता मिळण्यापूर्वी दीर्घकाल तपस्या करावी लागते योग्य रीतीने विचार करण्याची सवय असेल, विषयाची योग्य कल्पना असेल व विशेषत आतापर्यंत ज्या विविध नियत्रणाचा उल्लेख केला त्याचा जर योग्य प्रकारे वापर करण्याचे कौशल्य आत्मसात करता आले तर व्यक्तित्वाचा प्रश्न पुष्कळसा सुकर होईल उदाहरणार्थ शास्त्राच्या अभ्यासात ऐतिहासिक दृष्टीचा वापर करणे, अगर इतिहासाच्या अभ्यासात शास्त्रीय पद्धतीचा अवलब करणे, अशा प्रकारचा सुखद समन्वय हा विशिष्ट परिस्थितीवर अवलबन असतो त्यासाठी निश्चित स्वरूपाची तत्त्वे सागता येत नाहीत

## प्रश्न विचारण्याची सवय

विचाराच्या प्रक्रियेत सशोधनाच्या दृष्टीने सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे मनाला सतत निरनिराळे प्रश्न विचारण्याची सवय लावणे ही उदाहरणार्थ, पुढील प्रकारचे प्रश्न मनापुढे आले पाहिजेत — हे असे का घडले ? ह्यात व त्यात परस्पर-सबध कोणते ? हे कसे कळले ? हे गृहीत धरण्याला पुरावा काय ? पुढे काय ? दुसरे काही घडणे सभाव्य असता हे असे कसे दिसते ? त्या दाव्यात विसवाद नाही काय ? अशा प्रकारची आणखी काही उदाहरणे सापडतात काय ? त्यावरून एखादा

नियम सुचतो काय ? याला परंपरा, इतिहास आहे काय ? इ इ यावरून हे स्पष्ट होईल की विचार करणे म्हणजे काही केवळ निष्कर्ष काढणे नव्हे निष्कर्ष असतील तर ते विशिष्ट प्रकारच्या संबंधाची जुळणी करण्याच्या प्रयत्नामधून निघालेले असतील जर एखादा विद्यार्थी एखाद्या वाचलेल्या पुस्तकातील चर्चिलेल्या प्रश्नाचे स्वरूप समजून घेण्याचा प्रयत्न करील तर त्याला विषयाशी संबद्ध असे सुयोग्य प्रश्न कसे विचारावेत हे समजू लागेल त्यातून पुढे स्वतः च्या विषयाशी संबद्ध असे नवे नवे प्रश्न विचारून आपले व्यक्तित्व व मौलिकत्व व्यक्त करता येईल प्रा सी ए मेस यांनी आपल्या 'सायकॉलॉजी ऑफ स्टडी' मध्ये म्हटल्याप्रमाणे सर्वसाधारण सूत्र ( मॅक्झिम ) असे –

Let your questions come Try to get them clear, then follow their lead as far as they will go And, then, ask yourself another question ते पुढे म्हणतात Individual and constructive thought like effective observation and retention, depends upon insatiable curiosity

उत्सुकतेची निर्मिती ही बौद्धिक जीवनात व्यक्तित्वाच्या निर्मितीची खूण आहे कारण प्रश्न हा पूर्णपणे व्यक्तिगत (इन्डिव्हिज्युअल) व खाजगी ( पर्सनल) असा एक विचारच आहे ॲरिस्टॉटलची थोरवी त्याने दिलेल्या उत्तरात नसून त्याने निर्माण केलेल्या प्रश्नात आहे प्रश्न विचारण्याची कला स्वतःच शिकावी लागते

शिक्षकाचे काम माहिती पुरविण्याचे नसून विद्यार्थ्यांच्या मनात निरनिराळे प्रश्न कसे निर्माण होतील हे पाहणे व त्याला अधिकाधिक प्रश्न विचारण्याची प्रेरणा देणे हे होय शास्त्रीय संशोधनात निरनिराळ्या तांत्रिक बाबींचा अवलंब करावा लागतो, हे एक टोक झाले, दुसरे टोक निबंधाचे या दोन टोकांच्या उदाहरणामध्ये इतर अनेक प्रकार असतात संपूर्ण व विस्तृत निबंध ( फुलड्रेस एसे ) हा अतिशय अवघड व गुंतागुंतीच्या मानसिक क्रियांनी युक्त असा प्रकार आहे त्यात आपल्या विचार-संघटनेवर आपले बरेच प्रभुत्व असावे लागते निरनिराळ्या नियंत्रणाचा वापर अतिशय कौशल्याने करावा लागतो मात्र त्यासाठी लेखनात प्रदीर्घताच असावी लागते असे नाही पुढील उदाहरणाने हे स्पष्ट होईल लॉर्ड बायरन हा शाळेत असताना एकदा त्याच्या शिक्षकाने मुलांना ख्रिस्ताच्या जीवनातील– येशू ख्रिस्ताने पाण्याचे मद्य केले या–प्रसंगावर एक निबंध लिहावयास सांगितला सगळी मुले लिहिण्यात दंग झाली बायरन नुसता बसून होता त्याने कागदावर एकच वाक्य लिहिले होते गुरुजींनी त्याला निबंध का लिहीत नाहीस असे विचारले,

बायरनने 'निबंध लिहून झाला ' असे उत्तर दिले व जे वाक्य लिहिले होते ते दाखविले पण एका वाक्याचा तो ' निबंध ' वाचून शिक्षक संतुष्ट झाले ते प्रसिद्ध वाक्य असे:– " Water looked to its Lord, and blushed !" या एका वाक्यावरून प्रतिभावंत आपल्या मनावरील विविध नियंत्रणाचा वापर किती नाटकसरीने व कौशल्याने करतात हे स्पष्टपणे दिसून येते अर्थात हे उदाहरण अपवादात्मक होय

या सर्व विवेचनावरून व्यक्तित्वदर्शक, व विचार मौलिकतादर्शक अशी दोन गमके सापडली व्यक्तित्व व मौलिकता हे दोन गुण योग्य रीतीने जोडलेली विचारमालिका व विचारामधील परस्परसंबंध यावर अवलंबून असतात अतिशय कार्यक्षम अशा प्रश्न विचारण्याच्या सवयीमुळेही ही वैशिष्ट्ये निर्माण होतात ह्या दोन गोष्टी एकच आहेत एकाच नाण्याच्या त्या दोन बाजू आहेत याचाच अर्थ विद्यार्थ्याने अतिशय काळजी घेऊन आपला विषय निवडावा व तितक्याच दक्षतेने अवलंबावयाच्या पद्धतीची योजना करावी प्रश्न निर्माण करणे व पद्धतीची परत पाहणी करणे ही क्रिया शोधकार्यात सतत चालू असते, मौलिकतेचे तेच अधिष्ठान होय

*सारांश–*

साराशरूपाने आपणास असे म्हणता येईल की, प्रतिभासपन्न व श्रेष्ठ कलाकार, विचारवंत, इत्यादीच्या कृतीतून वा लेखनातून जी मौलिकता दिसून येते, ती वाटते तेवढी दैवी नसते, तर पुष्कळ अशी प्रयत्नसाध्य असते [ अर्थात काही व्यक्तींचा याला अपवाद मानावा लागेल पण त्याची गोष्टच वेगळी ] सामान्याच्या वाट्याला मौलिकता ही व्यक्तिमत्वाच्या स्वरूपात येते व हे व्यक्तिवैशिष्ट्य ( निदान लेखन संशोधनासारख्या बाबीत तरी ) पुष्कळ अशी प्रयत्नसाध्य गोष्ट आहे मानवी मनाच्या विकासाच्या कोणत्याही अवस्थेत ती साध्य करण्याच्या दिशेने प्रयत्न करता येतो व त्यात यशही येते ह्या क्षेत्रातली मौलिकता ही विचाराच्या सहजनिर्मित मालिकेतून व्यक्त होते ही विचाराची अखंड मालिका सुरू ठेवण्याची शक्ती आत्मसात करावयाची असेल तर मनावर निरनिराळ्या प्रकारच्या नियंत्रणाचा ( कंट्रोल्स ) ताबा प्रस्थापित झाला पाहिजे, व त्यादृष्टीने मनाची संघटना झाली पाहिजे त्यासाठी आंतरमनाचे साह्य आवश्यक असते. हे संघटित स्वरूप प्राप्त करून देण्यासाठी व विविध नियंत्रणाखाली वागण्याचे शिक्षण मिळण्यासाठी मनाला स्वत च अनेक प्रश्न निर्माण करण्याची व त्याची उत्तरे शोधण्याची सवय लावली पाहिजे हे सारे योग्य दिशेने व योग्य मार्गदर्शनाखाली झाले तर मनबुद्धीना वेगळीच प्रगल्भता प्राप्त होते की, तीतून पुढे मौलिकतेचे नवे नवे धुमारे आपोआप बाहेर

समीक्षा मानसशास्त्राच्या जवळ जवळ जात आहे तथापि दोघाचाही कोणत्या तरी दिशेने परिशोधच चाललेला असतो विचारवताच्या मनातला परिशोध त्याला ज्ञात असतो, उलट प्रतिभावताचा शोध एवढा स्पष्ट नसला तरी तेवढाच प्रभावी असतो

दुसरा फरक असा की, विचारवताच्या शोधक्रियेत जो 'कच्चा माल' (रॉ मटेरियल) असतो, तो विशिष्ट कल्पना, सकेत वा सकल्पना (कन्सेप्ट) स्वरूपाचा व अमूर्त असतो विचारक्रियेत अनेक कल्पना येतात, त्यापैकी काहीचा स्वीकार करावा लागतो, काही त्याज्य मानाव्या लागतात, त्याच्या जागी दुसऱ्या कल्पना येतात असे सतत चालू राहते व शेवटचे सयोजन (सिथेसिस) होईपर्यंत वा उत्तर मिळेपर्यंत ही क्रिया चालू राहते प्रतिभावताच्या मनात येणाऱ्या अनेक कल्पना ह्या जीवनातील विविध अनुभव, प्रसग इ स्वरूपाच्या व तुलनात्मक दृष्टीने गर्त असतात प्रतिभावताच्या मनात त्या एका मागोमाग एक अशा येतात व त्यापैकी काहीची निवड करणे, काहीचा त्याग करणे हे त्याचे सतत चालू असते (हे ठरविणारी नियत्रणे त्याच्या अतमनात वास्तव्य करतात हा उल्लेख वर आलेलाच आहे) त्याचाही शोध विशिष्ट दिशेने चालू असतो व त्याला साजेसे असे सयोजन (सिथेसिस) होईपर्यंत तो चालू असतो त्याच्या आवडीनिवडीत प्रसग घटना इ बरोबर शब्द त्याची योजना इत्यादीनाही महत्त्व असते विचारवतालाही शब्दयोजनेबाबत दक्षता घ्यावीच लागते, पण तिचे स्वरूप बरेचसे भिन्न असते त्यात जी तार्किकता असते ती बरीच स्पष्ट असते प्रतिभावताच्या कृतीतील तार्किकता ही उघड नसते, ती मनोनिष्ठ असते, त्यामुळे तिचे नियम, सकेत इ वेगळे असतात, म्हणनच त्याच्या विशदीकरणासाठी वाङमयीन टीकेसारखे शास्त्र समृद्ध झालेले आह थोडक्यात म्हणजे कलावत (प्रतिभावत) व विचारवत ह्या दोघाचेही या सदर्भातील मनोव्यापार सारखेच असतात तसेच दोघाच्याही मनाची धारणा, सुबद्ध अशा सघटनेने सस्कारित झालेली असते

## नव-विचार-बीजाची स्व-तंत्र वाढ

मौलिकतेबाबतच्या या विवेचनात मानवी मनाच्या आणखी एका वैशिष्ट्याचा उल्लेख करावा लागेल प्रतिभावताच्या मनात विशिष्ट प्रकारचा निर्मितिगर्भ निर्माण झाल्यावर, तसेच विचारवताच्या मनात विशिष्ट विचारबीजाचे आरोपण झाल्यावर त्या प्रतिमाकुराची वा बीजारोपाची वाढ स्व-तत्र रीतीने होते त्याना (निर्मितिगर्भ वा विचारगर्भ याना) एक प्रकारचे 'जीवन' प्राप्त होते व ती विकासक्षम होतात जरा प्रतिभावत किंवा विचारवत त्याच्या स्वयम विकासाला भरपूर अवसर देतो, त्यातच त्याचे मोठेपण सामावलेले असते तेच त्याच्या मौलिकतेचे गमक आविष्करण होय

विचारवंताने, प्रतिभावंताने, तसेच संशोधकाने आपल्या शोध-बीजाच्या या स्वायत्ततेची जाणीव ठेवावी लागते. टॉलस्टॉयला त्याने आपली 'ॲना केरीना' ही कादंबरी एवढी प्रदीर्घ का लिहिली, असा प्रश्न विचारला असता, त्याने उत्तर दिले की, त्याने नायिका 'ॲना' ही निर्माण केल्यानंतर तिचा स्वाभाविक विकासाविष्कार जिथे पूर्ण झाला तिथेच ती कादंबरी संपली. याचे उद्गार ह्या संदर्भात अर्थपूर्ण वाटतात.

संशोधनात अशा स्वाभाविक विकासाला कुठे स्थान आहे? विविध पद्धतीचा व निरूपाचा हा अवलंब करता करता मूळ शोध-बीज विचारे चिमटूनही जात असेल. याह्य दृष्टीने पाहता हे खरे वाटेल, पण बारकाईने पाहता असे आढळून येईल की संशोधनातील विकासगती ही विचारवंत या प्रतिभावंत याच्या विकासगतीपेक्षा अगदी भिन्न असते. संशोधनात हेतुगर्भता अधिक स्पष्ट व प्रभावी असते, त्यामुळे शोध-बीजाच्या विकासगतीला संशोधनात वेगळाच डौल प्राप्त झालेला असतो. तो कृत्रिम किंवा अस्वाभाविक आहे, असे म्हणता येणार नाही.

ह्या ठिकाणी हे स्पष्ट करणे अवश्य आहे की, ही जी विविध 'बीजे' असतात, त्यांचा विकास स्वयगतीने होत असला, तरी त्याचे विकासक्षेत्र हे प्रतिभावंत, विचारवंत अगर संशोधक याचे मन आहे, हे लक्षात घेणे जरूर आहे. म्हणजे त्या विकासक्रियेत विचारवंताच्या, कलावंताच्या वा संशोधकाच्या विचार, धारणा, अभ्यास, संस्कृती, आवडीनिवडी, समज, गैरसमज, अवलोकन, अनुभव, व्यक्तित्व इत्यादींचा महत्त्वाचा भाग असतो. त्या व्यक्तीचीच ती निर्मिती असते. संशोधनात एक प्रकारची बुद्धि-पुरस्सरता असल्याने व्यक्तिगत आवडीनिवडी, ग्रह-दुराग्रह इ. पलीकडे असणाऱ्या वस्तुनिष्ठतेला विशेष स्थान प्राप्त झालेले आहे. संशोधन म्हणजे बौद्धिक क्षेत्रातील कलमी झाड होय. अर्थात प्रत्येक वेळी हे कलम चांगले साधलेले असते असे नव्हे, पण साधले तर फळांना विशेष रुचकरपणा प्राप्त होतो.

## मौलिकतेचे क्षेत्र खोलात जात आहे

मौलिकतेच्या या मूलभूततेच्या बाबतीत आणखी एक गोष्ट लक्षात घ्यावयास हवी की, ज्ञानाच्या प्रसारामुळे मौलिकतेचे क्षेत्र हे बरेच खोलात चालले आहे, व मूलभूतता ही बरीच सूक्ष्म होत चालली आहे. कारण वरवर मौलिक वाटणारे विचार अगोदरच प्रसृत झालेले आहेत. त्यामुळे मौलिकतेच्या दर्शनासाठी बराच मोठा प्रवास करावा लागतो. गोरे लोक ज्यावेळी ऑस्ट्रेलियात वा आफ्रिकेत गेले, त्यावेळी त्यांना नद्यांच्या तळाशी सोन्याच्या लगडी सापडल्या असे म्हणतात पण आज मात्र तेथेच एक गुंजभर सोने मिळविण्यासाठी खंडीभर माती अत्याधुनिक पद्धतीने जाळावी, गाळावी लागते. विचाराच्या मौलिकतेचे तसेच आहे. जे मूलभूत महत्त्वाचे व प्रेरक विचार आहेत,

आदी शब्दाचे अर्थ स्पष्ट करण्याचे प्रयत्न म्हणजे या सदरात पडणाऱ्या सशोधनाची उदाहरणे होत यात कल्पनाशक्तीचा भाग असला तरी ती स्वैर सोडता येत नाही विविध सकेताची, नियमाची बधनेही मान्य करावी लागतात त्यातून वर उल्लेखिलेल्या विविध नियत्रणाची कल्पना येते

प्राचीन वाङ्मयाच्या सशोधनास अशा प्रकारच्या स्पष्टीकरणाचे आणखी एक क्षेत्र म्हणजे प्राचीन सतकवीच्या चरित्रातील वा प्राचीन वाङ्मयातील इतरत्र आलेल्या चमत्कारादी असभाव्य घटनाचे स्पष्टीकरण होय हे वाटते तितके सोपे नाही काही जण तर ते चमत्कार खरेच मानतात, अर्थात अशाच्या बाबतीत सशोधनाचा किंवा चिकित्सकतेचा प्रश्नच उद्भवत नाही दुसऱ्या प्रकारचे आशवा घेणारे लोक असतात त्याचे दोन प्रकार आहेत पहिला गट ह्या 'चमत्कारा' मागील प्रतीकात्मक अर्थ विशद करण्याचा प्रयत्न करणाऱ्याचा. हा त्यातल्या त्यात सशोधनवृत्तीला जवळचा प्रकार प्रा न र फाटक यानी आपल्या ज्ञानेश्वर-चरित्रात अशी काही चागली स्पष्टीकरणे दिली आहेत पण सर्वच चमत्काराना ह्या कक्षेत बसविण्याचा अट्टाहास धरणे चूक होय दुसरा एक असा वर्ग आहे की, तो ते चमत्कार झाले नाहीत, असे मानून काय झाले असणे शक्य आहे, हे विशद करण्याचा प्रयत्न करतो श्री वा सी बेंद्रेकृत 'तुकारामचरित्र' या प्रकारचे उदाहरण होय याही प्रकाराच्या काही मर्यादा आहेत तथापि आपल्या ठिकाणच्या चिकित्सकतेला तसेच मौलिकतेला अवसर देणारे हे क्षेत्र आहे त्याच्या मर्यादा आळखून जर शोध-बुद्धी वापरली तर अव्वल व मौलिकतापूर्ण सशोधन होऊ शकेल

स्पष्टीकरणाचे (इटरप्रिटेशन) हे विवेचन मौलिकता गुणाच्या सदर्भात केले आहे असले स्पष्टीकरण म्हणजे स्वैर कल्पना-विलास नव्हे तर शोधवृत्तीला मिळालेले ते आवाहन आहे, अशा दृष्टीने जर ह्या क्षेत्राकडे पाहिले व तारतम्य वापरले तर व्यक्तित्वाविष्काराला उदड अवसर असणारा हा परिसर आहे पण सर्वांना ते जमते असे नाही विशिष्ट अट्टाहासाला बळी पडून वेगळ्याच प्रकारचे लेखन अनेकानी केले आहे सशोधनाच्या दृष्टीने ते निकृष्ट होय

## नवा सामाजिक आशय आणणे

नवा सामाजिक आशय ओतण्याचा प्रयत्न करणे हाही या प्रकारात मोडणारा उपक्रम होय सतवाङ्मयावरील विविध आक्षेप, त्याचा परामर्श, तसेच सतवाङ्मयाचे कार्य इ ची पुन पाहणी करण्याचे न्या रानडे, राजवाडे, माटे, प्रा सरदार, सुठणकर, दि के बेडेकर आदीचे उपक्रम या सदरातले होत सशोधन

व टीका यांचा समन्वय असणारा व संशोधनाकडे अधिक कल असणारा असा हा मौलिकतेचा प्रांत आहे. ह्या प्रयत्नाच्या मर्यादा व बळ ही याच प्रकारचे संशोधन चिकित्सापूर्वक वाचल्याने समजतील.

वाङ्मयीन क्षेत्राप्रमाणे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातही या स्पष्टीकरणाला वाव आहे. निरनिराळे सामाजिक रीतिरिवाज, संकेत, संस्कार सांस्कृतिक रूढी इ. चा सामाजिक अन्वय इतर क्षेत्रातील तुलनात्मक पाहणीच्या आधाराने स्पष्ट करणे, हे ह्या प्रकारच्या संशोधनाचे उदाहरण होय. निरनिराळ्या रूढींचे, संस्कारांचे, प्रथांचे इ. असेच विवरण करून त्यात नवा आशय आणता येईल. पण काल्पनिक स्पष्टीकरण देऊन त्याचे केवळ समर्थन म्हणजे स्पष्टीकरण (इंटर-प्रिटेशन) ही नव्हे व संशोधनही नव्हे हे लक्षात घेणे जरूर आहे.

स्पष्टीकरण (इंटरप्रिटेशन) हे संशोधनात अतिशय महत्त्वाचे आहे. अभ्यासकाच्या ठायीच्या चिकित्सकतेला भरपूर अवसर देणारे व त्यामुळे आकर्षक वाटणारे असे अंग आहे. शोध क्रियेच्या अंतरंगाशी संबंध असणाऱ्या मौलिकतेच्या विविध अंगांचे स्वरूप पाहिल्यानंतर शोध-निबंधलेखन व वाङ्मयाच्या प्रांतात असणारे टीका-लेखन यांचे शोध-दृष्टीने तुलनात्मक परिशीलन करणे अवश्य आहे.

### टीका व संशोधन

प्रथम टीका आणि संशोधन यामधील साम्य पाहू. इंग्रजी कल्पनेप्रमाणे टीका-लेख व संशोधनपर लेख यांत फारसा फरक नाही. इंग्रजी वाङ्मयाच्या अभ्यासात टीका हा शब्द इतक्या व्यापक रीतीने उपयोगात आणला जातो की, त्याचा अर्थ संदर्भानुरूप बदलतो. पाठनिश्चितीशास्त्राला इंग्रजीत संहिता टीका (टेक्स्चुअल क्रिटिसिझम) असे म्हणतात, हे पाहिलेच आहे. टीका व संशोधन यांची मूलतत्त्वे इंग्रजी कल्पनेप्रमाणे जवळ जवळ समान आहेत. दोहांत चिकित्सक पाहणीला [क्रिटिकल एन्क्वायरी] सारखेच महत्त्व आहे. दोन्ही एक प्रकारच्या वस्तुनिष्ठ भूमिकेवर अधिष्ठित झालेल्या असतात. दोहोंतही वस्तूचे खरे दर्शन घेण्याचा, परिशोध करण्याचा प्रयत्न केलेला असतो. दोहोंतही पृथक्करणपद्धतीला (अॅनॅलिटिकल सेन्स) महत्त्वाचे स्थान असते. दोहोंचाही एक प्रकारच्या सोद्देश, हेतुपूर्ण लिखाणात समावेश होतो. चांगला असा शोधनिबंध हा वाङ्मयीन टीकेचा उत्कृष्ट नमुना असू शकतो, उलट उत्कृष्ट टीकालेखांत संशोधनाची अनेक वैशिष्ट्ये दृग्गोचर होतात. वृत्तपत्रांमधून येणाऱ्या छोटेखानी टीकालेखाला शोधनिबंधाची पदवी देण्यास इंग्रजी टीकाशास्त्राला तरी कोणतीच दिक्कत वाटत नाही. त्यामुळे इंग्रजी संकेताप्रमाणे वाङ्मयीन संशोधन (लिटररी रीसर्च) असा काही प्रकारच नाही. तसेच टीकेचे

विपय व सशोधनाचे विपय, हे समान किंवा एक होत* सत्याच्या स्वरूपाची पाहणी करणे हे दोहोंचेही उद्दिष्ट एकदरीने पाहता इग्रजी कल्पनेप्रमाणे टीकालेख व शोधनिवध ह्याच्या सीमा एकमेकात अगदी मिसळून गेलेल्या आहेत

## काही फरक

सशोधन आणि टीका यामध्ये अशा प्रकारचे काही साम्य असले तरी सारी टीका ही सशोधनरूप होऊ शकत नाही, उलट सारे सशोधन ह टीकारूप असते, असे म्हणता येणार नाही शाधनिवध आणि टीकालेख यात महत्त्वाचा व पहिला फरक म्हणजे शोधनिबधात आधाराना विशेष महत्त्व असते उलट टीकालेखात आधाराना तेवढे महत्त्व नमते उदा०, ॲरिस्टॉटलचे काव्याच्या लक्षणाबाबतचे एखादे विशिष्ट मत टीकाकार जाता जाता देऊन जातो सशोधनलेखात प्रत्यक्ष मत कोणत्या सदर्भात, शब्दात आले आहे, ते देणे अवश्य असते आधाराच्या वावत एवढा काटेकोरपणा, नेमकेपणा, टीकालेखात अपेक्षित असताच असे नाही टीकालेखात आधार किंवा विविध प्रकारची मते इ नसतात असे नव्हे, पण ती विवेचनाच्या ओघात येतात शोधनिबधात त्याना मुख्य प्रतिपादनाचा पाया म्हणून महत्त्व प्राप्त झालेले असते तथापि आधाराचे ह महत्त्व लक्षात घेऊन कित्येक तथाकथित शोध-निबधात नुसती माठमोठी अवतरणे किंवा उतारे देउन आधाराचा आभास निर्माण केलेला असतो, तेही बर नव्हे आधार हा सप्रयोजक व अनुरूप असला पाहिजे

दुसरे महत्त्वाचे व व्यवच्छेदक लक्षण म्हणजे विविध पद्धतीच अवलबन होय शाधनिबधात मुख्य समस्या नीट माडून तिची सोडवणूक व पाहणी करण्यात कोणत्या पद्धतीचा अवलब केला आह, तीच पद्धती का स्वीकारार्ह वाटली, पृथक्करण कस केले, ते तसे का केले, इ बाबींना विशेष महत्त्व प्राप्त होते सशोधनात प्रतिपाद्याइतकाही कित्येक वेळा ज्या पद्धतीने त्या प्रतिपाद्यापर्यंत येण्याचा प्रवास घडलेला असतो ती पद्धतही तितकीच महत्त्वाची असते टीकालेखात उलटपक्षी पद्धतीला एवढे महत्त्व नमते तेथे विचाराना वा विचाराच्या प्रभावी प्रतिपादनास अधिक महत्त्व असते पूर्वपक्ष–उत्तरपक्ष, खडन–मडन, या गोष्टीना जेवढे महत्त्व टीकेत असते तेवढे सशोधन निवधात नसते अर्थात ह्या गोष्टी सशोधनास वर्ज्य आहेत असे नव्हे पण त्याच्या अवलबनाची टीकेतली पद्धती व भूमिका वेगळी व सशोधनातील

*आपणाकडे विदर्भातील वा ना देशपाडे तसेच प्रा वा ल कुलकर्णी आदी थोर चितकाच्या स्फुट लेखनात शोधगुणाचा प्रत्यय येतो या इग्रजी सकेता-प्रमाणे 'छद,' 'अभिरुची' 'आलोचना' आदी वाङ्मयीन कालिकातील बरेचसे टीकालेखन हे शोधगुणाशी युक्त, असे मानले जाते

भूमिका वेगळी विशिष्ट मताच्या अभिनिवेशामुळे टीकेला एक प्रकारचे तेज चढते तो गुण टीकेस पोषक ठरतो तर तसा अभिनिवेश शक्य तेवढा कमी करून साधक-बाधक पुराव्याच्या पाहाणीवर संशोधनाचा भर असतो

## दोहोंत नावीन्याचे स्थान

टीकेत विचाराच्या नावीन्याला अधिक महत्त्व असते संशोधनात नावीन्याला तेवढे महत्त्व नाही लोकाना धक्का देणारी मते संशोधनात नसतात असे नव्हे, किंबहुना कित्येक वेळा तशी ती असतातही पण विचाराचे नावीन्य हे संशोधनात तेवढे अपेक्षित नसते त्याचा अर्थ नवीन विचार संशोधनरूपाने मांडावयाचे असले, तरी ते मांडण्याची जी पद्धती आहे तिला प्राधान्य देऊन ते मांडणे, अधिक सुयोग्य असते एखादी उत्तुंग किंवा तेजस्वी (ब्रिलियंट) कल्पना टीकेला जेवढी येईल तेवढी ती संशोधनास झेपेलच असे म्हणता येत नाही राजवाड्यांच्या किंवा डॉ केतकरांच्या संशोधनपर लेखनात कितीतरी उत्तुंग कल्पना आलेल्या असतात त्यावेळी त्यांचे विचार वैभव देखून अभ्यासक स्तिमितही होतो पण त्या ठिकाणच्या विवेचनाचे संशोधन मूल्याच्या दृष्टीने परीक्षण करता त्याचे महत्त्व कमी भरते टीकेतील नवा विचार हा क्रिया-प्रतिक्रियाच्या स्वरूपाचा असतो उलट संशोधनातील नव-विचार हा विशिष्ट भूमिकेच्या पद्धतशीर अवलंबनाने स्वाभाविकपणेच उत्क्रान्त झालेला असतो त्यामुळे संशोधनातून जेव्हा एखादा क्रांतिकारक शोध लागलेला असतो, तेव्हा त्याची प्रक्षोभकता व सर्वंकषता अधिक प्रभावी आणि मूलभूत स्वरूपाची असते कारण ती क्रिया-प्रतिक्रिया स्वरूपाची नसते कोपर्निकस, न्यूटन, गॅलिलिओ, डार्विन, इ चे शोध क्रांतिकारक व त्यादृष्टीने नावीन्यपूर्ण खरे, पण ते नावीन्याच्या आकर्षणातून निर्माण झालेले नव्हत उलटपक्षी टीकाकाराच्या ठिकाणी एक प्रकारचे नावीन्याचे प्रेम असते ते नावीन्य सत्यशोधकाच्या भूमिकेतूनच निर्माण झालेले असते नव्हे, कित्येकदा ते अतिशय अस्फुट असते, अस्पष्ट असते विचाराची अशीच एखादी तेजस्वी शलाकाच मनास भेदून जाते तिचे शब्दांकन करण्याचा प्रयत्न टीकालेखक करीत असतो त्यामुळे टीकेला अभिनवत्व प्राप्त होते, पण तिच्यात शोध मूल्य असतेच असे नाही टीकालेख व शोधलेख यात मुख्य फरक असा की, टीकालेख हा व्यक्तिगत महत्त्वाचा असतो, उलट शोधलेख हा एक सामाजिक दस्तऐवज ( डॉक्युमेंट ) होय

## ' कल्पितपक्षा ' चे दोहोतील महत्त्व

ह्या नावीन्याच्या संदर्भात संशोधनाशी संबद्ध असा आणखी एका विशेषाचा

उल्लेख करावयास हवा व तो म्हणजे "कल्पितपक्षा" (हायपॉथेसिस) सबधीचा हायपॉथेसिस किंवा कल्पितपक्ष हा सशोधनातील एक नावीन्यपूर्ण भाग आहे हे खरे आहे त्याचप्रमाणे चागल्या 'कल्पितपक्षा'मुळे सशोधनमूल्य वाढते हेही बरोबर आहे पण ह्या 'कल्पितकृत्या'ची निर्मिती नावीन्याच्या पोटी झालेली नसून एक प्रकारच्या मार्गशोधाच्या प्रक्रियेतून झालेली असते त्याप्रमाणेच ते कल्पित किंवा गृहीत कृत्य का आवश्यक आहे, त्याचा सशोधनात उपयोग किती झालेला आहे, इ सबद्ध बाबी शोधकाराला स्पष्ट कराव्या लागतात टीकालेखात हे सारे अपेक्षित नसते टीकेतही काही गोष्टी गृहीत धराव्या लागतात, त्यावरच टीकेची वास्तू आधारलेली असते उदा, श्रेष्ठ वाङमयकृती वा कलाकृती ह्या 'श्रेष्ठ' आहेत, असे कित्येकदा गृहीत धरले जाते, व त्याच्या श्रेष्ठतेची वैशिष्ट्ये किंवा श्रेष्ठतेतील काही वैगुण्ये इ गृहीत धरणे हे टीकेत बसते पण हाच सशोधनाचा विषय झाला की, ही श्रेष्ठता ढोबळपणे गृहीत न धरता पुराव्याच्या वा विशिष्ट मताच्या आधाराने ती अगोदर स्पष्ट करावी लागते व मग त्या मतमतातून वगळली गेलेली, अगर त्याच्या पलीकडे असलेली काही वैशिष्ट्ये, तसेच त्या मताविष्कारामधील हेत्वाभासादि वैगुण्ये इत्यादीकडे लक्ष वेधले जाते अशा प्रकारे टीकाकार व शोधलेखक ह्यांच्या भूमिकाच भिन्नभिन्न असतात टीकाकाराचा दृष्टिकोन अधिक व्यापक (ब्रॉड) असतो त्याच्यात विस्तारशीलता (एक्स्टेन्सिव्हनेस) असते उलटपक्षी शोधलेखकाचा कल मर्यादितपणाकडे व मर सखोलतेवर (इन्टेन्सिव्हनेस) अधिक असतो साध्या लेखात आपले म्हणणे पटवून देण्याचा अगर वाचकाची मनधरणी करण्याचे लेखकाचे धोरण असते शोधलेखकास तशी जरूरी नसते

टीकेत याशिवाय आणखी एका प्रकारची गृहीतकृत्यता असते टीकालेखाच्या भूमिकेशी ती सुसगत आहे शोधकाराच्या भूमिकेला ती विसगत असते टीकाकार कित्येकदा विविध प्रवृत्तीचा अगीकार करतात उदा०, वास्तववादी, ध्येयवादी, सौंदर्य वादी, अभिजातवादी इ या प्रवृत्ति-वैशिष्ट्यामुळे टीकाकाराच्या टीकेला एक प्रकारचे व्यक्तिवैशिष्ट्य (इंडिव्हिज्युॲलिटि) येते टीका ही त्या भूमिकेमुळे महत्वाची मानावी लागते सशोधकाच्या भूमिकेचा विचार केला असता त्यात या भिन्न प्रवृत्तीना स्थान असेलच असे नाही सशोधकाची एकच प्रवृत्ती महत्वाची तो म्हणजे सत्यवादित्वाची होय

### मूल्यांचा प्रश्न

सशोधनात कोणत्यातरी प्रश्नाला (प्रॉब्लेम) विशेष स्थान असते कोणत्या-तरी एखाद्या समस्येची मांडणी व तिची सोडवणूक करण्याच्या प्रयत्नातून सशोधन

साकार होत जाते. टीकेत मध्यवर्ती प्रश्न इ. असतोच असे नाही. मते, मनांतरे इत्यादींना महत्त्व असते. टीकेत काही वेळा विशिष्ट मूल्याचा अवलंब केलेला असतो. संशोधकाच्या भूमिकेत अशा मूल्यांना फारसे स्थान नसते. काही मूल्ये विचारात घेतली तरी त्यांचे अस्तित्व व आवश्यकता इ. गोष्टींची प्रथम साधकबाधक व साधार चर्चा करून मग त्या चर्चेच्या आधारे मूल्यांचे अवलंबन निश्चित व मर्यादित करून घ्यावे लागते. या उलट टीकेत एकापुढे एक मूल्ये देऊन त्यांचे स्वरूप विशद करता येते. म्हणजे मूल्यांपेक्षा त्यांची आवश्यकता, मांडणी तसेच त्यांच्या मर्यादा यांना संशोधनात महत्त्व येते. टीकेत हे असतेच असे नाही.

संशोधनात एक प्रकारची अलिप्तता अधिक महत्त्वाची. टीकेत तेवढी अपेक्षित नसते. किंबहुना अतिरिक्त अलिप्तता ही टीकेला फारशी परिपोषक असतेच असे नाही. विविध प्रवृत्तींचे लेखक असतात. त्यांच्या लेखनात विविध प्रकारच्या विचारांचे, भावनांचे आविष्करण होत असते. टीकाकार हा त्या त्या लेखकाच्या प्रवृत्तीशी समरस होणारा असावा लागतो. त्या अभावी त्या लेखकाच्या लेखन-वैशिष्ट्याचे व मर्मस्थळांचे विवरण त्याच्याकडून होऊ शकत नाही. लेखकात सौंदर्यवादी, वास्तववादी, समस्यावादी, अभिजातवादी इ. प्रवृत्तींचे प्राबल्य असते. टीकाकाराची भूमिका ही त्या त्या लेखकाच्या प्रवृत्तीशी सुसंगत असावी लागते. ह्यामुळेच लेखनाला एक प्रकारचे तेज येते. पण त्यामुळेच एक टीकाकार अनेक भिन्न प्रवृत्तींच्या लेखकांना न्याय देऊ शकत नाही. संशोधनातील अलिप्ततेच्या अनुषंगाने अशा विषयावाबत संशोधनाचे क्षेत्र अधिक स्पष्ट, रेखीव व मर्यादित करून घ्यावे लागते. म्हणजे विविध प्रवृत्तींच्या लेखकाच्या कृतींची पाहणी करायची असली तरी आपली भूमिका व पद्धती या गोष्टी निश्चित करून पुढे जावे लागते. टीकेपेक्षा ही प्रक्रिया भिन्न आहे.

एखाद्या चांगल्या टीकालेखात संशोधनाचे अनेक गुण असतील, पण शोधलेख या दृष्टीने तो विशेष महत्त्वाचा नसेल. तद्वतच एखाद्या शोध-निबंधाचा तोंडवळा पुष्कळसा एखाद्या टीकालेखाप्रमाणे असेल. उलट काही लेख दोन्ही दृष्टीने असामान्य महत्त्वाचे ठरतील. अशी शक्यता सामान्यतः कमी असली तरी ती नाकारून चालणार नाही. कित्येकदा दोहोंच्या सीमारेषा एकमेकांत एवढ्या मिळून गेलेल्या असतात की, त्यांचे स्वरूप निश्चित करणे कठिण होते. अर्थात एखादा लेख वा निबंध या दोहोंपैकी एकात पडला न पडला, किंवा दोहोंतही पडला किंवा न पडला तरी त्याचे मौलिकत्व वा महत्त्व काहीही कमी होत नाही.

## ' वाद '-पद्धती

आपल्या भारतीय चर्चा-परंपरेत 'वाद' करण्याच्या एका विशेष पद्धतीचा समावेश होतो तीत खंडन-मंडनासाठी पूर्वपक्ष-उत्तरपक्ष केले जातात वादकाराने विरोधी पक्षाचे म्हणणे प्रथम पूर्णपणे मांडून त्याच्या अव्वलपणाविषयी विरोधकाची खात्री पटवून मग त्याचे खंडन करावयाचे असते ही तर्कसिद्ध प्रक्रिया, संशोधकाच्या भूमिकेस पुष्कळशी जवळची आहे या दृष्टीने विकास झाला असता, तर भारतीय तर्कशास्त्र अधिक समृद्ध झाले असते पण पुढे पुढे ह्या वादपद्धतीत केवळ शब्दनिष्ठा वाढली, त्याप्रमाणात आशयनिष्ठा मावळली व त्यामुळेच त्या पद्धतीचा विकास खुंटला. तरीही संशोधकाच्या भूमिकेला अतिशय जवळची अशा प्रकारची टीका-पद्धती म्हणून तिचा उल्लेख येथे करणे अवश्य वाटले.

अशा प्रकारे शोधलेख व टीकालेख यात काही भेद दाखविता आले, तरी प्रारंभी म्हटल्याप्रमाणे निश्चित अशी सीमारेषा आखणे कठिण आहे स्थूल मानाने हे विवेचन मान्य करुन अधिक निश्चितीसाठी विशिष्ट टीकालेख अगर शोधलेख विचारात घेऊन त्याच्या शोधगुणाची अगर टीकागुणाची छाननी करावी लागेल नुसतेच दोष दाखविणे ही जशी टीका नव्हे, तसेच नुसतेच संकलन किंवा एखाद्या गोष्टीची ढोबळमानाने पाहणी म्हणजे संशोधन नव्हे टीका हे विशिष्ट प्रकारची प्रतिक्रिया ( रीॲक्शन ) असेल तर संशोधन ही विशिष्ट प्रकारची शिस्त (डिसिप्लीन) आहे. तिचा मान राखून टीकागुणाचा प्रकर्ष झाला तर त्या टीकालेखाचे महत्त्व वाढेल, उलट तिला बाजूला सारुन जर एखादा शोध-निबंध लिहिला असेल तरी त्याला शोधनिबंध म्हणूनही महत्त्व राहणार नाही, व त्यात मूलभूत स्वरुपाचे विचार नसतील तर टीकालेख म्हणूनही त्याचे स्थान खालचेच राहणार

## *संशोधन व संकलन*

टीका व संशोधन यातील साम्यविरोधाचे स्वरुप पाहात असता केलेल्य विवेचनाच्या आधारे संकलन व संशोधन यातीलही फरक स्पष्ट होईल कोणत्याही गोष्टीचा नुसता संग्रह वा संकलन म्हणजे संशोधन नव्हे उलट *विशिष्ट प्रकारच्या* तत्त्वांना मानून केलेल्या संकलनात संशोधनगुण निश्चितपणे असतील संकलन व संशोधन यातील फरक म्हणजे गुदामातील माल व दुकानातील माल यातील फरक होय गुदामातील मालात कोणत्याही प्रकारची शिस्त किंवा व्यवस्था नसते उलट दुकानातील मालाच्या मांडणीत एक प्रकारची शिस्त व व्यवस्था असते. कित्येक वेळा नुसतीच माहिती मिळविलेली वा मांडलेली असते, तिला संशोधनरूप

प्राप्त होऊ शकत नाही. उलट कित्येक वेळा माहितीचे संकलनच केलेले असते. पण त्यामागील विशिष्ट पद्धतीच्या अवलंबनाने त्याला शोध-महत्त्व प्राप्त होते खानेसुमारीचे अहवाल हे या दृष्टीने शोध-महत्त्व असलेले दस्तऐवज होत. पेशवे दप्तराच्या ढिगाऱ्यातून विशिष्ट कागदपत्रे विशिष्ट पद्धतीने डॉ. गो. स. सरदेसाई यांनी छापली. त्यांना शोध-महत्त्व आले आहे पण विशिष्ट पद्धतीने केलेले संकलन असले तरी, व त्याला शोध-महत्त्व असले तरी, संशोधनत्व प्राप्त होण्यास आणखी एका गोष्टीची जरूरी असते. ती म्हणजे अवलंबिलेल्या पद्धतीचे विवेचन व पृथक्करणामुळे उपलब्ध झालेल्या विविध अंगोपांगाच्या परस्परसंबंधाची पाहणी करणे हे होय. ह्यायोगेच शिरगणतीच्या प्रत्यक्ष अहवालापेक्षा त्याला जोडलेल्या निष्कर्षदर्शक निबंधाचे शोधमूल्य अधिक महत्त्वाचे असते व ते खरे संशोधन होय. थोडक्यात, विशिष्ट पद्धतीचे संकलन हा संशोधनाचा पाया आहे. नुसत्या संकलनाला शोध-महत्त्व फारसे नाही. त्याच्यामागील तत्त्वाच्या, पद्धतीच्या विवेचनास अधिक महत्त्व आहे.

### समारोप

संशोधनातील तसेच शोधक्रियेतील मौलिकतेचे हे विवेचन शोध-क्रियेच्या अंतरंगावर प्रकाश पाडील असे वाटते. विचारातील मौलिकता प्रामुख्याने चिन्तनाने निर्माण होते. साध्या लेखनातील मौलिकता ही बरीच मुक्त असते. संशोधनातील मौलिकतेवर शोध-क्रियेच्या विशिष्ट ठेवणीमुळे विशेषत: स्थिर परिवर्तनीय (व्हेरिएबल्) घटक ठेवावयाचा असल्याने मर्यादावर बरीच बंधने पडतात. पण तो शोधतंत्राचा भाग असल्यामुळे त्या नियंत्रणाचा स्वीकारच करावा लागतो

मौलिकतेचे यापेक्षा अधिक विवेचन विविध उदाहरणांनीच होऊ शकेल. मराठीत असे अनेक लेखक आहेत की, त्यांच्या विशिष्ट लिखाणात शोधमूल्य तर असतेच पण मौलिकताही असते. आगरकर, प्रा माटे, द. के. केळकर, पा. वा. गाडगीळ, इरावती कर्वे, ह. रा. महाजनी, आचार्य जावडेकर, भागवत, दादा धर्माधिकारी, विनोबा भावे, दुर्गा भागवत, ग. वा सरदार, पु. ग सहस्रबुद्धे, प्र. के. अत्रे इ. असे कितीतरी लेखक आहेत की,त्यांच्या विशिष्ट लेखनात शोधमूल्य असून ते लेख मौलिकतेने संपन्न आहेत. अशा लेखांचा एक संग्रह नवप्रवेशकांना खरोखरच मार्गदर्शक होऊ शकेल. [ पुढे मागे एखादा प्रकाशक मिळाला तर ते काम करण्याचा प्रस्तुत लेखकाचा विचार आहे ]

६

# संशोधन : काल, आज, उद्या

## प्रास्ताविक

संशोधनाशी संबद्ध असणाऱ्या विविध बाबींची पाहणी केल्यानंतर आजचे संशोधन कालच्या संशोधनातून कसे उत्क्रांत झाले आहे, आणि आजच्या संशोधनातून उद्याचे संशोधन कसे अवतीर्ण व्हावे, त्याचे स्वरूप कसे असावे, विविध सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक घटकांकडे कोणता वाटा येतो, संशोधनात अधिक योजनाबद्धता व जीवनाभिमुखता येण्याच्या दृष्टीने काय करणे वा होणे अवश्य आहे, तसेच संशोधन-क्षेत्रातील काही अडचणी, व त्या निवारण्याचे काही मार्ग, काही कल्पना इ. संशोधनाच्या एकंदर उपक्रमा(ॲक्टिव्हिटी)शी निगडित असणाऱ्या प्रश्नांचा परामर्श या ठिकाणी घेण्याचे ठरविले आहे

## उच्च संशोधन

या विवेचनात संशोधनाची तीन क्षेत्रे विचारात घेतली आहेत विज्ञानशास्त्राचे, सामाजिक शास्त्राचे व वाङ्मय, कला, तत्त्वज्ञान आदींचे अशी ही तीन क्षेत्रे होत या प्रत्येक क्षेत्रातील संशोधन सामान्यत तीन पातळ्यांवर चालू असते हे पूर्वी पाहिले संशोधनाची अगदी वरची पातळी म्हणजे मूलभूत संशोधनाची असले संशोधन हे बरेचसे तात्त्विक स्वरूपाचे असते, व ते अतिशय श्रेष्ठ अशा तज्ज्ञांच्याकडून चालविले जाते फार मोठे आर्थिक साहाय्य घेऊन तसेच विकसित व गुतागुतीची उपकरणे उपयोगात आणून त्यांच्या आधाराने हे संशोधन चालू असते निरनिराळ्या 'राष्ट्रीय प्रयोगशाळा' हे विज्ञानक्षेत्रातील उदाहरण सामाजिकशास्त्राच्या क्षेत्रात इतिहास,

अर्थशास्त्र, समाजशास्त्र, उत्खनन, मानसशास्त्र इ. क्षेत्रांतील प्रगत संशोधनाकरिता काही उच्च संशोधनसंस्था मुद्दाम अस्तित्वात आल्या आहेत. ह्या संशोधनाचा जीवनाशी वा जीवनातील समस्यांसाठी प्रत्यक्ष संबंध नसतो. पण म्हणून त्याचे स्थान कमी महत्त्वाचे असते असे नव्हे. आजच्या नेत्रदीपक प्रगतीची सुरुवात तात्त्विक संशोधनातूनच झालेली आहे. पुढे केव्हा तरी त्याचे प्रात्यक्षिक अवलंबन (प्रॅक्टिकल ॲप्लिकेशन) सुरू झाले, आणि एखाद्या तत्त्वाचा प्रत्यक्षात काही उपयोग नसला तरी ज्ञानसाधन या दृष्टीने त्याचे महत्त्व आहेच. कारण जग समजून घेणे हे अंतिमत चांगले. हे संशोधन राष्ट्राच्या मोठेपणाची, प्रतिभेची खूण देणारे असते. तसे नवीन पिढीच्या बौद्धिक आयामांना अवसर देण्याच्या दृष्टीने ह्या संशोधनाची आवश्यकता मान्य करावी लागते.

दुसऱ्या पातळीवर चालू असलेल्या संशोधनात उपयुक्तता व तात्त्विकता यांचा समन्वय झालेला असतो. विज्ञान-क्षेत्रात 'तंत्रविद्या' (टेक्नॉलॉजी) म्हणून जी काही निर्माण झाली आहे ते ह्या प्रकारचे उदाहरण होय. कारणा-कारणांनी एखाद्या सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक, शैक्षणिक इ. क्षेत्रांतील काही समस्यांच्या निराकरणासाठी अगर एकंदर व्यापक पाहणी करण्यासाठी तज्ज्ञांकडून जे मोठेमोठे अहवाल (रिपोर्ट) लिहून घेतले जातात, ते ह्या प्रकारच्या संशोधनाचे सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रातील उदाहरण होय. खालच्या पातळीवरील संशोधन पाहणी-स्वरूपाचे व्यावहारिक या रोजच्या जीवनातील लहानमोठ्या अडचणींचे निराकरण करण्याच्या दृष्टीने चालू असते. विज्ञानक्षेत्रातील या प्रकारच्या संशोधनाचे उदाहरण म्हणजे औद्योगिक क्षेत्रातील संशोधन, सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रातील उदाहरण म्हणजे निरनिराळ्या क्षेत्रांत आकडेशास्त्राच्या आधाराने जमविली जाणारी विविध प्रकारची माहिती, शैक्षणिक क्षेत्रात जे प्रत्यक्षोपयोगी (ॲक्टिव्ह) संशोधन चालते ते याच प्रकारचे उदाहरण म्हणता येईल. साहित्य व कला क्षेत्रातील उदाहरण द्यायचे तर विविध ग्रंथांवरील चिकित्सक परीक्षणे, विविध वृत्तपत्रीय लेखन इ. प्रकारचे होय. हे सामान्यत संघटित नसते. व्यावहारिक अडचणींचा परिहार करण्याच्या दृष्टीने हे चालू असते.

## विद्यापीठाची जबाबदारी

विद्यापीठाची जबाबदारी विविध प्रकारची आहे. अगदी पहिली व महत्त्वाची म्हणजे ह्या तीनही क्षेत्रांत काम करू शकतील असे तज्ज्ञ तयार करणे ही होय. ह्या संशोधकांना जे संशोधनविषयक शिक्षण द्यायचे ते प्रत्यक्ष संशोधनाच्या आधारानेच. म्हणजेच प्रत्येक खऱ्या विद्यापीठात तीनही प्रकारचे थोडे थोडे संशोधन

चालणे आवश्यक आहे. अर्थात संशोधन म्हणून ह्या संशोधनास महत्त्व राहणारच, पण त्यापेक्षा संशोधकाच्या ठायी विशिष्ट वृत्ती निर्माण करण्याकडे विद्यापीठाचे लक्ष राहाणार. श्रेष्ठ प्रकारची भर पडणे हे त्या व्यक्तीवर अवलंबून राहील. निरनिराळ्या प्रकारचे चांगले विद्यार्थी निर्माण करणे, हे काम अधिक महत्त्वाचे आहे असे म्हणता येईल. निरनिराळ्या पातळ्यांवरून निरनिराळ्या ठिकाणी चाललेल्या संशोधनाचा समन्वय (को-ऑर्डिनेशन) जरी विद्यापीठाकडून झाला तरी पुरे आहे. तशा प्रकारची आवश्यकता आज अतिशय आहे.

अगदी प्राथमिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक विद्यापीठात [त्याच्या संबंधी विभागात (डिपार्टमेंट)] किमानपक्षी सबंध देशातील विद्यापीठात त्या त्या विषयात कोणत्या प्रश्नावर, विषयावर संशोधन चालू आहे, ह्या स्वरूपाची प्राथमिक माहिती देणारी एक सूची उपलब्ध असावी. मराठी विषयाचे उदाहरण देऊन सांगायचे तर, महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील ज्या विद्यापीठात मराठी विभाग आहे, तेथे कोणत्या प्रकारचे व कोणत्या विषयावर संशोधन चालू आहे ह्याची माहिती प्रत्येक विद्यापीठाच्या मराठी विभागात अगर मराठी शाखेत उपलब्ध असावी. आज ह्या गोष्टीची अतिशय निकड निरनिराळ्या कारणासाठी आहे.

पहिले म्हणजे त्यायोगे विषयनिवडीतील पुनरुक्ती टाळता येईल. एखाद्या विद्यापीठात जर विशिष्ट योजना हाती घेतली असेल तर तशा प्रकारची दुसरी योजना घेण्याची कल्पना इतरानाही सुचेल. एखादी चांगली कल्पना एखाद्या विद्यापीठापुरतीच मर्यादित न राहता तिचा प्रसार व स्वीकार झपाट्याने होण्यास मदत होईल. त्याचप्रमाणे निरनिराळ्या क्षेत्रातील संशोधनात केवळ तात्त्विकपणावर भर आहे, त्याची जागा थोड्या फार प्रमाणात प्रात्यक्षिकाने घेतली जाईल.

## संशोधन-वैशिष्ट्यासाठी विद्यापीठांनी काही विषय निवडावे

विद्यापीठानीही आपापल्या विषयात आणखी वैशिष्ट्यीकरण (स्पेशलायझेशन) आणण्याची आवश्यकता आहे. प्रत्येक विषयात अनेक उपविषय असतात, अशा उपविषयांपैकी एक किंवा दोन अथवा तीन विषय घेऊन त्यात विशेष संशोधन करण्याचे विद्यापीठांनी ठरवावे. म्हणजे एका विषयाचा अधिक परिपूर्ण रीतीने विकास होऊ शकेल. त्या-निवडलेल्या-विषयात उच्च व अव्वल दर्जाचे संशोधन त्या विद्यापीठात व्हावे. म्हणजे इतर विषयाचे संशोधन वर्ज्य आहे अशातला भाग नाही; त्या विषयातील उच्चतर संशोधनाची तरतूद दुसऱ्या एखाद्या विद्यापीठात असेल. असे झाले तर प्रत्येक उपविषयाचाही अभ्यास वा संशोधन दुर्लक्षित होणार नाही. विषयाच्या सर्वांगीण अभ्यासात परिपूर्णता येईल. मराठीच्या

एखाद्या विद्यापीठाकडे किंवा काही विद्यापीठाकडे अगर काही विशिष्ट संघटनाकडे विभागून हे काम सोपवावयास हरकत नाही. सर्वच सुधारलेल्या देशांत अशा प्रकारची सांवत्सरिके प्रकाशित होतात तशा प्रकारची काही प्रथा आपणाकडे सुरू व्हावयास हवी. त्याने संशोधकाची व अभ्यासकाची फार मोठी सोय होईल. या सांवत्सरिकाच्या योगाने अभ्यासकास विज्ञान, व्यापार, उद्योगधंदे, यांत्रिक संशोधन, मुद्रण, वाङमय, कला, इ. सर्व क्षेत्रात काय काम चालू आहे याची कल्पना येईल. पुढे मागे किंवा नजिकच्या भविष्यात अशा प्रकारचा उपक्रम हा अवश्यपणे व्हावयास हवा.

कारण महाराष्ट्राच्या सर्वच विभागात एक प्रकारची जागरूकता निर्माण झालेली आहे प्रत्येक क्षेत्रातल्या माणसास आपल्या क्षेत्रात कोठे काय चालले आहे, हे जाणून घेण्याची उत्सुकता निर्माण झालेली आहे. ती पुरी होण्याच्या दृष्टीने आणि एकंदरीने समाजाची सांस्कृतिक ज्ञानविषयक भूक भागविण्याच्या दृष्टीने असा काहीतरी उपक्रम लवकर होणे आवश्यक आहे

## प्रत्येक विद्यापीठात काही संयोजन हवे

विद्यापीठामार्फत चाललेल्या संशोधनातही एकप्रकारची सुसूत्रता किंवा नियोजन हवे विद्यापीठातील विभागानी आपापल्या कार्याकरिता एखादा सामुदायिक स्वरूपाचा कार्यक्रम आखणे अवश्य आहे. त्यासाठी विद्यापीठात (त्याच्या सलग्न महाविद्यालयात) जी मानवी साधन–सामग्री आहे तिचा योजनापूर्ण रीतीने वापर व्हावयास हवा विद्यापीठात (सलग्न महाविद्यालयाचा समावेश त्यातच करणे योग्य होईल,) सामान्यत तीन प्रकारचे प्राध्यापक असतात, एक नवागत, दुसरा सगळ्याच दृष्टीनी ज्येष्ठ (सीनीयर) असणारा असा वर्ग. त्याशिवाय दोहोंच्या मधला असा एक वर्ग प्रत्येक विभागाने अशा प्रकारची योजना आखावयास हवी की, तीत या तीनही प्रकारामधील लोकाना भाग घेता यावा. विषय किंवा कामे अशा रीतीने तीन प्रकारची असावीत. नवागतासाठी थोडेसे शिकावू स्वरूपाचे विषय निवडणे योग्य होईल त्याच्या पुढचा वर्ग आहे, त्याला पहिल्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे विषय. हे दोन प्रकारचे संशोधन कमीअधिक मार्गदर्शनासाठी चालेल तिसरा किंवा ज्येष्ठ प्राध्यापकाचा जो वर्ग असेल त्याच्याकरिताही काही योजना तयार करता येईल की, तीत मार्गदर्शनाचा भाग राहणार नाही यापुढे विद्यापीठातील प्राध्यापकानी एक टीम (सच) म्हणून काम केले तर नव्या नव्या कल्पनाना वाव मिळेल, सर्वांना अवसर मिळेल, व एक प्रकारच्या सामुदायिक भावनेची वाढ होईल. शिवाय योजनापूर्णता आल्याने कामाला निश्चित दिशा राहील, आणि आर्थिक साहाय्य मिळविणेही त्यामानाने सोपे होईल.

पुणे विद्यापीठाने एम् ए साठी मराठीचो एक पर्याय प्रश्नपत्रिका ठेवून संशोधनास स्थान दिले आहे त्या धर्तीवर इतर विद्यापीठांनाही उपक्रम करता येईल. (अर्थात संशोधन विषयाच्या अभ्यासक्रमात अधिक व्यापकता हवा ) अथवा एम् ए च्या प्रश्नपत्रिकांचे गुण थोडे कमी करून एखादा छोटेखानी शोध-निबंध प्रत्येक विद्यार्थ्यांकडून लिहून घ्यावयास हरकत नाही प्रा प्रियोळकरांनी आपल्या 'प्रिय व अप्रिय' या पुस्तकात अमेरिकन धर्तीवर पदवीपरीक्षेसाठीही एखादा शोध-निबंध देवावा अशी सूचना केली आहे, तीही विचारार्ह आहे

## नवागतांची कुचंबणा टळावयास हवी

बारकाईने पाहता असे आढळून येते की, विशेषतः महाविद्यालयांच्या क्षेत्रातले नवागत अधिक भांबावलेले असतात प्रयोग आणि चुका (ट्रायल ॲण्ड एरर) या पद्धतीने काही जण धडपडत असतात पण मार्गदर्शनाच्या अभावी त्यांची फार मोठी कुचंबणा होत आहे हे कोणत्या एका विषयासंबंधी नाही, असे नाही तर सर्वच विषयांसंबंधी ही वस्तुस्थिती आहे कोणत्याही विशिष्ट योजनेच्या अभावी ही युवक शक्ती-बुद्धी आज वाया जाते, असे म्हणता आले नाही, तरी फार मोठ्या प्रमाणावर त्यांची कुचंबणा होते हे मान्य करावयास हवे यासाठी विद्यापीठांनी काही योजनाबद्ध पावले टाकावयास हरकत नाही

संशोधनात अतिशय मोठा प्रश्न विषयांचा नवनवे विषय शोधून काढणे हे अवलोकन, कल्पनाशक्ती, विशिष्ट मनीषा यावर अवलंबून असते विषयनिवडी-साठीही साधने अवश्य असतात अशा प्रकारचे विषय उपलब्ध करून देण्याचे काम मागील परिच्छेदात उल्लेखिलेल्या योजनांच्या अवलंबनाने सुकर होईल त्याचप्रमाणे सांवत्सरिकाची जी कल्पना आहे, तिचाही या दृष्टीने पुष्कळ उपयोग होईल संशोधनाचा विशिष्ट विषय (टॉपिक) निवडण्यापूर्वी सर्वसाधारण वाचन इ. ची फारच आवश्यकता असते त्यासाठी निरनिराळ्या प्रकारची साधने उपलब्ध व्हावयास हवीत, आणि त्यांचा वापर करण्याची इच्छा व आवड यांना निर्माण करावयास हवी वास्तव, समाजाभिमुख, व प्रादेशिक गरजांचा विचार करणाऱ्या योजनेने पुष्कळशा अडचणींचा परिहार करता येईल, असे वाटते आज काही प्रमाणात काम उत्पन्न झालेला आहे पण त्यात सुसूत्रता अथवा योजनाबद्धता नाही असे म्हटले तरी चालेल त्यामुळे निदान आपल्या क्षेत्रात काय चालू आहे ते वार्षिकाच्या रूपाने उपलब्ध करून देण्याची कल्पनाही फारच परिपोषक ठरू शकेल

## कालचे संशोधन व आजचे संशोधन

प्रा मो वा निरगुणकर आपल्या "महाराष्ट्र जीवन" मधील संशोधि

संशोधनावरील लेखात आजचे संशोधन कालच्या शोधापासून कसे वेगळे आहे, हे स्पष्ट करताना म्हणतात, "शास्त्राची भरमसाट वाढ झाल्यामुळे पूर्वीच्या काळच्या व आधुनिक काळच्या संशोधनात बराच फरक पडत चाललेला आहे. पूर्वी एकेकट्यानेच केवळ ज्ञानलालसेने वेडे होऊन मनाच्या समाधानासाठी म्हणा, संशोधन केले जात असे, पण आता सर्व शास्त्राचा व जीवनव्यापाराचाही पसारा अतिशय वाढल्या कारणाने अनेक दुय्यम दर्जाचे, सवेतन अगर निर्वेतन नियमितपणे कार्य करणारे असंख्य संशोधक ठराविक योजनेनुसार संशोधन करीत असलेले दिसून येतात. अर्थात शास्त्राच्या व तंत्राच्या वाढीला अशा संघटित संशोधनाचा अत्यंत उपयोग होत असल्याकारणाने आजकाल ह्या प्रकारच्या संशोधनाला सर्वत्र महत्त्व प्राप्त झालेले आहे. अशा संशोधनयोजनांमध्ये नवीन मूलभूत शोध लागण्यास देखील उत्कृष्ट अशी परिस्थिती निर्माण होत असल्यामुळे मूलभूत शास्त्राची वाढही अत्यंत झपाट्याने होत आहे." (पृ. ११०)

केवळ वैज्ञानिक शास्त्राच्याच नव्हे तर सामाजिक शास्त्राच्या बाबतीतही आज हेच म्हणता येईल. व्यक्तिगत प्रयत्नाच्या मर्यादांची जाणीव ही कालच झाली होती. त्यामुळे इतिहासाचार्य राजवाड्यांनी जरी व्यक्तिगत ईर्षेने इतिहाससंशोधनाचे अक्षुण्ण क्षेत्र स्वतःच्या कर्तृत्वासाठी जरी पत्करले, तरी त्या कार्याला महत्त्व प्राप्त व्हावयाचे असेल तर सामुदायिक वा संस्थाप्रधान यंत्रणा निर्माण करावयास हवी, ही जाणीव होऊन त्यांनी 'भारत इतिहास संशोधनमंडळा'ची स्थापना केली. पहिल्यापहिल्या पिढ्यांतले संशोधन विद्यापीठीय शिक्षणाच्या बाबतीत फारसे पुढे गेलेले नसलेल्यांनी केले असले तरी, आज विद्यापीठाची एखादी चांगलीशी पदवी असल्याविना नवागताला या क्षेत्रात सहजासहजी प्रवेश मिळेल असे वाटत नाही.

### व्यक्तिगत कर्तृत्वाच्या मर्यादा

विज्ञानाच्या प्रगतीबरोबर समाजाच्या धारणेत अनेक मूलभूत स्वरूपाचे बदल होऊ घातले आहेत. त्यात सर्वांत महत्त्वाचा बदल असा की, व्यक्तिगत कर्तृत्वाला फार मोठ्या अशा मर्यादा पडलेल्या आहेत. आज जीवनाच्या धारणेचे संघटनाप्राधान्य एवढे वाढलेले आहे की, व्यक्तीच्या महत्त्वाकांक्षेचे व त्या प्रमाणात कर्तृत्वाचेच नव्हे तर अस्मितेचे क्षेत्रही फार संकुचित झालेले आहे. आजचा रूढ शब्दप्रयोग वापरायचा झाला तर तिचे अवमूल्यन झाले आहे. शिक्षणात व्यक्तिगत कर्तृत्वाला काही स्थानच उरलेले नाही. व्यवसायाच्या भिन्नभिन्न क्षेत्रात व्यक्ती ही केवळ नाममात्र आहे. औद्योगिक व यांत्रिक क्षेत्रात तर एका व्यक्तीचे सामर्थ्य किती अल्प आहे, भरीव उत्पादन होण्यास किती मोठी संघटना लागते, किती प्रचंड

भाडवल लागते, त्या सर्व गोष्टींचा एकदर पसाराच किती अफाट वाढलेला आहे, ह्याची कल्पना डोळे उघडे ठेवून पाहणाऱ्या कोणासही चटकन् येईल मोठमोठ्या व औद्योगिक शहरातून स्वत चे साधे छोटेखानी घर बांधणेही अशक्य झालेले आहे सारी जीवनयंत्रणाच अर्थशास्त्राच्या व्यवहारी नियमाच्या गाड्याला एवढ्या निष्ठुरपणे जोडली जात आहे की, व्यक्तिगत जीवनाची केवळ फरफट पाहणे सामान्यांच्या नशिबी आले आहे घर स्वत चे असो अगर भाड्याचे असो, नित्याच्या व्यवहारातील अगदी जुजबी गरजा भागविण्याच्या दृष्टीनेच त्याची रचना झालेली असते एखादा विवाह-समारंभ करायचा असला तर किंवा फार काय, चार मित्रांना चहापाण्यासाठी घरी बोलवावयाचे असले तर आजच्या अब्रूदार व ऐपतदार 'गृहस्था'ला एखाद्या मंगल-गृहाचा अगर एखाद्या हॉटेलचा आधार घ्यावा लागतो व्यक्तिगत जीवनातील अक्षरश आहारनिद्रादी प्राथमिक गरजा भागविण्याइतकाच आधुनिक 'गृहसंस्थे'चा संकोच झालेला आहे!

काय विलक्षण विरोधाभास आहे पाहा! व्यक्तित्वाला व त्याच्या जपणुकीला जे महत्त्व आलेले आहे, व जी तात्त्विक मान्यता आज मिळालेली आहे, तेवढी इतिहासातही कधी काळी मिळालेली दिसत नाही, एवढी ती अपूर्व आहे पण प्रत्यक्षात मात्र व्यक्तिगत भावनात्मकतेची जी फरफट निघालेली आहे, व्यक्तीच्या जीवनाला जे ओंगळवाणे व केविलवाणे व अगतिक स्वरूप प्राप्त झाले आहे, तेही इतिहासात अपूर्व असावे असे वाटते इतिहासाला भौतिक विपन्नता ही फारशी अपरिचित नाही, पण तिची बोच कमी होण्यास एक प्रकारच्या धर्मभावनेची निर्मिती करून इतिहासाने ती मानवाला उपलब्ध करून दिली आहे, आणि समकालीन माणसांनी तीत समाधान मानले सुताचा कडदोरा, खादाची लंगोटी, आणि दगडाचे टाळ, हातो घेणाऱ्या चांगामेळ्यापुढे आत्मज्ञान प्राप्तीचा मार्ग ज्ञानेश्वरांनी उपलब्ध करून दिला होता, त्यावर त्यांची श्रद्धा होती, आणि तिच्या आधारावर त्याने जीवनातला रितेपणा भरून काढला पण आधुनिक मानवाच्या जीवनातली सगळ्यात मोठी शोकांतिका हीच आहे की, त्याच्या जीवनातील ओंगळवाणेपणा, रितेपणा, कंगालपणा, उघड्या डोळ्यांनी त्याला पाहावा लागतो विस्मृतीसाठी धर्माकडे वळता येत नाही कारण त्याच्यावर त्याचा विश्वास नाही व्यक्तिगत कडमारा व तडफड कितीही झाली तरी काही करता येत नाही कारण व्यक्तिसामर्थ्याच्या मर्यादा त्याच्या पुरेपूर परिचयाच्या झालेल्या आहेत व्यक्तिजीवनाचा संकोच करून त समष्टी-जीवनाशी समरस करण्याचा प्रयत्न केला तरी त्याला असा अनुभव येतो की, समष्टीला त्याची मुळी गरजच नाही ह्या जाणिवेने जो पोरकेपणा निर्माण होतो, तोच निर्गनिराळ्या विकृतींच्या स्वरूपात बाहेर उफाळून

येतो. खरे म्हणजे ही सारी वस्तुस्थिती हा एक व्यापक योजनाबद्ध सामाजिक संशोधनाचा विषय होऊ शकेल.

हे सारे देखून संवेदनाशील वृत्तीचा कवी व्याकुल होतो व उद्‌गारतो, 'नरेचि केला हीन किती नर !' तत्त्वशोधक वृत्तीचा विचारवंत म्हणतो, 'हे जीवनच दुःखाने, वेदनांनी भरलेले आहे !' माणसाने हे ओळखून त्याच्या पलीकडे जावयास शिकणे जरूर आहे, जगातील किंवा लोकांच्या जीवनातील दुःखाने, दैन्याने, व्याकुळ होणारा एखादा महात्मा दुःखिताचे अश्रू पुसण्याचे कार्य करतो, एखादा धर्मात्मा खऱ्या धर्माला मानव वंचित झाला म्हणून मानवावर ही संकटपरंपरा आली, असे मानून सद्धर्माचा मार्ग दाखवण्याचा प्रयत्न करतो, तर एखादा राजकीय प्रज्ञावंत इतिहासाचे मंथन करून जगातल्या दैन्यदारिद्र्याची कारणमीमांसा करून जगातल्या दीनदलितांना संघटित होण्याचा आदेश देतो हे सारे मार्ग म्हणजे संवेदनशीलतेच्या निरनिराळ्या पातळ्यांवर असणाऱ्या निरनिराळ्या प्रवृत्तीच्या लोकांच्या कमी अधिक चिन्तनावर, अभ्यासावर, अवलोकनावर, जीवनदर्शनावर आधारलेल्या व्यक्तिगत प्रतिक्रिया होत हा साऱ्या एकसमयावच्छेदेकरून किंवा विभागशः चिंतनाचाच नव्हे तर संशोधनाचा विषय होऊ शकतात अर्थात एकट्या दुकट्याच्या आवाक्याबाहेरचा हा विषय आहे म्हणजे येथेही व्यक्तिगत पराक्रमाच्या मर्यादा फार भयानक रीतीने जाणवतात.

## अंतिमतेच्या मर्यादांची जाणीव

या सर्व प्रश्नाला आणखी एक बाजू आहे ज्याप्रमाणे माणसाचा धर्मतत्त्वाच्या अंतिमतेवरला विश्वास ढळला आहे, त्याप्रमाणे विज्ञानाच्या योगाने अंतिम सत्यावरील त्याची श्रद्धाही डळमळीत झालेली आहे जगात अंतिम सत्य असे काहीही नाही जे सत्य अंतिम वाटते तेही मर्यादित अर्थानेच 'अंतिम' आहे ही जाणीव त्याला अधिक अस्वस्थ करते, तसेच आधुनिक माणसाचा देवाच्या सर्वज्ञतेवरचा विश्वास गेलेला आहे त्याच्या न्यायीपणावर श्रद्धा ठेवून माणसे जगत आली आहेत, पण कोणताही 'न्याय' मग तो परमेश्वरप्रणीतही असो, अंतिम नाही, हे त्याला पटले आहे या सर्वांचा परिणाम मनुष्याच्या विचारक्रियेवरही झालेला आहे साधे विधान करतानाही त्याला चार कसोट्या पाळाव्या लागतात (१) ते अंतिम सत्याचा पुरस्कार करीत नाही (२) पण कोणत्या तरी सत्याचे ते दर्शन घडविते. (३) त्याच्या धारणेतच त्याच्या विरोधाची बीजे आहेत व (४) त्याला विरोध करणे शक्य आहे पूर्वगुरूंपुढे जर ह्या कसोट्या ठेवल्या तर त्यांची प्रतिक्रिया होईल की, ही सारी पथ्ये पाळण्यापेक्षा विधानच न केलेले बरे. पण आजकालचा मनुष्य तसे म्हणू

शकत नाही कारण त्याला माहीत झाले आहे की, जीवनाच्या गुंतागुंतीमुळे ह्या साऱ्या कसोटघा पाळणे अपरिहार्य झालेले आहे

अशा रीतीने आधुनिक जीवनाच्या धारणेला जे नैतिक अधिष्ठान व जी प्रेरणा यापुढे मिळावयाची आहे, ती प्रामुख्याने एक प्रकारच्या शोध-बुद्धीतून किंवा संशोधन-वृत्तीतून मिळणार आहे कारण त्याचा विशिष्ट अंतिम सत्यावर विश्वास नसला तरी ' सत्या 'ला जीवनात स्थानच नाही असे नव्हे, तसेच अंतिम नीतितत्त्वा-संबंधी त्याच्या मनात आशंका असली तरीही जीवनात नीतीला जागा नाही, असे तो म्हणू शकत नाही, तीच गोष्ट न्याय, ध्येयधारणा इ बाबतची या साऱ्याचे मर्यादित व सापेक्ष महत्त्व त्याला नुसतेच मान्य आहे असे नव्हे, तर त्यांची अपरिहार्यताही त्याला पटली आहे त्याच्या ज्या मर्यादा आहेत त्या संशोधन दाखवून देते, म्हणजे त्याच्या शोध-दृष्टीला या दिमतात म्हणून संशोधन हा आधुनिक मानवाचा एक डोळा किंवा ' प्रज्ञाचक्षू ' होय

ही जाणीव जसजशी अधिकाधिक तीव्र, तशीच डोळस होईल, तसतशी आधुनिक जीवन जगण्याची आपली तयारी व पात्रता वाढेल, तसेच जीवन जगण्यात अधिक क्षम येईल त्या दृष्टीने संशोधित सत्य जाणून घेण्याचे, ते सत्य काढण्याच्या पद्धतीचे व त्याबरोबरच त्याच्या समर्यादितेचे ज्ञान तरुण पिढीला असणे अवश्य आहे राष्ट्राने मान्य केलेली अधिकृत विचारसरणी (आयडिऑलॉजी) कोणतीही असो, कोणत्याही क्षेत्रात संशोधनाचे महत्त्व कमी होऊ शकत नाही

## संशोधनात एकदेशीयता नको

पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे की, भारताला आज केवळ वैज्ञानिक औद्योगिक व विशेषत संरक्षणक्षम यांत्रिकी क्षेत्रात संशोधनाची विशेष जरुरी आहे. या क्षेत्रातील संशोधनाची अत्यंत आवश्यकता आहे यात वादच नाही पण त्याच-बरोबर हेही लक्षात घेणे जरूर आहे की, ह्या क्षेत्रातील संशोधन हे वर पाहिल्याप्रमाणे अतिशय तांत्रिक, सुसंघटित व सर्वसामान्य संशोधकाच्या कक्षेच्या पलीकडचे झाले आहे त्याही क्षेत्रात चांगले संशोधक लाभावे असे वाटत असेल तर सर्वसाधारण विद्यार्थ्यांच्या मनावरच संशोधनक्रियेचे संस्कार व्हावयास हवेत

तसेच कोणत्याही एका क्षेत्रात संशोधनाची विशेष जरुरी आहे असे म्हणणे बरोबर नाही विज्ञानाच्या बरोबरीने सामाजिक शास्त्रांच्या व साहित्यादि कलांच्या क्षेत्रात संशोधनाची तितकीच आवश्यकता आहे विज्ञानाच्या संशोधनाने एक प्रकारची नैराश्यवृत्ती येत, ती टाळण्यासाठी पाश्चात्य राष्ट्रात साहित्यक्षेत्रीय संशोधनाकडे तरुणांचे अधिकाधिक लक्ष जात आहे, हे ह्या संदर्भात लक्षात घेणे आवश्यक आहे

## सामाजिक शास्त्रांतले सशोधन संघटित आहे

सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधन हे बरेचसे सघटित आहे तसेच त्याचे सकेत, अवलवल्या गेलेल्या पद्धती इ सर्व बऱ्याच निश्चित झालेल्या आहेत विज्ञान-शास्त्रीय सशोधनाच्या आदर्शाने ते पुढे पुढे जात आहे अर्थात त्या सशोधनात प्रत्यक्ष निष्कर्षांना किंवा निर्णयाना फारसे महत्त्व नसते, तर ज्या पद्धतीने ते निष्कर्ष काढले, ती पद्धती किती काटेकोरपणे अवलबिली आहे, निरनिराळ्या मार्गांचा स्वीकार विशेष चिकित्सकतेने केला आहे किंवा नाही हे पाहणे अधिक मोलाचे असते या सर्वांमुळे ह्या क्षेत्रातील सशोधनास नाही म्हटले तरी, एक प्रकारचे तात्रिक स्वरूप प्राप्त झालेले आहे व ते अधिकाधिक तज्ज्ञताधिष्ठित होत आहे परीक्षकही नवसशोधकाच्या मन-बुद्धीवर सशोधन-सस्कार किती खोल उमटले आहेत हे पाहून आपले निर्णय देत असतात

सामाजिक शास्त्राच्या भारतातील विद्यापीठीय अध्यापनावर व सशोधनावर अनेक ग्रथ उपलब्ध आहेत त्याची दाद 'यूनेस्को' पर्यंत जाऊन पोचली आहे यूनेस्कोने 'टीचिंग ऑफ सोशल सायन्सेस इन इडिया' हे पुस्तक ७।८ वर्षांपूर्वी प्रकाशित केले आहे त्याचप्रमाणे सामाजिक शास्त्राच्या क्षेत्रातील सशोधकाच्या मधून मधून परिषदा भरतात, परिसवाद होतात विद्यापीठाच्या ग्रथपालाच्याही मधून मधून परिषदा होतात, परिसवाद होतात, त्याच्या वृत्तांताची त्यातील भाषणाची इ पुस्तके प्रकाशित होतात वाङमयशाखा ही मात्र त्या दृष्टीने बरीच मागासलेली आहे तथापि प्राचीन भाषा, भाषाविज्ञान तसेच इतिहास, सस्कृती, या क्षेत्रातही सशोधनाच्या दृष्टीने थोडा सघटितपणा आलेला दिसतो

भारतीय विद्यापीठांनी शोधपदवी सुरू केल्याला पचवीसवर वर्षे झाली आहेत *विज्ञानशास्त्रातले सशोधन अतिशय सघटित आहे* तीच गोष्ट सामाजिकशास्त्राच्या क्षेत्रावावत हे वर उल्लेखिले आहे निरनिराळ्या परिषदा (कॉन्फरन्सेस) परिसवाद (सेमिनार), तसेच इतर उपक्रम झालेले आहेत इतकेच नव्हे तर मधूनमधून विशिष्ट विषयातील (उ इतिहास, मानसशास्त्र, उत्खननशास्त्र) सशोधन-पद्धती-बाबत निरनिराळे वर्ग (व्हकेशन क्लासेस) घेतले जातात त्या त्या क्षेत्रातील अवलबावयाच्या विविध पद्धतीवर अनेक ग्रथ निर्माण झालेले आहेत त्याचप्रमाणे राष्ट्रीय नियोजनाशी सामाजिक क्षेत्रातले सशोधन कसे सबद्ध करता येईल या दिशेने विविध उपक्रम होत आहेत विशिष्टीकरणाच्या दिशेने ती शास्त्रे झपाट्याने पुढे जात आहेत त्या शास्त्रातील सशोधन हे केवळ विद्यापीठीय महत्त्वाचे (ॲकॅडमिक) न राहता जीवनाशी त्याचा अनुबध कसा जोडता येईल हे पाहिले जात आहे त्याचे

राष्ट्रीय जीवनातील महत्त्व ओळखले जात आहे विद्यापीठाची खाती (डिपार्टमेंटस्) कार्यवाही झालेली आहेत

## साहित्यक्षेत्रीय संशोधन : गैरसमजाची कारणे

वाङमयीन क्षेत्रातील सशोधन हे केवळ दुर्लक्षित आहे असे नाही तर अनेक प्रकारच्या गैरसमजाच्या आहारी ते गेलेले आहे सशोधनक्षेत्रात वाङमयीन क्षेत्रातील सशोधनासबधी नेहमीच प्रतिकूल मत असते अर्थात यालाही काही कारणे जबाबदार आहेत हे खरे

पहिले कारण म्हणजे वाङमयीन क्षेत्रीय सशोधन हे सामान्यत सर्व-सुगम असते म्हणजे त्यात विशिष्ट परिभाषेची खटखट नसते भाषा रोजच्या व्यवहारातील असते (मतभेद होतात ते अशा सशोधनासबधीच होतात ) त्यातल्या त्यात प्राचीन वाङमयाशी सबद्ध विषय असेल तर त्याचे महत्त्व केवळ त्याच्या प्राचीनतेमुळे अधिक मानले जाते प्राचीन वाङमयासबधी अत्यत सामान्य विचार विवेचनाचे सशोधन-मूल्य अधिक मानले जाते हाही एक गैरसमजाचाच भाग आहे

दुसरे कारण म्हणजे ह्या क्षेत्रातील सशोधन हे अद्यापपावेतो सघटित झालेले नाही वास्तविक हा त्याचा गुण म्हणावयास हवा कारण त्यामुळेच कदाचित सामान्य अभ्यासकास त्यात प्रवेश मिळणे शक्य होते तज्ज्ञतेची कवचकुडले अद्यापपर्यंत या क्षेत्रापासून थोडी दूर आहेत अर्थात या वस्तुस्थितीमुळे कित्येकदा अतिसामान्य अभ्यासक अतिसामान्य प्रबध लिहून पदवी 'सन्मान्य' मिळवितात, हे काही अशी खरे आहे पण सगळेच तसे नाहीत हे पण मान्य व्हावे

तिसरे व महत्त्वाचे कारण म्हणजे विषयाची निवड, तसेच विशिष्ट पद्धतीचा स्वीकार इ बाबत बरीच साकेतिकता, परपरागतता आहे बराच भर हा समालोचनावर आहे मग ते समालोचन व्यक्ति-साहित्याचे असो, कालखडाचे असो, विशिष्ट वाङमय-प्रकाराचे असो, किंवा भाषाशास्त्रीय विशिष्ट प्रकारच्या पाहणीचे असो अर्थात मागे पाहिल्याप्रमाणे साहित्यक्षेत्राचे असे स्वनिर्मित तत्र नाही तसेच इतर क्षेत्रातील सशोधनात जशी वस्तुनिष्ठा अपेक्षिता येते तशी साहित्याबाबत शभर टक्के अपेक्षिता येत नाही कारण हा प्रात मतापेक्षा मतातरासाठी प्रसिद्ध आहे मागे साहित्याच्या सशोधनावरील प्रकरणात पाहिल्याप्रमाणे साहित्याचे विशिष्ट स्वरूपच ह्या गोष्टीस जबाबदार आहे साहित्यात जी जीवनसहितता असते त्यामुळे शोधकीय पाहणी अधिकाधिक गुतागुतीची होते या जीवनसहिततेमुळेच 'साहित्य' हे अभिधान अधिक अन्वर्थक झाले आहे

## काही अवास्तव अपेक्षा

या सर्वांपेक्षा अति महत्त्वाचे असे कारण आहे व ते म्हणजे विशिष्ट अपेक्षाचे सर्वसामान्य माणसाची-पुष्कळ सुबुद्ध माणसाचीही-अशी समजूत असते की, पीएच् डी सारख्या पदवीचा प्रबंध हा काहीतरी भव्य-दिव्य स्वरूपाचा असावा स्वत अभ्यासकही ह्या समजुतीपासून फारसा अलिप्त असतो असे नव्हे, त्यामुळे पुष्कळ प्रबंध हे विस्ताराने खूप मोठे केले जातात तसेच संशोधन, संकलन, टीका यातील फरक स्पष्ट न झाल्याने एकाची उणीव दुसऱ्याने भरून काढली जाते संशोधनात जी अपार चिकित्सकता असावी लागते ती कुठेच फारशी प्रत्ययास येत नाही तसेच शोध-प्रक्रियेची जाणीवही बेताचीच असते या सर्वांचा परिणाम आजपर्यंतचे विशिष्ट प्रकारचे संशोधन सिद्ध होण्यात झालेला आहे

या बाबतीत काही गोष्टींचा खुलासा करणे अवश्य आहे पहिली गोष्ट संशोधन-प्रबंधाकडे पाहण्याची दृष्टी बदलली पाहिजे प्रत्येक शोधप्रबंध म्हणजे संशोधकाची ज्ञानक्षेत्राला फार मोठी अशी देणगी (काँन्ट्रिब्युशन) नव्हे तर विशिष्ट उद्दिष्ट पुढे ठेवून विशिष्ट (एक किंवा अनेक) पद्धतीचा अवलंब करून, विशिष्ट मुदतीत विशिष्ट नियमाचे प्रतिपालन करून सिद्ध केलेले शोधन त्यातील महती (ओरिजिनॅलिटी) असेल ती विविध प्रकारची असेल तसेच साहित्य हे प्रवृत्तीने स्वविशिष्ट असल्याने त्यातील संशोधनाचे स्वरूपही व्यक्तिगत मतानी युक्त असेच राहणार विज्ञानशास्त्रातील संशोधनाचा काटेकोरपणा वा समाजशास्त्रीय संशोधनातील नेटके पद्धतिवैशिष्ट्य याना त्यात फारसे स्थान नसणार मानसशास्त्र हे पृथक्करण-प्रधानतेकडून (ॲनॅलिटिकल) प्रयोगसिद्धतेकडे (एक्सपेरिमेंटल) झुकत आहे, तसे साहित्यक्षेत्राच्या बाबतीत शक्य होईल असे वाटत नाही ह्या फार मोठ्या मर्यादा आहेत इतर क्षेत्राच्या बाबतीत ह्या मर्यादा मान्य झालेल्या आहेत साहित्याच्याबाबत अद्याप ते काम व्हावयाचे आहे

## शोधकाना उद्देशून थोडेसे

संशोधन विद्यार्थ्यांना उद्देशूनही असे म्हणता येईल की, त्याच्या बाजूने वरील युक्तिवाद करता आला तरी साहित्यसंशोधनात व समाजशास्त्रीय संशोधनात पृथक्करणाला (ॲनॅलिसिस) फार महत्त्व आहे, समालोचनाला नव्हे साहित्य हे प्रयोगसिद्ध शास्त्र म्हणून जरी सिद्ध होऊ शकले नाही तरी, त्यातील संशोधनात पृथक्करणाची विविधता, चिकित्सकता इ गुण दिसावयास हरकत नाही काटेकोरपणा हा तर गुण आम्हाला अद्याप शिकावयाचाच आहे तसेच संशोधन ही एक विशिष्ट प्रकारची स्वमान्य शिस्त आहे, तिचे संस्कार शोधकावर झालेले आहेत

म्हणून संशोधन म्हणजे सोद्देश व विशिष्ट मर्यादेत-नियमांच्या साक्षीने अवलंब करून केलेले लेखन या गोष्टीचा प्रत्यय पानापानातून येईल अशी दक्षता घेणे अवश्य आहे.

## संशोधन अधिक संघटित असावे

साहित्यक्षेत्रात एक दृष्टीने मालूम आहे ते संघटित नाही, त्यात नावीन्य, कल्पकता, प्रयोगाची पद्धतीची विविधता इ. आणण्याचा उपक्रम फारच अल्प प्रमाणात होत आहे. त्यामुळे ह्या क्षेत्रातले संशोधन हे पूर्णपणे पांडित्यप्रधान राहिले आहे. त्यात जीवनाभिमुखता आणण्याचा प्रयत्न अल्प आहे. साहित्याच्या प्रांतात विषयाचे दारिद्र्य तर फार जाणवते. एकेका विषयावर एकच प्रकारचे अनेक उपक्रम आढळतात. गेल्या पंचवीस वर्षांत हिंदी भाषेत साहित्य विषयावर ५०० च्या वर प्रबंध लिहून झालेले आहेत. त्यात विषयाचे नावीन्य अभावानेच आणवते हा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. मराठीत आतापर्यंत पन्नास-साठ जणांनी ही पदवी मिळविली असेल. त्यांच्या प्रबंधाचे शोधदृष्टीने समीक्षण व्हावयास हवे. भारतात दरवर्षी अंदाजे ३०० शोध-पदवीधारक बाहेर पडतात. हे प्रमाण यापुढे अधिक वाढणार आहे.

शासकीय यंत्रणेकडून कोणते दुर्लक्ष होते असे नव्हे. महाराष्ट्र सरकारने 'साहित्य व संस्कृतिमंडळ' स्थापून त्याच्याकरवी निरनिराळे उपक्रम हाती घेतले आहेत. तथापि आज अशी वेळ आली आहे की, संशोधन-क्षेत्राबाबत साहित्य व संस्कृतिमंडळ, विविध स्वतंत्रतया स्थापन झालेल्या संशोधनसंस्था, निरनिराळ्या प्रादेशिक स्वरूपाच्या साहित्य-संस्था आणि राज्यातील विविध विद्यापीठे व त्यांची खाली यांच्या कक्षा व कार्यक्षेत्रे, निश्चित व्हावयास हवीत. कार्य बरेच चालू आहे; पण ते अधिक संघटित व सुसूत्र कसे होईल व त्यात अधिकाधिक समावेशकता कशी येईल या दृष्टीने उपक्रम होणे जरूर आहे असे वाटते.

## संशोधनाची ध्येये

शेवटचा प्रश्न म्हणजे संशोधनाच्या ध्येयाबाबतचा. या प्रबंधात आतापर्यंत शोध-लेखन हे सोद्देशलेखन (राइटिंग विथ परपज) आहे. हा उल्लेख वारंवार आलेला आहे. हे उद्दिष्ट किंवा 'परपज' हे विषया विषयाप्रमाणे बदलू शकेल. साहित्य-संशोधनक्षेत्रातील मौलिकता ही उच्च उद्दिष्टावर अवलंबून आहे. कलाक्षेत्रात आत्माविष्काराला, नवनिर्मितीला, सौंदर्यनिर्मितीला तसेच जीवनभाष्याला स्थान आहे. संशोधनातील ध्येयाबाबत सर्वसामान्यपणे असे म्हणता येईल की, विज्ञान-क्षेत्रीय संशोधनाचे अंतिम उद्दिष्ट सत्य हे आहे. सामाजिक क्षेत्रातील संशोधनाचे उद्दिष्ट सत्य व शिव आहे. सामाजिक शास्त्रात नुसत्या सत्यावर भर देऊन

मागत नाही, तर त्याला 'शिवा'ची, कल्याणाची जोड द्यावी लागते म्हणजे सत्याचा व शिवाचा शोध हे सामाजिक-शास्त्राचे संशोधकीय ध्येय. तर साहित्य व कलाच्या क्षेत्रात ह्या तिहींचा समन्वय झालेला आहे म्हणजे सत्य, शिव, सुंदर याचा परिशोध करणे हे साहित्य-कलादी क्षेत्रातील संशोधनाचे ध्येय ध्येय-विचार हा कलाच्या बाबतीत जसा महत्त्वाचा तसा शोधनाच्या बाबतीतही होय

अर्थात सगळ्या शोधक्रियेचा रोख हा सत्य जाणून घेण्याच्या दिशेने असतो, हे खरे आहे पण हे सत्य विज्ञानशास्त्रात एक प्रकारचे असते त्याला वैज्ञानिक सत्य म्हणता येईल सामाजिक शास्त्रात ते ऐतिहासिक वा नैतिक सत्याच्या स्वरूपात अवतरेल, तर वाङ्मयाच्या आणि कलेच्या क्षेत्रात ते आगळ्याच स्वरूपात आढळेल सत्याचे स्वरुप बदलते याचे कारण, ज्या क्षेत्राच्या माध्यमाने आपण ते पाहण्याचा वा शोधण्याचा प्रयत्न करतो, त्या क्षेत्राच्या नियमसंकेतांनी ते मर्यादित होते संशोधनातले 'सत्य' असे मर्यादित व सापेक्षच असते त्याची सापेक्षता ठरविण्याचे मार्ग या तीन क्षेत्रात वेगळे वेगळे कसे आहेत, ते पूर्वीच्या प्रकरणातील विवेचनावरून अधिक स्पष्ट होईल

## काही सूचना

विद्यापीठातील संशोधन संघटित होण्याला जरी अवधी असला तरी त्यात एकसूत्रीपणा असण्यास काहीच प्रत्यवाय नाही त्यासाठी संबंधितासाठी काही सूचनांचा उल्लेख करणे योग्य होईल

पहिली सूचना अशी की, एका क्षेत्रात (विषयात) संशोधनाशी संबद्ध असणाऱ्या अभ्यासकांनी एकत्र येण्याची काही तरतूद किंवा यंत्रणा निर्माण केली पाहिजे प्रादेशिक भाषेला विद्यापीठामधून जे महत्त्व येत आहे, ते यापुढे तसेच राहणार आहे, असे गृहीत धरले तर, एक राज्य (उ आपल्या बाबतीत महाराष्ट्र) हा एक घटक कल्पून त्यातील विद्यापीठातील निरनिराळ्या विषयातील शोध-शिक्षकांनी वर्षातून एकदा तरी एकत्र येण्याची काही व्यवस्था निर्माण करावयास हवी मराठीचे उदाहरण म्हणून घेऊन असे म्हणता येईल की, या विषयात संशोधन मार्गदर्शक म्हणून मान्यता मिळालेल्या प्राध्यापकांची एक बैठक एकेका विद्यापीठाने एकेका वर्षी घ्यावी त्यायोगे संशोधनविषयक हालचालीत (अॅक्टिव्हिटीज) एकसूत्रीपणा येण्यास मदत होईल नव्या कल्पना, नव्या योजना, विचारात घेतल्या जातील, त्यायोगे विलग पणाने मासमान होणारी कुचंबणा थांबेल, तसेच अभ्यासविषयातील पुनरुक्तीही टाळता येईल एकदरीने त्या विषयाच्या अभ्यासक्रमात सर्वच विद्यापीठात समान

धोरण व समान प्रमाणितता (स्टँडर्ड) राहण्यास ह्या उपक्रमाचा उपयोग होईल शोधविषयक सर्व प्रश्नांची मनमोकळेपणाने साधी चर्चा झाली तरी पुष्कळ होईल एवढे. चांगली कल्पना एखाद्याच विद्यापीठाने सुरू केली तर तिची चर्चा, मीमांसा, इ होऊ शकेल व इतरानाही तीतून काही स्वीकारता येईल हे सारे मांडीत असता मराठी विषयाचा उल्लेख केला, तो एक उदाहरण म्हणून सर्वच विषयांच्या बाबत हा उपक्रम व्हावयास हवा दोन-तीन वर्षांनी शोध-मार्गदर्शकाबरोबर शोध विद्यार्थ्यांना-सुद्धा बोलावण्यास हरकत नाही आजच्या संशोधनाच्या अवस्थेमध्ये अशा उपक्रमाची अत्यंत आवश्यकता आहे

सध्या विद्यापीठात संशोधनाचे काम करण्यासाठी (पदवीसाठी प्रामुख्याने) अनेक विद्यार्थी येतात बी ए व एम् ए ह्या परीक्षांतील प्रावीण्य हा एक मुद्दा त्यांचा अर्ज स्वीकारण्यासाठी विचारात घेतला जातो पण अशी वेळ आलेली आहे की, त्यांच्याकडून नाव नोंदण्यापूर्वी एखाद्या लहानशा विषयावर (प्री-डॉक्टरेट) असे शोध-समान काम करून घ्यावयास हरकत नाही अशा प्रकारचे अनेक विषय आहेत की, त्यांच्यावर पीएच् डी च्या दर्जाचे संशोधन होणे कठिण आहे पण शोधन व्हावयास हवे. मार्गदर्शकाजवळ अशी यादी असेल तर ठीकच आहे एखाद्या मोठ्या योजनेच्या पूर्वतयारीचा भाग म्हणून त्याला असे अनेक विषय सुचतील त्यायोगे एक महत्त्वाचे कामही होईल वाङ्मयात तुलनात्मक संशोधनास सुरवात व्हावयास हवी, हा उल्लेख मागे आलेला आहे व त्याच ठिकाणी त्यासाठी आवश्यक असणाऱ्या उपक्रमाची थोडी स्पष्ट कल्पना दिलेली आहे अशा उपायाने त्या विद्यार्थ्याला संशोधनाबद्दल अशी साधने (बिब्लिऑग्रॅफी) कशी वापरावी वा तयार करावी यासंबंधीचे ज्ञान मिळेल त्यातून एखादा विषय गवसेल व व्यापक व सर्वोपयुक्त असे काम जाता जाता होईल. हे काम अर्थात मार्गदर्शकाच्या सल्ल्याने व्हावयाचे असल्याने त्यात बिनचूकपणा सखोलता इ गुण येण्यास मदत होईल

अशा प्रकारचा दुसरा विषयगट सुचवायचा तर असा सुचविता येईल की, साहित्याच्या दृष्टीने महत्त्वाचा असणारा एखादा प्रमाणभूत इंग्रजी (सामान्यत इंग्रजीच बरा) ग्रंथ घ्यायचा व त्यातील दोन-तीन प्रकरणांचे भाषांतर विद्यार्थ्याकडून करवून घ्यायचे अगदी सोपा विषय घ्यायचा झाला तर विशिष्ट विषयाच्या विशिष्ट परीक्षेच्या अभ्यासक्रमातील गेल्या १५–२० वर्षांतील बदलांची पाहणी करणे, एक-दोन विद्यापीठांचे अभ्यासक्रम तुलनात्मक दृष्टीने पाहणे इष्ट थोडक्यात सांगावयाचे तर अशी काही योजना शोधसंबद्ध लोकांपुढे विचारासाठी हवी एकसूत्रीपणाने ती अमलात आणली तर अधिक फलद्रूप होईल

निर्णय घेणे योग्य होईल नाहीतरी भारतीय भाषांच्या खऱ्या अभिवृद्धीसाठी एका खऱ्या भाषांतरयुगाची आवश्यकता आहेच मग तो मार्ग विद्यापीठांनी मोकळा करावयास काय हरकत आहे? येथे भाषांतर हे केवळ वाङ्मयीन ग्रंथांचे अभिप्रेत नाही तर, वैज्ञानिक व सामाजिक शास्त्रीय ग्रंथही त्यात गृहीत धरले आहेत

## जीवनांगाशी सांगड

संशोधनाशी संबद्ध असणाऱ्या अनेक प्रश्नांचे, कल्पनांचे विवरण आतापर्यंत केले प्रस्तुत लेखक हा वाङ्मयाचा अभ्यासक असल्याने साहित्यातील उदाहरणे अधिक झाली असतील तर ती केवळ अनुषंगाने आली आहेत असे म्हणावे कोणतेही एक संशोधनक्षेत्र लेखकाच्या दृष्टीपुढे प्रामुख्याने नाही तथापि वाङ्मयाच्या संशोधनाला स्वतंत्र स्थान देण्याचा ह्या ठिकाणचा प्रथरूप असा हा पहिलाच उपक्रम आहे असे वाटते तरीहि एकंदर भूमिका ही सर्वच प्रकारच्या संशोधनास डोळसपणे चालना मिळावी अशी आहे, व ती शेवटपर्यंत तशीच टिकविण्याचा प्रयत्न केला आहे

आपण ज्या एका योजनाबद्ध पद्धतीच्या जीवनात प्रवेश करीत आहोत त्यासाठी तयार राहायचे असेल तर शोधवृत्तीला चालना मिळेल व ती जागृत राहील अशी व्यवस्था करावयास हवी यापुढचे, आपल्या नव्हे साऱ्या जगाचेच जीवन योजनाप्रधान होत चालले आहे आणि या जीवनात स्वत्व टिकवावयाचे असेल तर संशोधनवृत्तीचा अंगीकार अवश्य आहे ह्या वृत्तीची किती तीव्र आवश्यकता आहे हे रोजची वृत्तपत्रे जरी डोळसपणे वाचली तरी पटू शकेल

## *संशोधन : कालची अवस्था*

तेहतीस वर्षापूर्वी गुरु० प्रा माटे यांनी "विज्ञानबोध" हा आपला प्रसिद्ध ग्रंथ प्रकाशित केला (व त्या नावाचे वार्षिकही काढण्याचा त्यांचा मनोदय होता). ह्या ग्रंथात 'घरचे वारे बदलले पाहिजे' असा आदेश देऊन विज्ञानाचे महत्त्व पटवून विज्ञानमय वातावरण घरोघरी निर्माण व्हावे, अशी मनीषा त्यांनी व्यक्त केली त्याच सुमारास आपल्या देशात समाजवादी विचारधारा सुरू झाली आणि विज्ञानाला पोषक अशा

आहे ह्या विचाराचा आग्रह धरणारात वा म जोशी, वि सावरकर, प्रा न र फाटक, प्रा द के केळकर, डॉ पु ग सहस्रबुद्धे प्रा ग वा सरदार, इ नी आपल्या लेखनाने विशेष प्रयत्न केलेले आहेत समाजवादी विचाराचा अंगीकार ज्यानी केला होता व महाराष्ट्रात ती परपरा रुजविण्यात ज्यानी विशेष परिश्रम केले त्यात तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, धा वा गाडगीळ, न वि गाडगीळ, डॉ आबेडकर इत्यादींच्याबरोबर या सदर्भात आचार्य जावडेकर, विनोबा भावे, भागवत, वि स खाडेकर, आदींचा उल्लेख आवर्जून करावा लागेल ही झाली कालची स्थिती

## आज

ह्या व्यक्तिगत प्रयत्नाबरोबर या क्षेत्रातील कालआजच्या आणखी काही वैशिष्टयपूर्ण उपक्रमाचा उल्लेख करणे योग्य होईल आगरकराच्या नंतर महाराष्ट्रात बुद्धिवादी परपरा वाढीला लावण्याचे कार्य सातत्याने ज्यानी केले त्याच्यात शकरराव किर्लोस्कर व त्याचे 'किर्लोस्कर' मासिक ह्याचा हातभार फार मोठा आहे आजही महाराष्ट्राच्या जीवनाच्या विविध अंगोपागाची चर्चा ज्या भूमिकेने या मासिकातून केली जाते तीत आधुनिक प्रकारच्या शोध-बुद्धीचा भाग फार मोठा आहे

लोकवाङमयाच्या सकलनात, सशोधनात, प्रचारात, डॉ सरोजिनी बाबर ह्याचा असाव मोठा वाटा आहे त्याचे ह्या बाबतीतले काम प्राथमिक अवस्थेस साजेसे आवश्यक असेच आहे सशोधनाचे हे दालन त्यानी सपन्न केले आहे तर विज्ञान लोकप्रिय करण्यात डॉ प्र न जोशी याचे लेखनाचा हातभार मोठा आहे ज्ञानाच्या सकलनाच्या क्षेत्रात अनेक प्रकारचे कोशवजा ग्रथ आज तयार होत आहेत महादेवशास्त्री जोशी याचा भारतीय सस्कृतीकोश, ग न भिडे याचा अभिनव ज्ञानकोश, प्रा वाडेकर याचा तत्त्वज्ञान-कोश, हे या सदर्भात निर्देशनीय आहेत

विद्यार्थ्यांच्या ठायी ही शोधवृत्ती वाढीला लागावी म्हणून डॉ ग श्री खैर यानी एक चागला उपक्रम त्याच्या महाराष्ट्र विद्यालयात सुरू केला व तो कितीतरी वर्षे चालविलेला आहे शालेय विद्यार्थ्यांना सुट्टीत एखादा विषय नेमून देऊन त्याच्याकडून सरळ प्रवचन लिहून घेतले जातात सशोधन वृत्तीची वाढ होण्याच्या दृष्टीने केलेला शालेय जगतातील हा अतिशय महत्त्वाचा व उल्लेखनीय उपक्रम होय

साहित्यक्षेत्रीय उपक्रमात आणखी काही गोष्टीचा उल्लेख या सदर्भात करावा लागेल व तो म्हणजे विविध वाङ्मयीन नियतकालिकानी केलेले कार्य ह्या दृष्टीने सत्यकथा, अभिरुची (जुनी व नवी), छद, आलोचना इ चे उपक्रम लक्षणीय होत याशिवाय निरनिराळी विद्यापीठे, आणि विविध साहित्य व सशोधन सस्था याच्या मार्फत चालू असलेल्या विविध उपक्रमानी कालचे आजचे सशोधन सिद्ध झालेले आहे

हे कालच्या आजच्या सधिकाळाचे चिन्ह होय हे सारे उपक्रम सशोधनातील पूर्वतयारीचा (फॉर्म्याटिव्ह) अवस्थेचे द्योतक होत आज ती अवस्था सपून व्यवस्थापनाची (सिस्टिमटायझेशन) अवस्था सुरू झालेली आहे, असे म्हणता येईल

देशाच्या स्वातत्र्याची प्रभात उगवली व 'आज' सुरू झाला पडित नेहरूसारखा समाजवादाग्रही नेता सत्ताधिष्ठित झाला समाजवादाच्या दिशेने सरकारी धोरणाची पावले पडू लागली, पचवार्षिक योजना सिद्ध झाल्या, सर्वांगीण प्रगतीचे विविध उपक्रम सुरू झाले मध्यान्हीला महाराष्ट्र राज्यही अस्तित्वात आले, बद्धमूल झाले, त्याची प्रगतीही चालू आहे, 'जगन्नाथाचा रथ' गती घेऊ लागला आहे

## उद्याच्या उंबरठ्यावर

विज्ञानाचे डिंडिम आज सर्वत्र गर्जले जातात, त्याच्या वाढीच्या दृष्टीने विविध क्षेत्रात विज्ञानविकासाचे विविध प्रकल्पही हाती घेतले जात आहेत, त्यानी 'उद्या' उगवणार आह ह्या विज्ञानविकासाबरोबर, ह्या पचवार्षिक योजनाबरोबर, वैज्ञानिक दृष्टि ऊर्फ शोध वृत्ती ही वाढीला लागलेली दिसत नाही विज्ञानाच्या बरोबर जुन्याचे, जीर्णतेचेही सवर्धनही तितक्याच कटाक्षाने चालू आहे विज्ञानविषयक व एकदर प्रगतीचा राजकीय कारणासाठी उपयोग करून घेतलेला दिसतो असेच काही काळ चालू राहिले तर विज्ञान येईल, म्हणजे वैज्ञानिक प्रगती होईल, आर्थिक प्रगतीही होईल, अशी 'उद्या' उजाडेल, पण सवेदनाशील वृत्तीचा मनुष्य झटकन प्रश्न करील 'उजाडले ! पण सूर्य काठे ?'

असे व्हावयाच नसेल तर एक प्रकारची शोधवृत्ती वाढीला लागावयास हवी निदान महाविद्यालयामधील विद्यार्थ्यांमध्ये ती वाढीला लागल, असे काही काम करून घ्यावयास हवे शोध-कार्यात मानवी मनाच्या विश्लेपण व सश्लेपण या दोन्ही वृत्ती व शक्ती कार्यवाही होतात, त्याचाच पुढे जीवनाच्या उभारणीसाठी व भरणपोषणासाठी उपयोग होत असतो ती शोधवृत्ती वाढीला लागावी अशी तीव्र इच्छा आहे

म्हणून हे सशोधनाचे 'शोधन ऊर्फ चितन' एका विषयापुरते मर्यादित न ठेविता त्याचा पाया जास्तीत जास्त रुद ठेवण्याचा उपक्रम केला आहे कालच्या महाराष्ट्रात हा विचार वाढीला लावणारात मराठीच्या प्राध्यापकाचा, साहित्यकाचा वाटा मोठा आहे [ प्रत्यक्षात विज्ञान व सशोधन जेव्हा मूर्तरूप धारण करील तेव्हा ते कोठेच नसतील ] त्या दिशेने आणखी पावले पडावी म्हणून आज तयार केलेला हा एक उपक्रमरूपी विचार-गुच्छ उद्याच्या महाराष्ट्राच्या सशोधनमदिराच्या कोनशिलेवर समर्पण केला आहे

# परिशिष्ट पहिले*

## संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी काही महत्त्वाच्या प्राथमिक सूचना

या सूचना अतिशय स्थूल स्वरूपाच्या सारांशरूप आहेत. निवडलेल्या विषयापरत्वे त्यांत आवश्यक तो बदल करणे जरूर आहे.

● कामाचे वेळापत्रक तयार करा. पहिल्या एकतृतीयांश कालात या गोष्टी करा—सर्वसामान्य वाचन, साधने, साहित्य जमविणे, विषयाबाबतची आपली भूमिका निश्चित करणे इ.

● पुढील कालात, अधिक वाचन, चिंतन, प्रत्यक्ष लेखन इ. सर्व महत्त्वाची कामे करा.

● लेखन पूर्ण झाल्यावर मग विद्यापीठासाठी तयार करावयाच्या प्रतींच्या सिद्धतेला लागा.

● आपल्याला म्हणायचे ते निःसंदिग्धपणे म्हणावे. अलंकारिक भाषेचा शक्यतो अवलंब करू नये. अर्थात स्पष्टीकरणासाठी एखादा दृष्टान्त वा उदाहरण द्यावयास हरकत नाही.

● संशोधनात्मक लेखनात अतिशय महत्त्वाची गोष्ट म्हणजे विविध प्रकारचे आधार. आधार देताना शब्दाच्या डोक्याजवळ उजव्या बाजूस अंकनिर्देश असावा. संदर्भ त्याच पानावर खाली द्यावेत अगर एखाद्या प्रकरणातील अशा संदर्भांची जंत्री त्या त्या प्रकरणाच्या शेवटी जोडावी. आधार हा संशोधनाचा गाभा आहे हे लक्षात घेऊन हे आधार बिनचूक असावे, तसेच अधिकृत असावेत. पुस्तकाचे लेखक, आवृत्ती, पृष्ठ, प्रत इ. चा खुलासा स्पष्ट असावा.

● संशोधनपर अनेक ग्रंथ व लेख इ. वाचन ह्या बाबतीतल्या विविध प्रकाराचा, पद्धतीचा अभ्यास करावा व मग त्याबाबतचे धोरण ठरवावे. आधार देण्याचे काही तंत्र आहे, काही संकेत आहेत, त्यांचा अभ्यास करावा. कोणते तरी एक धोरण शेवटपर्यंत अवलंबावे.

---

*प्रस्तुत लेखकाने त्याच्या मार्गदर्शनाखाली पीएच. डी. पदवीसाठी काम करणाऱ्या विद्यार्थ्यांना उपयुक्त होतील अशा काही सूचना केल्या होत्या. सर्व साधारण शोध विद्यार्थ्यांनाही त्या उपयुक्त होतील म्हणून त्या येथे उद्धृत केल्या आहेत.

● शक्य असेल एक तर किंवा दोन अगर तीन परिच्छेदातील वर्णिलेल्या विषयाची कल्पना देणारे उपशीर्षक (पोट मथळा) देण्याचा प्रयत्न करावा त्यायोगे एक प्रकारचा नेमकेपणा व सुसूत्रता येण्यास मदत होईल

● एखादे प्रकरण पूर्ण झाल्यानतर त्यात चर्चिलेले मुद्दे व काढलेले निष्कर्ष शेवटी थोडक्यात देण्याचा प्रयत्न करावा अनेक प्रबधात या प्रकारचा अवलब केलेला असतो

● आपण तयार केलेला आराखडा सतत पुढे ठेवावा एखादे प्रकरण लिहून झाल्यावर त्या आराखड्यात काही बदल करणे आवश्यक आहे काय, हे पाहावे आणि त्याप्रमाणे योग्य त्या बदलाची नोंद करावी

● प्रत्येक प्रकरण लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी त्यात चर्चावयाचे विषय लक्षात घेऊन आवश्यक ते लेख, पुस्तके, कात्रणे, टीपा इ सर्व नीट परत काळजीपूर्वक वाचावे, शक्य तो हे सारे साहित्य हाताशी असावे महत्त्वाच्या पुस्तकाच्या नोट्स काढलेल्या असाव्यात नोटस काढण्याची सवय करावी

● एखाद्या विषयाचे विवेचन लिहून झाल्यानतर पुढील प्रश्न मनात धरून त्या परिच्छेदाच्या विवेचनावर पुन दृष्टिक्षेप टाकावा

प्र १ : ह्या परिच्छेदाचा अर्थ काय होतो? प्र २ : मला म्हणावयाचे ते हेच काय ? ह्या दोन्ही प्रश्नाची उत्तरे तुमच्या दृष्टीने समाधानकारक होण्यासाठी झालेल्या लेखनात आवश्यक तो फेरफार वेळीच करावा

● सामान्यत तयारीचे आपणास समाधान वाटले व एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण झाला की मग प्रत्यक्ष लेखनास सुरुवात करावी, तोपर्यंत नुसती टिपणे काढावीत, विचाराची जुळवाजुळव करावी विवेचनाचा निश्चित आशय मनात तयार झाल्याविना लिहावयास घेऊ नये तसेच लिहून झाल्यावर दोन तीन दिवस जाऊ द्यावे व मग झालेले लिखाण पुन वाचावे

● विशेष महत्त्वाचे विषय प्रत्यक्ष प्रबधात आणता येत नाहीत पण त्याचा उपयोग आपणास झालेला असतो व प्रबधाच्या विषयाशी ते एकापरीने सबद्ध असतात अशा विषयाची एक नोंदी करावी व प्रत्येक प्रकरण हातावेगळे केल्यानतर ह्या सबद्ध विषयाचे सर्वसाधारण टिपण तयार करून ते त्या प्रकरणाचे परिशिष्ट म्हणून तयार करावे अशी परिशिष्टे एक किंवा अनेक असू शकतील ती कोष्टक, यादी, उतारा, इ स्वरूपाचीही असू शकतील

● मधून मधून मार्गदर्शकास भेटावे त्याना करीत असलेल्या व झालेल्या कामाची कल्पना द्यावी मिळविलेले साहित्य, काढलेल्या नोट्स, महत्त्वाची पुस्तके

त्याना दाखवावीत त्याच्याशी झालेल्या चर्चेनुसार फेरबदल करावा भेटणे शक्य नसेल तर पत्राने कल्पना द्यावी

● प्रबधाच्या लेखनाला सुरवात करण्यापूर्वी सशोधन व सशोधन पद्धतीसबधी स्पष्ट कल्पना येण्यासाठी त्या विषयावरची निदान दोन तीन पुस्तके वाचावी साहित्य, तसेच इतिहास इ विषयासबधाची असली तरी चालतील त्याप्रमाणे आपण निवडलेल्या विषयासारख्या विषयावर लिहिले गेलेले दोन-तीन ग्रथ बारकाईने वाचावेत त्याशिवाय आपण त्या ग्रथापेक्षा वेगळे काय म्हणणार आहोत हे मनाशी नीट ठरवावे व ते धोरण सतत पाळावे

● पहिले काही दिवस केवळ साहित्य जमविण्यात व वाचण्यात घालवावे. वाचलेल्या महत्त्वाच्या पुस्तकाच्या नोट्स काढाव्यात कोणत्या विशिष्ट प्रकरणाकरिता ते पुस्तक उपयुक्त होईल याची नीट नोद करून घ्यावी पुस्तकाच्या याद्या, जत्री इ तयार कराव्यात नोट्ससाठी सुटे चतकोर आकाराचे कागद वापरावे, ते त्या त्या प्रकरणाच्या फाईलमध्ये नीट ठेवावे (प्रत्येक ' प्रकरणाचे एकेक फाईल ' ठेवावे एखादे फाईल सकीर्ण ठेवावे )

● प्रकरणे सामान्यत ओळीने लिहावी एखादे मागचे पुढचे प्रकरण अगोदर लिहिले तरी चालेल चितन, वाचन, मनन सतत चालू असतेच प्रतीत होणाऱ्या विचाराची नोद त्या त्या प्रकरणात करून ठेवावी सामान्यत एकेक प्रकरण सपूर्णतया हातावेगळे करण्याचा परिपाठ ठेवावा काम उरकायला ते बरे असते

● लिहिण्यास प्रारभ करण्यापूर्वी विषयासबधी आपणास जे सागावयाचे ते, उदा०, एखादी नवी उपपत्ती, किंवा रूढ उपपत्तीचे खडन, अगर मडन, एखादी मीमासा, प्रक्रिया, कारणपरपरा, अशासारखे आपणासमोर काहीतरी निश्चित असावे किंबहुना अशी निश्चित भूमिका ठरेपर्यंत सर्वसामान्य वाचन (General Reading) चालूच ठेवावे आपली भूमिका स्थूल मानाने ठरल्यावर मग अधिक सखोल वाचनास (Intensive Reading) सुरुवात करावी यासाठी थोडा जास्त वेळ लागला तरी चालेल अन्याशी चर्चा करूनही ते ठरवावे

● सशोधनातील मौलिकतेबाबत निरनिराळी मते आहेत त्या मौलिकतेचे स्वरूप सशोधनाच्या विषयाप्रमाणे, व्याप्तीप्रमाणे बदलते सशोधन ही विशिष्ट प्रकारची वृत्ती आहे विशिष्ट सकेताचा, नियमाचा अवलब करून आपल्या विषयावरील अभ्यासात व विचारात एक प्रकारची शिस्त आणण्याचा तो प्रयत्न आहे ही शिस्त अगी बाणणे हे सशोधनाचे उद्दिष्ट आहे ह्या दृष्टीने आपल्या लिखाणाकडे पाहावे विषयातील पारगतत्वाइतके व पाडित्याइतके ह्या शिस्तीचे महत्त्व आहे हे ध्यानात असू द्यावे

# परिशिष्ट दुसरे

## मराठीत दुय्यम अंकपद्धती *

[मराठीच्या वाढत्या प्रसाराला उपयुक्त होण्यासारखी एक अभिनव कल्पना]

"कोणाच्या डोक्यातून केव्हा काय कल्पना निघेल आणि तीपासून समाजाचा केवढा फायदा होणार आहे हे अगोदर कधीही सांगता येण्यासारखे नाही ज्या मतास आपण तऱ्हेवाईक म्हणतो, ती त्याच्या नावीन्यामुळे बहुधा तऱ्हेवाईक वाटतात ती पुन पुन कानावर पडू लागली म्हणजे त्याचा धाक वाटेनासा होऊन हळहळू त्यातील गुणावगुणाचा विचार करण्याची बुद्धी होऊ लागते आणि अखेरीस ती अंगीकारण्याची इच्छा होते"

— आगरकर

मराठी भाषेची प्रगती ही दिवसदिवस फारच झपाट्याने होत आहे, एक प्रकारचे जिवंतपणाचे व चिकित्सेचे वातावरण सर्वत्र दिसत आहे त्यामुळे नवीन गोष्टी येणे अगदी साहजिक आहे तेव्हा मराठी आकड्यांबद्दलही नवीन सोय करणे अपरिहार्य झाले आहे

### इंग्रजीचे अनुकरण

'मराठी आकडे!' काय बुवा याच्यात आता काय नवीन हवे ? ते कशासाठी? का उगाच आपले काही खूळ डोक्यात आले त सुचवावयाचे ? जे आकडे आहेत ते काय अपुरे आहेत, का वाईट आहेत ? अशा प्रकारचे प्रश्न पुष्कळांकडून विचारले जाण्याचा संभव आहे, या लेखात त्या बहुतेकांना उत्तरे मिळतील

### आकड्यांची अडचण

इंग्रजी (रोमन) लिपीत आकड्यांचे दोन प्रकार आहेत व त्यांचा उपयोग स्थलपरत्वे निरनिराळ्या ठिकाणी करण्याची प्रथा पडून गेली आहे एका विशिष्ट ठिकाणी कोणते आकडे वापरावयाचे हे लिच्या योगाने ठरले आहे हे प्रकार दोन, एक रोमन व दुसरे अरेबिक या द्विविध पद्धतीमुळे लेखनात सौकर्य, सौंदर्य व विविधपणा आलेला आहे मराठीतही तशा प्रकारचे आकडे असण्याची काहीतरी व्यवस्था असणे जरूर आहे ही अडचण सामान्य वाचकापेक्षा ग्रंथकार, लेखक अगर तत्सम-व्यवसायी लोक यास भासत असेल, परंतु इंग्रजीतील रोमन पद्धतीवर मराठीत

* पूर्वी प्रकाशित झालेल्या एका लेखाचे, थोडी काटछाट करून केलेले पुनर्मुद्रण

नवीन आकडे करणे हे निरनिराळ्या कारणास्तव अशक्य झालेले आहे. कारण अगोदरच आपल्या लिपीचे खिळेघर (केस) वाजवीपेक्षा जास्त विस्तृत झाले आहे, आणि त्यातहि अशी आणखी भर घालणे म्हणजे अधिक अडचणीत आपण होऊनच पडण्यासारखे आहे. परंतु या अडचणीचे निराकरण होऊन, आहे ह्या स्थितीतच एखादी नवीन पद्धती पाडता आली तर ती स्वीकारण्यास काय हरकत आहे ?

## रोमन आकड्यांचे मराठी प्रतिनिधी

एखाद्या पुस्तकाच्या प्रस्तावनेचे पृष्ठांक, प्रकरणाचे अंक, प्रश्नपत्रिकेतील प्रश्नाचे अंक अगर उपप्रश्नाचे अंक, या ठिकाणी तरी इंग्रजीत रोमन आकडे वापरण्याची पद्धत आहे. हे आकडे आणखीही काही ठिकाणी वापरणे हे रूढ नियमानी ठरून गेले आहे. व या पद्धतीचा फायदा एखादे इंग्रजी पुस्तक वाचावयास घेतले असता तावडतोब दिसून येतो. उलट एखादे मराठी पुस्तक घ्या; त्यातील प्रस्तावनेचे पृष्ठांक फक्त तेच आकडे कंसात टाकून दिलेले असतात, किंवा अलीकडे ते क्वचित् प्रसंगी अक्षरात लिहिलेले असतात. त्यामुळे त्याच्यात काही वैशिष्ट्य असे नसते. तीच गोष्ट प्रश्नपत्रिकेची. एखाद्या विभागास अगर पोट-विभागास आम्हास अ, आ, इ, इत्यादी अक्षरे वापरावी लागतात; आणि जर अशी संख्या जास्त असली तर मग विचारावयासच नको. तेव्हा अशा ठिकाणी काही निराळ्या प्रकारचे आकडे उपलब्ध झाल्यास त्यामुळे सौकर्य, सौंदर्य व विविधपणा वाढेल. वर दिलेल्या बाबीपुरताच या अक्षरांचा उपयोग मर्यादित आहे असे मात्र नव्हे. इंग्रजीतील रोमन आकड्यांचा उपयोग विविध ठिकाणी होतो, तसाच या नवीन पद्धतीचा व्हावयास हरकत नाही.

इंग्रजीत हे आकडे काही अक्षरांवर बसवले आहेत. I, V, X, L, व C यांवर त्याचे अधिष्ठान झालेले आहे. या पद्धतीप्रमाणे काही मराठी अक्षरांवर आकडे बसवणे अत्यंत घोटाळ्याचे व अवघड होऊन बसणार आहे. त्याच्यातील पद्धती इतकी डोळ्यात बसली आहे की, नुसती ही अक्षरे आली असता, त्याचा बोध होत नसून ती ज्या आकड्यांची दर्शक आहेत त्याचा बोध होतो. मराठीत तसे होणे अत्यंत दुरापास्त आहे. तेव्हा काहीतरी नवीन योजना योजणे जरूर आहे. माझ्या कल्पनेप्रमाणे मी अशी नवीन योजना सुचविणार आहे. ती सुटसुटीत आहे, सहजसुलभ आहे व लोकांस माहितही आहे; फक्त तिचा उपयोग नवीन पद्धतीने करावयाचा आहे. शिवाय तीमुळे केसीतील अक्षरे (खिळे) वाढवावी लागणार नाहीत. तेव्हा नावीन्याच्या कल्पनेस न बुजता तिच्याकडे पाहिले तर ती ग्राह्य वाटेल अशी अपेक्षा आहे.

आपल्या (देशी) जमाखर्चाच्या जुन्या पद्धतीत आणे व पैसे लिहिण्याची एक

वेगळी पद्धत आहे ती अजिबात नष्ट झालेली नाही लोकांस तिची ओळख आहे ती आज कोठेकोठे प्रचारात असली तरी तिचे क्षेत्र दशमांक पद्धतीच्या स्वीकाराने अत्यंत मर्यादित होत आहे, छापील पुस्तकांशी तिचा फारच अल्प संबंध आहे. तिच्या स्वरूपात थोडासा फरक, आणि जरूर तेथें तीत नवीन थोडीशी भर घातली की, आपल्या उपयोगात अगदी इंग्रजीतील रोमन आकड्यांना समांतर अशी पण सर्वस्वी आपली अशी पद्धती तयार करता येते. तेव्हा ती प्रचारात आणण्यास काहीच हरकत नाही. अर्थात् ती सर्वस्वी आहे तशीच इकडे घेणे योग्य नाही, आणि शिवाय ते बरेही नव्हे, अर्थात तिच्यातला ग्राह्य भाग घेऊन त्यावर उभारणी करणे हेच इष्ट आहे

*आणक चिन्हांचा पुनरुद्धार*

उपरिनिर्दिष्ट पद्धतीतील आळयाचे (४) चिन्ह काढून टाकून एक आण्याच्या खुणेपासून मोजण्यास सुरवात करावी म्हणजे, (१=–,) (२==,) (३=≡,) (४=।,) (५=।–,) (६=।=,) (७=।≡,) (८=।।,) अशा प्रकारे उपयोग होईल ४ आकडा हा चार आण्याच्या निदर्शक खुणेवरून घेतला असला तरी त्याच्या दोन्ही बाजूस टिंबे देण्याची जरूर नाही हे आकडे ओळखण्याची आपली सवय अद्याप नष्ट झाली नाही व थोडीशी झाली असली तरी अत्यल्प प्रयासाने ती जिवंत करणे सुलभ आहे ।।= हे दहा आण्याचे दर्शक आहे त्यातील टिंब वगळल्यास तेच आपल्या पद्धतीनुसार दहा या आकड्याचे निदर्शक होईल इतका थोडा फरक आहे. या आण्याचे खिळे छापखान्यातील खिळाघरातून प्रत्येक टाइपात असतात, ते नवीन करण्याची जरूरी नाही ते उपयोगात कमी आहेत, प्रत्येक अंक कसात घालून वापरण्याची पद्धती ठेवली म्हणजे सौंदर्यातही उणीव दिसत नाही थोड्याशा सवयीने (–) (=) (≡) (।) (।–) (।=) (।≡) (।।) (।।–) (।।=) (।।≡) (।।।) (।।।–) (।।।=) (।।।≡) अशी पंधरापर्यंत तरी आकड्यांची ओळख पडण्यास बिलकूल हरकत नाही

आता १६ हा आकडा कसा लिहावयाचा ? माझ्या कल्पनेप्रमाणे मी गुणिले चिन्ह ( × ) [अथवा फुली] घेण्याचे ठरविले आहे ते घेतल्यावर मग एकदम ६४ या *आकड्याकरिता नवीन चिन्हाची जरूर लागते ते चिन्ह (○) वर्तुळाने दर्शवावे असे* मला वाटते तेव्हा, १=[ –,] [४=[ ।,] १६=[ ×,] ६४=[ ○ ] या खुणा लक्षात घरून त्या उपयोगात आणण्याची विशिष्ट पद्धत लक्षात घेतली की आकडे लिहिणेही सोपे जाईल, व पुढे झटपट ओळखताही येतील ६४ च्या पुढे जरुरी लागेल तो फक्त २५६ या आकड्याची; पण मला वाटते त्याची जरूरी लागणार नाही आणि एखाद्या ठिकाणी लागलीच तर ती अनेक काही खूण वसवून

त्याचे स्पष्टीकरण खाली दिले की झाले तेव्हा अगदी बगेवर इंग्रजीतील पद्धतीला समान व तितकीच सुटसुटीत अशी ही संपूर्ण देशी पद्धती उपयोगात आणण्यास हरकत पडू नये

## नवीन पद्धतीचे फायदे

(−) लिपीत एक प्रकारचा विविधपणा येऊन तिचे सौंदर्य वाढेल

(=) ही पद्धती ग्रहण करण्यासही विशेष अवघड नाही

(≡) या पद्धतीने छापखान्यातील खिळाघरात कोणत्याही नवीन अक्षराची (खिळ्याची) भर घालावी लागणार नसून केसीतील कमी उपयोगी खिळ्यांचा उपयोग नवीन रीतीने होईल व हे आजपर्यंत निरुपयोगी ठरलेले खिळे पुढे उपयोगी ठरतील

(।) हे नुसते इंग्रजीचे अनुकरण नव्हे इंग्रजीवरून कल्पना घेतली आहे, पण प्रत्यक्ष स्वरूप मात्र अस्सल मराठी आहे यात आपले असे वैशिष्टय आहे इंग्रजी पद्धतीत ५, १०, ५०, १००, ही मध्यवर्ती अक्षरे धरली आहेत व ते आकडे ओळखताना काही ठिकाणी वजाबाकीचा उपयोग करावा लागतो त्या उलट त्या आकड्यापेक्षा आमचा आकडा बराच लवकर ओळखता येणार आहे आमचे मध्यवर्ती आकडे ४, १६, ६४, हे आहेत व त्यांची मांडणीही अस्सल देशीच आहे

(।−) आता राहता राहिला प्रश्न म्हणजे सुरूपतेचा विरोधकांच्या मते हे आकडे बेढब दिसतील परंतु या म्हणण्यात फारच थोडे तथ्य आहे ही चिन्हे चांगली दिसत नाहीत कारण ती अगदी नवीन आहेत आणि कसात जर ते आकडे टाकले तर ते उठून दिसतात असा अनुभव वाचकांना येईल आणि विशेषत प्रस्तावनाच्या पानावर तरी हे आकडे फारच खुलून दिसतात डॉ सेरांच्या 'जपानची जीवनक्रांती' या पुस्तकाची प्रथम पाने पाहावीत, तेथे ही पद्धती त्यावेळी मुद्दाम वापरून पाहिलेली आहे

(।=) प्रस्तावनेचे पृष्ठांक, अनुक्रमणिकेचे क्रमांक, मुद्दे, पोटमुद्दे, इ ठिकाणा-शिवाय इंग्रजीप्रमाणे आणखीही काही ठिकाणी या आकड्यांचा उपयोग करून घेता येण्यासारखा आहे विविध प्रकारांनी याचा उपयोग करणे आज तरी नावीन्यामुळे लोकांना कसेसेच वाटेल, परंतु काही दिवसांनी तेही योग्य वाटू लागेल कारण यात अडचण येईल ती फक्त टाइपाच्या दिखाऊपणाची एखाद्याने जर याकरिता चांगले आकर्षक टाईप केले तर ते फारच सुरेख दिसतील, तीच गोष्ट पुस्तकातील प्रकरणासंबंधीची

# विषय-सूची

(१३) एखाद्या मासिकाचे अगर नियतकालिकाचे वर्ष (व्हॉल्यूम) इग्रजीत रोमन आकड्यानी दाखवितात तसा उपयोग वर लिहिल्याप्रमाणे नक्षीदार टाईप झाल्यावर आजही करता येण्यासारखा आहे तसेच ज्याप्रमाणे रोमन आकडे उपयोगात आणले असता, Ist, IInd इ लिहिण्याची पद्धत नसते (1st 2nd) अशी असते तशी येथेही नसावी तद्वतच इग्रजीत, George VI, Edward VIII असे उपयोगात आणतात, त्याप्रमाणे 'बाजीराव'–, असा उपयोग करण्यास काय हरकत आहे ? अर्थात असा उपयोग करणे हे सर्वस्वी वापरणाऱ्या व्यक्तीवर अवलबून आहे

हे सर्व विवेचन केवळ सूचकाच्या भूमिकेवरून केले आहे, तज्ज्ञाच्या नव्हे काही एक गरज भासली असता तिजबद्दल ती भागविण्याची सोय 'नाही' अशी विघातक टीका न करता, तिला काही विधायक स्वरूप यावे म्हणून ही योजना सुचविली आहे, व नमुन्याकरिता लेखाच्या शेवटच्या भागात या पद्धतीचा उपयोग करून दाखविला आहे तरी छापखानदार, प्रकाशक, लेखक, सपादक, ग्रथकार व वाचक यानी सहृदयतेने व आपलेपणाने या योजनेचा विचार करून त्यात आणखीहि काही सुधारणा सुचवावयाच्या असल्यास त्या अवश्य सुचवाव्या

['सह्याद्रि' मासिक जुलै १९३९]

## परिशिष्ट तिसरे

वरील लेखाच्या मुद्राप्रती त्यावेळी अनेक अधिकारी व्यक्तीकडे पाठविल्या होत्या एकट्या कै माधवराव पटवर्धन याचे उत्तर आले त्याच्या हातचे हे कार्ड अतिशय मोलाचे म्हणून जपून ठेवले आहे त्यावरील तारीख पाहता ते किती महत्त्वाचे आहे, हे स्पष्ट होईल ते पत्र असे

कोल्हापूर
ता ९ ऑगस्ट १९३९

सा न वि वि

तुमचा लेख मी पूर्वीच सह्याद्रीतून वाचला होता कल्पना उपयुक्त आणि अभिनव आहे परतु बहुतेक आकडे लिहून पाहून काही अडचण उपस्थित होते की काय हे पाहणे अवश्य आहे प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे अधिक लिहीत नाही कळावे

आपला
माधवराव पटवर्धन



# विषय-सूची

# साधन-ग्रंथ


## मराठी

कोल्हटकर, लाग, पेठे  संदर्भसाह्य
खरे, ग ह  संशोधकाचा मार्ग मित्र
„ „ (स) : संशोधनविषयक अभ्यासक्रम
टिकेकर श्री रा  सरकार व सरदेसाई
दीक्षित श्री ह  तर्कशास्त्र आणि वैज्ञानिक विवेचन पद्धती
नेने वि पा (स) अर्वाचीन मराठी साहित्य
पंडित के मो • इतिहास संशोधन पद्धति
प्रियोळकर अ का : प्रिय आणि अप्रिय
वनहट्टी श्री ना  ज्ञानोपासना व भारतीयांचे कर्तव्य
वैद्य वा सी  साधन चिकित्सा
माटे श्री म (स) महाराष्ट्र माववसरिके, विज्ञान बोध
सरदार ग बा (स) महाराष्ट्र जीवन ख २
हुल्याळकर श्री गो व इतर :
सुगम तर्कशास्त्र व वैज्ञानिक पद्धती

## हिंदी

सावित्री सिन्हा व विजयेंद्र स्नातक अनुसंधानकी प्रक्रिया
सरनाम सिंह शर्मा 'शोध प्रक्रिया'
उदयभानुसिंह हिन्दीके स्वाकृत शोधप्रबंध

## इंग्रजी

Best J W  Research in Education
Cambell W G  Form and Style in Research Writing
Cordasco F. & Gatner E S M · — Research and Report Writing
Eliot George  Study of Poetry
Encyclopaedias
— (i) Britannica vol 20
— (ii) Collier's vol 17
— (iii) Social Sciences vol 1
Gokak V K
*English in India  It's Present and Future*
Goode W J. & Hatt P K
Methods in Social Research
Gopal M H
Introduction to Research Procedures in Social Sciences
Gorell R B & Charlton L
*Modern English Handbook*
Hardie C D
Background to Modern Thought
Lucas F. L  Style
Lynd R S
*Middletown in Transition*
Mace C A  Psychology of Study